The Department of Public Instruction, Bombay

# MRICHCHHAKATIKA.



A DRAMA IN TEN ACTS.

TRANSLATED FROM SANSKRIT INTO MARATHI

By

PARASHURAM PANT GODBOLE.

SECOND EDITION -

3000 COPIES.







BOMBAY

GOVERNMENT CENTRAL BOOK DEPÔT.

1881

BOMBAY.

PRINTED AT GANPAT KRISHNAJI
PRESS
By
THE PROPRIETOR ATMÁRÁM KÁNOBÁ

# प्रस्तावना.

कोणत्याही ग्रंथास प्रस्तावना असावी हें योग्य आहे-परंतु ज्यानें वेणीसंहार नाटक आणि उत्तररामचरित्र नाटक ह्यांचीं भाषांतरें केलीं त्यानेंच ह्या नाटकाचें भाषांतर केलें आहे, म्हणोन - प्रस्तावनेचा पाल्हाळ ह्या पुस्तकांत लिहिला नाहीं. कारण कीं नाटकाच्या प्रस्तावनेचा प्रकार बहुतकरून सारखाच आहे. विशेष तेवढा लिहिला पाहिजे म्हणोन लिहितों.

ह्या नाटकाचा मूळकवि शूद्रक नांवाचा कोणी राजा फार प्राचीनकाळीं होऊन गेला तो. हा राजा चंद्रगुप्तानंतर व विक्रमादित्याच्या पूर्वीं इतक्या काळामध्यें झाला असावा. त्याची राजधानी कोणती होती हें पक्कें ठाऊक नाहीं. तरीं उज्जयिनी नगरी राजधानी असावी असा कोणी तर्क करतात. ह्याच नाटकांत त्या राजाचें थोडेसें वर्णन आरंभीं लिहिणें आहे. त्यानें हें नाटक संस्कृत भाषेंत रचिलें. मग त्यानें स्वतां रचिलें असो, किंवा कोणी महापंडितानें रचून त्याचें नांव घातलें असो, परंतु उत्तम नाटकांत गणायाजोगें हें नाटक आहे. त्याचें हें मराठी भाषांतर म्यां यथामति केलें आहे.

ह्या नाटकाला नांव मृच्छकटिक असें कवीनें योजिलें

आहे. मृत् म्हणजे माती, आणि शकटिका म्हणजे गाडी मिळून मृच्छकटिक म्हणजे 'मातीची गाडी', असा अर्थ होतो. याचें कारण हेंच कीं मातीची लहानशी गाडी मुलास खेळावयास करून दिली अशी गोष्ट ह्यामध्यें आणिली आहे.

कवीनें ह्याला नाटक असें म्हटलेलें नाहीं. प्रकरण असें म्हटलें आहे. कारण कीं लोकोत्तरगुणविशिष्ट नायक, नायिका, इत्यादि नाटकाचीं पूर्ण लक्षणें ह्यांत नाहींत. परंतु प्रकरण हा शब्द आमच्या प्राकृत जनास विदित नाहीं म्हणोन आम्हीं ह्या भाषांतरांत नाटक हेंच नांव घेतलें आहे.

ह्यांतील कथानकें व पात्रें पुराणप्रसिद्ध नाहींत ह्यामुळें वाचणारांच्या मनांत अर्थसंबंध लौकर येणार नाहीं असें समजून ह्यांतील कथानकाचा थोडासा सारांश एथें लिहून दाखवितों. हा वाचणारांनीं ध्यानांत ठेवावा.

उज्जयिनी नगरींत चारुदत्त ह्या नांवाचा कोणी एक मोठ्या सावकाराचा पुत्र होता. त्याच्या अंगीं उत्तम गुण पुष्कळ होते. तो प्रथम घरचा सुखी धनकनकसंपन्न होता. पण पुढें तें त्याचें धन चार खुशामती लोकांनीं नाहींसें

केल्यामुळें तो केवळ दरिद्र दशेस आला होता. तथापि त्यानें धैर्य व नीतिमत्ता सोडिली नाहीं. हा मुख्य नायक आणि त्याच नगरींत वसंतसेना म्हणोन कलावंतिणीची मुलगी होती, तीहि रूपानें आणि गुणांनीं चारुदत्ताच्या तुळनेची होती. पण ती घरची सधन होती, ती नायिका. ह्या उभयतांची प्रसंगवशात् दृष्टादृष्ट होऊन त्यांची परस्परें मानसिक प्रीति जडली. दोघांच्याही मनांत कीं, एकवेळ आपली गांठ पडावी, परंतु संकोच आणि लज्जा ह्यांमुळें तसा योग येईना. वसंतसेनेच्या मनांत आलें कीं हा पुरुष दारिद्र्यामुळें माझ्याशीं स्नेह करावयास लाजतो. ह्यासाठीं कांहींतरी बहाणा करून ह्याशीं स्नेह करावा, असें योजून एके दिवशीं ती सूर्यास्तानंतर चारुदत्ताच्या घरीं जावयास निघाली. तों वाटेंत राजश्यालानें तिला गांठून वश करण्यासाठीं तिचा पुष्कळ छळ केला, परंतु ती त्यास वश न होतां चारुदत्ताच्या घरीं गेली. आणि अंगावरचे दागिने (~~मीं आणले आहेत हे~~ कृपाकरून) त्याच्यापुढें ठेवून म्हणाली कीं चोरट्यांच्या भयानें हे दागिने मीं आणले आहेत हें कृपाकरून आपणाजवळ ठेवावे. चारुदत्ताच्या मनांत नसतां तिच्या आग्र-

हामुळें त्यानें ठेवून घेतले. नंतर एकेदिवशीं रात्रीं चोरानें घरांत शिरून ते दागिने चोरून नेले. तेव्हां आपण दरिद्री सबब आपलीच शंका लोक धरितील ह्या लज्जेस्तव, त्याच्या बायकोपाशीं एक अमूल्य रत्नमाळा उरली होती ती दागिन्यांच्या बदला त्यानें वसंतसेनेकडे पाठविली, आणि सांगून पाठविलें कीं तुझे दागिने मीं न कळतां द्यूतांत गमावले. ते माझ्या हातीं येत तोंपर्यंत ही रत्नमाळा तुजपाशीं असूं दे.

इकडे ज्या चोरानें ते दागिने चोरून नेले होते त्यानें ते दागिने नेऊन वसंतसेनेला दिले. तेव्हां चारुदत्ताचा प्रामाणिकपणा पाहून तिला फार आश्चर्य वाटून आनंद झाला. मग ते दागिने आणि ती रत्नमाळा घेऊन ती पुनः चारुदत्ताच्या घरांस गेली. तेथें ह्या विषयीं संभाषण होऊन उभयतांची प्रीति आणि विश्वास एकमेकांवर फार जडल्यावर बागेंत जाण्याच्या संकेतानें वसंतसेनेला गाडींत बसवून बागेंत आण असें गाडीवानास सांगून चारुदत्त पुढें गेला. त्यामागें काय गोष्ट झाली पहा.




## प्रस्तावना.

चारुदत्ताचा मुलगा रोहसेन ह्यास खेळावयास मातीची गाडी दाईनें करुन दिली असतां ती न घेऊन शेजाऱ्याच्या मुलाप्रमाणें मला सोन्याची गाडी पाहिजे म्हणून हट्ट घेऊन तो रडूं लागला. तें वसंतसेनेनें पाहून सोन्याचे दागिने गाडीकरण्याकरितां त्या मुलास दिले. आणि ती रत्नमाला चारुदत्ताच्या बायकोस देण्याकरितां दासीच्या हवाली करुन आपण जाण्यास तयार झाली. इतक्यांत राजश्यालाच्या गाडीवानानें आपली गाडी दाटीमुळें सहज चारुदत्ताच्या दरवाज्यापाशीं उभी केली होती, तीच गाडी चारुदत्ताची असें समजून वसंतसेना मुकाट्यानें त्या गाडींत जाऊन बसली. तें न जाणून गाडीवानानें गाडी हांकून नेली. तेणेंकरुन वसंतसेना चारुदत्ताच्या बागेंत जावयाची ती राजश्यालाच्या बागेकडे गेली.

आतां इकडे अशी गोष्ट झाली कीं, एका गवळ्याच्या मुलास कोणीं सिद्धपुरुषानें तूं राजा होशील असें भाकीत सांगितलें होतें, तें उज्जयिनीच्या पालकराजास समजल्यावरुन त्यानें त्या मुलास धरुन आणून बंदींत घातलें.

होतें. तो मुलगा मित्रांच्या साह्यानें बंदींतून पळाला तो भयानें चारुदत्ताच्या घरांत शिरून दाराआड लपून राहिला होता. इतक्यांत चारुदत्ताच्या गाडीवाल्यानें वसंतसेनेकरतां गाडी दरवाज्यापाशीं आणिली. त्या गाडींत हा लपलेला मुलगा हळूंच मागल्या अंगानें चढून बसला. तेव्हां गाडींत वसंतसेना बसली असें समजून गाडीवानानें गाडी हांकून चारुदत्ताच्या बागेंत नेली. चारुदत्त वसंतसेनेची वाट पहातच होता. गाडी येण्याबरोबर तिला खालीं घेण्याकरितां गाडीजवळ जाऊन पडदा उचलून पाहतो तों वसंतसेनेच्या जागीं अनोळखी पुरुष दृष्टीस पडला. तो म्हणाला, मी शरणागत आहे. तेव्हां त्याची हकीकत ऐकून घेऊन चारुदत्तानें त्याजवर दया करून त्याला त्याच गाडींत बसवून दूर पावतें केलें.

चारुदत्त निराश होऊन घरीं आल्यावर त्यास समजलें कीं वसंतसेनेनें जाते वेळेस मुलाला गाडीकरितां सोन्याचे दागिने दिले आहेत. पण हे दागिने आपण घेऊं नयेत असें मनांत आणून ते तिला परत देण्याकरितां आपल्या मित्राच्या स्वाधीन केले.

## प्रस्तावना -

तिकडे राजश्यालाच्या गाडीवानानें गाडी आपल्या धन्याच्या बागेंत नेली. त्या गाडींत वसंतसेनेला पाहून राजश्यालाला मोठा आनंद झाला. आणि तिला वश करण्याचा उपाय त्यानें चालविला, परंतु ती कांहींकेल्यानें वश होईना. तेव्हां क्रोधानें तिला ओढून पुष्कळ मारहाण करून गचांडी धरून तिला एका खांचेंत लोटिली. तेव्हां ती मूर्च्छित होऊन पडली, तेव्हां ती मेली असें समजून - तेथून भयानें तो पळाला. आणि वसंतसेना मारल्याचें बालंट चारुदत्तावर घालावें असें मनांत आणून न्यायाधीशाकडे फिर्यादी झाला, कीं द्रव्यलोभास्तव चारुदत्तानें अमुक ठिकाणीं वसंतसेनेला मारिली. तेव्हां न्यायाधीशांनीं चारुदत्तास बोलावून आणून चौकशी चालविली. चारुदत्त बोलला कीं, असें कर्म करणारा मनुष्य मीं नव्हे. तुम्ही म्हणाल तर म्हणा. इतक्यांत चारुदत्ताचा मित्र दागिने घेऊन वसंतसेनेकडे चालला असतां त्यांस समजलें कीं, चारुदत्ताला न्यायसभेंत धरून नेलें तें कां नेलें हें अगोदर पहावें म्हणोन दागिन्यासुद्धां तो न्यायसभेंत गेला. तेथें राजश्यालाशीं त्याची बोलाचाली होत असतां

अकस्मात् दागिन्याची गांठोडी खालीं पडली. ती राजश्या-
लानें उचलून घेऊन हा प्रत्यक्ष मुद्दा पहा म्हणोन न्याया-
धीशांस दाखविली. तेव्हां चारुदत्तावर गुन्हां शाबीत होऊन
त्यास सुळाची शिक्षा ठरली. हें ऐकून सर्व उज्जनी शहर
खळखळां रडलें.

तदनंतर चांडाळांनीं चारुदत्ताची धिंड काढून त्याला
वधस्थानीं नेलें. तथापि चारुदत्तानें धैर्य सोडिलें नाहीं.
त्याला इतकेंच वाईट वाटे कीं माझ्या हातून दुष्कर्म न
घडतां व्यर्थ माझी अपकीर्ति झाली. आतां ते चांडाळ-
त्याला सुळावर चढविणार इतक्यांत कसा चमत्कार झा-
ला पहा. तिकडे वसंतसेना मूर्च्छेतून सावध होऊन हळु
हळू त्याचवाटेनें चारुदत्ताच्या घराकडे चालली होती.
ती वधस्थानाजवळ आली तेव्हां तिला पाहून लोक म्ह-
णूं लागले ही वसंतसेना जिवंत असून हिच्याबद्दल चा-
रुदत्ताला मारितात हें काय. तें ऐकतांच सुळावर दे-
णारे चांडाळ चारुदत्तास खालीं ठेवून आश्चर्य करीत
स्तब्ध राहिले. आणि तें वर्तमान राजाला कळवावयास
गेले. तों तिकडे असा चमत्कार झाला कीं, तो गवळ्या-

चा मुलगा बंदींतून पळाला होता त्यानें मित्रांच्या साह्येंकरून पालक राजास ठार करून त्याची गादी आपण बळकाविली. शेवटीं सिद्धाचें भाकित खरें झालें. ह्या नव्या राजानें चारुदत्तास त्वरित मुक्त केलें. आणि त्याची अब्रू व्यर्थ घालविल्याबद्दल त्याचा आदर सत्कार करून त्यास मोठा अधिकार दिला.

---

# मृच्छकटिक नाटक.



## अंक १.

### चारुदत्ताचें घर.

पात्रें.

सूत्रधार·············· मुख्य नाटककार ( खेळ करणारा )
नटी ··············· सूत्रधाराची बायको.
विदूषक ( मैत्रेय ) ···· चारुदत्ताचा मित्र.
चारुदत्त ·········· सागरदत्त शेटीचा पुत्र.
शकार ············· राजाचा श्यालक. (कोतवाल.)
विट ··············· शकाराचा सोबती.
चेट ·············· शकाराचा चाकर.
वसंतसेना ·········· कळावंतिणीची मुलगी.
रदनिका ·········· चारुदत्ताची दासी.
वर्धमानक········· चारुदत्ताचा चाकर.



प्रख्यात शूद्रक असें अभिधान[1] ज्याला ॥ ३ ॥

आणखी

## श्लोक.

ऋग्वेदा सामवेदा पढुनिहि शिकला ज्योतिषा हस्तिशिक्षा ॥
वस्त्रालंकारवेषा मदनहरवरें[2] रत्नमुक्ता परीक्षा ॥
देऊनी राज्य पुत्रा स्वसुखद हरिला अश्वमेधेंहि तर्पी ॥
वांचोनी पूर्णवर्षें शत दश दिन तो अग्निला देह अर्पी ॥ ४ ॥

आणखी

## श्लोक.

तपें तपे उत्तम वेदवादी ॥
युद्धाविशीं उत्सुक अप्रमादी ॥
प्रीती असे बाहुरणीं[3] जयाला ॥
राजा असा शूद्रक नाम झाला ॥ ५ ॥

ह्या नाटकांत कोणत्या गोष्टी आहेत असें म्हणाल तर ऐका.

## आर्या.

होता अवंति[4] नगरीं द्विज निर्धन चारुदत्त सार्थपती[5] ॥
तद्गुणरक्ता[6] गणिका वसंतसेना तिला तुळा[7] नवती ॥ ६ ॥
त्यांची प्रीति परस्पर, नयरीती, दुष्टताहि व्यवहारीं ॥
भवितव्यता, खलांचा स्वभाव हीं यांत वर्णिलीं सारीं ॥ ७ ॥

(आसमंतात् भार्गी फिरून इकडे तिकडे पाहून म्हणतो.)

अहो ही आमची संगीत शाळा अगदीं शून्य दिसते हें काय? गायकमंडळी कोणीकडे गेली? (विचारकरून) हां—समजलें. ठीकच आहे.

## आर्या.

गृहशून्य अपुत्राचें त्याचेंही ज्यास साधु मित्र नसे ॥
शून्य दिशा मूर्खाला धनहीनालाहि सर्व शून्य असे ॥ ८ ॥

मी तर बरेंच गाणें गायलें. पण फार वेळ गाण्याच्या परिश्र-

---

१ नाम. २ शिवप्रसादानें. ३ कुस्ती करण्यास. ४ उज्जयनींत. ५ सावकार ६ चारुदत्ताच्या गुणांवर अनुरक्त. ७ उपमा.

मामुळें भुकेनें माझ्या डोळ्यांतलीं बुबुळें गरगर फिरूं लागलीं, जसें प्रचंड सूर्याच्या किरणांनीं वाळून गेलेल्या दोडक्यांतल्या बिया खड खड वाजतात तद्वत्. तर आतां बायकोला हाक मारून विचारावें, कीं कांहीं घरांत फराळाला आहे कीं नाहीं. ( इकडे तिकडे फिरून ह्म० ) कायतरी कष्ट हे ! फारवेळ गाणें गायल्यानें कमळाच्या सुकलेल्या देंठाप्रमाणें भुकेनें माझीं गात्रें पहा कशीं म्लान झालीं तीं ! तर हळूहळू घरीं जाऊन खबर घेतों. बरें घरकरणीनें कांहीं खावयास करून ठेविलें आहे कीं नाहीं. ( पाहून म्हणतो. ) हेंच माझें घर. मी आंत जातों. ( आंत जाऊन पाहतो ) हें काय ? हें मोठें आश्चर्य आहे ! आमच्या घरांत आज नवेंच खटलें कांहीं दिसतें ! तांदळांच्या धुणाचे पाट रस्त्यांतून वाहताहेत. जळकी कढई ओढल्या मुळें भुई वर जी काळी रेघ उमटली आहे तिणेकरून वैष्णवाची मुलगी कपाळीं अंगाऱ्याची रेघ लावते तशी भुई फारच शोभत आहे. घरांतून जो भाताचा खमंग वास येतो तेणेंकरून माझी भूक फारच खवळल्या सारखी होऊन मला अधिक दुःख देते. तर हें काय पूर्वजन्मार्जित निधानच आज प्राप्त झालें. किंवा अतिशयित क्षुधा लागल्या मुळें जिकडे तिकडे मला भातच दिसतो. म्हणावें तरी काय ? आज ह्या गडबडीमुळें घरांत मला फराळ मिळावयाचा कठीण दिसतो. भुकेनें तर माझे प्राण व्याकुळ झाले. घरांत पहावें तर नवेंच खटलें चाललें आहे. कोणी गंध उगाळते. कोणी उटीचे मसाले वाटते. कोणी फुलांच्या माळा करते. कोणी रांगोळी घालते. हें आहे तरी काय ? ( विचार करून ) असो घरकरणीलाच हाक मारून विचारावें म्हणजे काय तें खचीत समजेल.

( पडद्याकडे पाहून ) अगे प्रिये इकडे ये.

( इतक्यांत नटी येते. )

**नटी**—अहो पतिराज, ही मी आलें.

**सूत्र०**—आलीस बरें झालें.

**नटी**—काय आज्ञा, आपलें कोणतें काम करायाचें आहे ?

**सूत्र०**—हे प्रिये, दुसरें कांहीं नाहीं. मी फारवेळ गात बसलों होतों त्यामुळें भुकेनें माझीं गात्रें पहा कशीं सुकून गेलीं आहेत. तर घरांत कांहीं माझ्या साठीं खावयाला आहे काय ?

**नटी**—प्राणप्रिया, सर्व कांहीं आहे.

**सूत्र०**—काय काय आहे गे ?

**नटी**—तुमचा आवडता गुळभात, दहीं, मसाल्याचे तांदूळ, तुह्माला खाण्याजोगी आमटी, वडे, खीर, इत्यादि सर्व आहे, ईश्वर असाच तुम्हाला आशीर्वाद देवो.

**सूत्र०**—हे स्त्रिये, खरेंच कायगे इतकें सारें आज आपल्या घरांत आहे ? का थट्टा करतेस ?

**नटी**—( मनांत म्ह० ) थोडीशी थट्टा करण्याची ही वेळ बरी आहे. ( उघडपणें म्ह० ) प्राणप्रिया, हें सर्व बाजारांत वाण्याच्या दुकानीं आहे.

**सूत्र०**—( क्रोधाविष्ट होऊन ) हा दुष्टे, तुझ्या आशेचा असाच भंग होईल. आणि तुझा सत्यानाश होईल. मी खाण्याच्या आशेनें आलों, आणि त्वां मला मातीच्या ढेंकळासारखें दूर उडविलें.

**नटी**—प्राणप्रिया, क्षमा करा. रागावूं नका. मी उगीच विनोद केला. आज आपल्या घरीं खायाला पुष्कळ आहे.

**सूत्र०**—बरें तर, पण मी विचारतों, हें नवेंच खटलें काय त्वां काढिलें आहे ? कोणी गंध उगाळते, कोणी उटणें वाटते, दुसरी माळा गुंफते. पंच रंगांचीं फुलें, पूजा साहित्य ठेवून भूमि सुशोभित केली आहे. हे आहे काय ?

**नटी**—आर्या आज मी कांहीं व्रत घेतलें आहे.

**सूत्र०**—व्रत घेतलें ? त्या व्रताचें नांव काय बरें ?

**नटी**—ह्या व्रताचें नांव अभिरूपपतिक, ह्मणजे ज्याच्या योगानें विद्वान् पति मिळावा.

**सूत्र०**-स्त्रिये खरेंच सांग, ह्या लोकचा पति किंवा परलोकचा पति?

**नटी**—प्राणप्रिया, परलोकचा पति.

**सूत्र०**—(रागावून) पहा हो सर्व सभासद तुम्ही, माझा भात खर्चून परलोकचा पति मिळवायास पाहते ही.

**नटी**—अहो प्राणनाथ, रागें भरूं नका. परलोकचे पति तुम्हीच. तुम्हीच मला जन्मांतरीं पति असावेत म्हणून हें मीं व्रत घेतलें आहे.

**सूत्र०**—असें काय? बरें बरें. पण स्त्रिये, हें व्रत तुला कोणीं सांगितलें?

**नटी**—तुमचा प्रिय मित्र जो **चूर्णवृद्ध** त्यानेंच सांगितलें.

**सूत्र०**—(कोपाविष्ट होऊन) त्यानें सांगितलें काय? अरे रांडलेका **चूर्णवृद्ध**, नववधूचा सुगंधविशिष्ट केशकलाप जसा दैवानें कापावा तसा ह्या नगरीचा **पालक** राजा कुपित होऊन तुझा गळा कापतांना मीं केव्हां पाहीन.

**नटी**—रागें भरूं नका क्षमा करा. तुमच्याच उद्देशानें हें पारलौकिक व्रत मीं आरंभिलें आहे.

(असें बोलून त्याच्या पायांवर डोकें ठेविते.)

**सूत्र०**—स्त्रिये, उठउठ, बरें सांग आतां या व्रतास काय पाहिजे?

**नटी**—प्राणप्रिया, आपल्या घरीं भोजनास येण्याजोगा असा एक ब्राह्मण आमंत्रून आणला पाहिजे.

**सूत्र०**—बरें तर जा तूं आपल्या कामास. मीही आपल्या घरीं येण्याजोगा एखादा ब्राह्मण बोलावून आणतों.

**नटी**—आज्ञा मी जातें तर. (असें म्हणून निघून जाते.)

**सूत्र०**—(इकडे तिकडे फिरून मनांत विचार करतो.)

कसें करावें. आतां हें **उज्जनी** शहर तर भरलें आहे. पण यांत आपणाजोगा ब्राह्मण कोण पाहावा? (पुढें पाहून) बरेंच झालें हा **चारुदत्ता**चा मित्र **मैत्रेय** इकडे येत आहे, ह्याला पुसून पहावें आला तर. अरे **मैत्रेया** आज आमच्या घरीं तूं भोजनास येशील काय?

**मैत्रेय**—( पड्यापलीकडून बोलतो. ) बाबारे तूं दुसरा कोणी ब्राह्मण बोलाव. मी यासमयीं कांहीं कामांत आहें. मला यावयास होणार नाहीं.

**सूत्र**०—अरे नाहीं कां ह्मणतोस. आजचें भोजन उत्तम प्रकारचें चमचमीत आहे. तुला दुसऱ्या कोणाची अडचण नाहीं. आणि कांहीं दक्षिणाही मिळेल.

**मैत्रेय**—( पड्या पलीकडून बोलतो. ) कायरे तुला पहिल्यानेंच नाहीं म्हणून सांगितलें. असें असतां मला येण्याविषयीं तुझा इतका आग्रह कां ?

**सूत्र**०—( आपणाशीं बोलतो. ) ह्यानें तर मला धुडकाविलें. असो दुसऱ्या ब्राह्मणाला आमंत्रण करीन.

( असें बोलून निघून जातात. )

॥ ही प्रस्तावना झाली. ॥

---

( इतक्यांत हातांत शेला घेऊन **मैत्रेय** येतो. )

**मैत्रेय**—दुसरा ब्राह्मण बोलाव, मी कामांत आहें. असें पूर्वोक्त वाक्य बोलून आणखी म्हणतो. ( **मैत्रेयानें** दुसऱ्याचीं आमंत्रणें खावीं काय ? हायहाय एकून सांप्रत माझी अशी अवस्था झाली ! हे अवस्थे त्वां माझी किंमत केली. कायहो दैवाची विलक्षण गति ही ! अरे जो मी नुकताच **चारुदत्ताच्या** संपत्तीवर मौजा मारीत होतों. ढेंकरांबरोबर सुगंध देणारे असे मसालेदार मोदक खाऊन मधल्या चौकाच्या द्वारांत ढेंकरा देत बसत होतों. चितार्‍याचीं बोटें जशीं अनेक रंगांनीं रंगलेलीं असतात तसे माझे हात नेहमीं नाना प्रकारच्या भक्ष्य पदार्थांनीं भरत असत. कंटाळा आल्यामुळें बोटांचा स्पर्श मात्र करून पदार्थ पलीकडे लोटीत होतों. रस्त्यांत पोळ रोवंथ करीत उभे राहतात तसा मी बेफिकीर राहत होतों. तोच मी ह्याकाळीं मा-

ह्या मित्राला दरिद्रता आली ह्मणून इकडे तिकडे कोठें तरी आपला निर्वाह करून पारव्याप्रमाणें वस्तीस मात्र याच्या घरीं येतों. असो **चारुदत्ता**चा प्रियमित्र **चूर्णवृद्ध** ह्यानें जाईच्या फुलांनीं सुवासित केलेला हा शेला **चारुदत्तास** देण्यासाठीं मजपाशीं दिला आहे, आणि **चारुदत्ता**ची स्नान-संध्या आटोपली म्हणजे त्यास हा द्यावा असें मला सांगितलें आहे. तर आतां हा शेला घेऊन मी **चारुदत्ता** कडे जातों. ( इकडे तिकडे फिरून पुढें पाहून म्ह० ) **चारुदत्त** स्नानसंध्या देवपूजा आटोपून गृहदेवतांस बलि[१] देण्याकरितां इकडेसच येत आहे.

( इतक्यांत वर सांगितल्या प्रमाणें **चारुदत्त** आणि दासी **रदनिका** हीं उभयतां येतात. )

**चारुदत्त**—( आकाशाकडे पाहून दुःखाचा सुस्कारा टाकून म्ह० )

## श्लोक.

ज्या माझ्या सदनांगणांत विमल द्वारप्रदेशीं बली ॥
होते सारस हंस भक्षित सदा तैशीच हे देहेली[२] ॥
तेथें सांप्रत हीं पहा उगवलीं झाडें तृणें दीसती ॥
त्यांमध्यें पडतां बली झटुनियां मुंग्या किडे भक्षिती ॥ ९ ॥

( हळूहळू खालीं बसतो. )

**विदूषक** ( मैत्रेय )—हा आर्य **चारुदत्त** येथें बसला आहे. आतां त्याच्या जवळ जावें. ( असें म्हणून जवळ जातो. मित्रा, तुला स्वस्ति असो. तुझी वृद्धि होवो.

**चारु०**—अरे हा माझा जिवलग मित्र **मैत्रेय** आला! सख्या **मैत्रेया**, आलास फार चांगलें झालें. खालीं बैस.

**विदू०**—मित्रा, जशी तुझी आज्ञा. ( खालीं बसतो. ) मित्रा, तुझा प्रियमित्र जो चूर्णवृद्ध त्यानें हा शेला जाईच्या फुलांनीं सुवा-

---

१ देवतांच्या उद्देशानें टाकलेलें अन्न. २ देवडी.

सित करून तुजकरितां मजबरोबर पाठविला आहे. आणि **चारुदत्ता**ची देवपूजा आटोपली म्हणजे त्यास द्यावा असें मला सांगितलें आहे. तर हा घे. ( असें बोलून शेला त्यास देतो. )

**चारु०**—( शेला घेऊन सचिंत बसतो. )

**विदू०**—मित्रा, तूं कशाचें चिंतन करतोस ?

**चारु०**—मित्रा, काय सांगूं ?

## श्लोक.

भोगून दुःखें सुख शोभतें जनीं ॥
घनांधकारांत दिवा जसा वनीं ॥
सुखा पुढें होय दरिद्रता नरा ॥
असोनि देहीं मृततुल्य तो खरा ॥ १० ॥

**विदू०**—हे मित्रा, मरण आणि दारिद्र्य ह्यांतून तुला कोणतें बरें वाटतें ?

**चारु०**—सांगतो ऐक.

## आर्या.

दारिद्र्य मरण यांतुनि मरण बरें बा दरिद्रता खोटी ॥
मरणांत दुःख थोडें दारिद्र्यांत व्यथा असे मोठी ॥ ११ ॥

**विदू०**—हे मित्रा, आतां त्या गोष्टीचा खेद मानून उगाच जिवास संताप देऊं नको. तुझें द्रव्य चोरांनीं नेलें किंवा राजानें लुटलें असें नाहीं. आपल्या मित्र मंडळीसच देतांदेतां क्षीण झालें आहे. तर देवांनीं अमृतकला पितांपितां अवशिष्ट राहिलेल्या प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें तुझ्या वैभवाचा क्षय अधिकच शोभा देतो.

**चारु०**—अरे मित्रा, धनक्षय झाल्याचें मला दुःख नाहीं. पण पहा,

## श्लोक.

माझें मलाच घर तापद फार झालें ॥
क्षीणार्थ जाणुनि जनीं गृहवर्ज्य केलें ॥

गेला सुकोनि मेद[1] कालवशेंचि ज्याचा ॥
जातात भृंगं[2] कटं[3] सोडुनि त्या गजाचा ॥ १२ ॥

**विदू०**—हे मित्रा, जशीं गवळ्याचीं पोरें त्यांस जिकडे माशा खात नाहींत चावत नाहींत तिकडे जातात; तशीं हीं धनें त्यांस जिकडे कोणी खात नाहींत खर्चीत नाहींत तिकडेस जातात.

**चारु०**—मित्रा, खरें विचारशील तर,

## श्लोक.

नाहीं खरें विभवनाशज दुःख मातें ॥
दैवानुसार मिळतें धन आणि जातें ॥
हें दुःख फार मज नष्ट धनास सारे ॥
झालेच मित्रपण सोडुनि पाठिमोरे[4] ॥ १३ ॥

आणखी असें आहे.

## ओंव्या.

दारिद्य लज्जेचें कारण ॥ लज्जा करी तेजाचें हरण ॥
निस्तेज पुरुषास अपमान ॥ पदोपदीं होतसे ॥ १४ ॥
अपमान निर्वेदा उठवी ॥ निर्वेद शोकातें पेटवी ॥
शोकबुद्धीतें आटवी ॥ निःशेषपणें ॥ १५ ॥
बुद्धीनें सोडिलें जयासी ॥ नाश गांठी त्या नरासी ॥
अहो इतुक्याही अनर्थासी ॥ मूळ पाहतां दारिद्य ॥ १६ ॥

**विदू०**—हे मित्रा, वारंवार त्या गोष्टीचें स्मरण करून संताप करणें पुरे आतां.

**चारु०**—हे मित्रा, हें दारिद्य पुरुषास कसें आहे कळलें ?

## श्लोक.

चिंतेचें घर हेंच वैर दुसरें लोकांत होतें सदा ॥
निंदा मित्र जनांत कारण निजद्वेषास हें सर्वदा ॥
[5]या बुद्धि वनास देइ सहसा जाया सदा लाजवी ॥

१ मदोद. २ भुंगे. ३ गंडस्थल. ४ बिमुख. ५ जीविताचा तिरस्कार.

शोकाग्नी त्दयस्थ हा परि तनू जाळी न संतापवी ॥ १७ ॥
असो, मित्रा, मीं गृहदेवतांस बलि दिला. आतां हा मातृदेवतांचा बलि तूं चव्हाट्यावर नेऊन ठेव.

**विदू०**—मी तिकडे जाणार नाहीं.

**चारु०**—कां बरें.

**विदू०**—जरी आराधन केलें तरी देवता प्रसन्न होत नाहींत मग त्यांस बलि देऊन काय फळ ?

**चारु०**—मित्रा असें म्हणूं नको. हा गृहस्थाचा नित्यविधि आहे. हा केलाच पाहिजे. आणि या विधीनें देवता प्रसाद करतीलच.

### श्लोक.

जपें तपें स्तोत्रपाठें बलिदानें हि पूजितां ॥
गृहस्थावरि होतात निश्चयें तुष्ट देवता ॥ १८ ॥

या साठीं जा आणि मातृदेवतांस बलि देऊन ये.

**विदू०**—अरे मी जाणार नाहीं. दुसरा कोणी पाठीव. मी गरीब ब्राह्मण. मला सध्यां काळ अनुकूळ नाहीं. मी जें जें करायास जातों तें तें सारें विपरीत होतें. जसें आरशांतलें प्रतिबिंब डाव्याचें उजवें आणि उजव्याचें डावें तसें. आणखी एक सांगतों. ही संध्याकाळची वेळ आहे. रस्त्यांतून वेश्या, विट, चेट, इत्यादि राजाच्या प्रीतींतलीं मनुष्यें फिरत आहेत. नजाणो बेडूक खायास उत्सुक झालेल्या कालसर्पा पुढें जसा अकस्मात उंदीर येऊन पडावा तशी माझी गति झाली तर मी फुकट मारला जाईन. मग तूं येथें बसून काय करशील ?

**चारु०**—बरें असो. तूं अंमळ बैस मी थोडा जप राहिला आहे तो करतों.

( इतक्यांत पडद्यांतून शब्द होतो. ) उभी रहा, वसंतसेने उभी रहा.

( तदनंतर पुढें **वसंतसेना** आणि तिच्या पाठीस लागलेले **विट, शकार,** व **चेट,** येतात )

**विट॰**—वसंतसेने उभी रहा उभी रहा.

श्लोक.

कां तूं भयें पळसि टाकुनि सौकुमार्या ॥
नृत्यास योग्यपद योजिसि कां अकार्या ॥
उद्विग्नदृष्टि चकिता अशि भासतीस ॥
व्याधास पाहुन मृगी तशि धांवतीस ॥ १९ ॥

**शकार**—उभी रहा, **वसंतसेने,** उभी रहा. जाऊं नको.

श्लोक.

कां धांवसी, पडसि जासि पळोनि कांगे ॥
हो सुप्रसन्न, मरशील न तूं उभी गे ॥
कामाग्निने ह्रदय हें जळतें प्रचंडें ॥
अंगाररशिपतितें जशि मांसखंडें ॥ २० ॥

**चेट॰**—आगे, **वसंतसेने,** उभी रहा, उभी रहा.

श्लोक.

जाशी भयेंच, भगिनी मम, कां निघून ॥
मोरीण जेंवि पळते पुरुषा बघून ॥
माझा धणी तुजकडे बहु संभ्र[3]मानें ॥
येतो जसा तरुण कु[4]क्कुर; त्यास मौ[5]नें ॥ २१ ॥

**विट॰—वसंतसेने,** उभी रहा, उभी रहा.

श्लोक.

कां जासि बालकदलीपरि कांपलीस ॥
रक्तांबर श्वस[6]नकंपित नेसलीस ॥
रक्तोत्प[7]लप्रकर हे पडतात वा[8]टे ॥
टंकें मनः शिलगुहाच विदीर्ण वाटे ॥ २२ ॥

---

१पळण्याच्या कामास. २ निखाऱ्यावर पडलेलीं. ३ त्वरेनें. ४ कुत्रा. ५मानदे. ६ वाऱ्यानें चंचल. ७ (अंगावरच्या) तांबड्या कमळांचे समुदाय. फुलें. ८मार्गांत.

**शकार**—उभी रहा **वसंतसेने**, उभी रहा.

### आर्या.

माझा अनंगें मन्मथ, मदन, स्मर, काम यास वाढविती ॥
रात्रीं माझ्या शय्येवरि मज निर्दयपणेंच पाडविती ॥ २३ ॥
ती तूं पडत झडत कां पळसि भयें देह हा तुझा सजला ॥
जशि रावणास कुंती झाली तशि तूंहि हो सुवश मजला ॥२४॥

**विट**—अगे **वसंतसेने**,

### श्लोक.

माझ्या पुढें त्वरित टाकिशि पावलासी ॥
व्याली भिऊन गरुडा तशि काय जासी ॥
घेईन वेग तरि सारिन वायु मागें ॥
घ्याया तुला तिळ हि सुंदरि मी न भागें ॥ २५ ॥

**शकार**—हे मित्रा **विटा**, पाहिलेंना !

### श्लोक.

ईतें नाणकचोर, कामकसणी, मत्स्यादनी, नर्तकी ॥
नाकांची चपटी, सुवंशबुडणी, सर्वत्रदुर्वर्तकी ॥
शृंगारोज्वल पेटिका, सुवसना, वेषाश्रया, हीं दहा ॥
नांवें देत असें तरी वश मला ही होत नाहीं पहा ॥ २६ ॥

**विट**—अगे **वसंतसेने**,

### आर्या.

घाबरलीस भयेंका स्तनितभयें जेंवि सारसी बाला ॥
तारेस बोट तैसे पळतां हे कांपे घांसती गाला ॥ २७ ॥

---

१ टाकीनें फोडलेली मनशिळाची खाण. २ एकार्थक अनेक शब्द हासार्थ. ३ बाढविणारी. ४ पाडणारी. ५ असंबद्धोक्ति. ६ सर्पिणी. ७ धराया. ८ नथकेन. ९ नाणें चोरणारी. १० मदनाची छडी. ११ मासे खाणारी. १२ नृत्य करणारी. १३ बसक्या नाकाची. १४ वंशास दोष लावणारी १५ निंद्यवर्तन करणारी. १६ शृंगार रसाची. १७ उत्तम वस्त्रें घेणारी. १८ नाना वेष करणारी. १९ मेघगर्जनाच्या भयानें. २० सारस पक्ष्याची मादी. २१ विण्याच्या तारेवर २२ कर्णभूषणें.

**शकार**—अगे वसंतसेने,

### आर्या.

झणझण खणखण होती ध्वनि पळतां फार भूषणाची हे ॥
कां पळसी रामातें भिउनि पळे द्रौपदी[1] तशी तूं हे ॥ २८ ॥

आणखी.

### श्लोक.

विश्वावसूची[2] भगिनी सुभद्रा ॥
नेली जशी मारुतिनें समुद्रा ॥
तशी तुला मी धरितों पहागे ॥
जातीस कोठें फिर शीघ्र मागें ॥ २९ ॥

**चेट**— अगे वसंतसेने,

### आर्या.

या राजवल्लभा[3] भज[4] हा तुज देईल मत्स्य मांस अधीं ॥
गे मत्स्य भक्षकाच्या मृतदेहा श्वान भक्षिती न कधीं ॥ ३० ॥

**विट**— अगे वसंतसेने,

### श्लोक.

कटितटीं कशिली शुभ मेखला[5] ॥
जडित हार गळां नव रेखिला[6] ॥
हळदिने मुख सारविलें अशी ॥
नगर देविच तूं पळशी कशी ॥ ३१ ॥

**शकार**— अगे वसंतसेने,

### श्लोक.

आह्मी तुझ्या पाठिस लागलों पहा ॥
कोल्हीस रानीं कुतरे जसे महा ॥
तू शीघ्रवेगा पळसो धरूनियां ॥
समूळ माझ्या त्द्दया हरूनियां ॥ ३२ ॥

---

१ रामाला द्रौपदी हें असंबद्ध भाषण आहे. २ हा संबंध असंबद्ध आहे. ३ राज प्रिया शकाराला. ४ अनुकूल हो. ५ दाब कटि भूषण. ६ सुरेख.

**वसंत०**—अगे **पल्लविके**, **पल्लविके**, अगे **परभृतिके**, **परभृतिके**.

**शकार**—( भयपावून ) मित्रा विटा, कोणी माणसें आलीं रे माणसें आलीं.

**विट**—भिऊं नको, भिऊं नको.

**वसंत०**— **माधविके**, अगे **माधविके**,

**विट**—( हास्य करून ) मूर्खा, ती आपल्या दासींला हाका मारीत आहे.

**शकार**—मित्रा, ती बायकांस हाका मारते काय ?

**विट**—तर काय ?

**शकार**—अँः एक सोडून शंभर बायका आल्या तरी मी ह्या सोट्यानें त्यांस ठार करीन.

**वसंत०**—( जवळ कोणी नाहीं असें पाहून म्ह०) अरे कोणीच जवळ नाहीं. साऱ्या दासी चुकल्या काय ? तर आतां येथें मी आपलें आपणच रक्षण करावें असें झालें.

**विट**—सोध सोध, आपल्या दासीजनाला आणखी सोध.

**शकार**—**वसंतसेने** तूं **पल्लविकेस** किंवा **परभृतिकेस** अथवा साऱ्या वसंत[1] मासाला पाहिजे तर हाक मार. तुझ्या पाठीस मी लागलों असतां तुला कोण सोडवितो पाहूं बरें ?

श्लोक.

तो भीम कीं तो जमदग्निपुत्र ॥
कीं येउ कुंतीसुत पंक्तिवक्त्र[2] ॥
तुझा पद्दा मी बुचडा धरीतों ॥
दुःशासनाची[4] करणी करीतों ॥ ३३ ॥

पद्दा **वसंतेने** इकडे पद्दा.

श्लोक.

खड्ग करीं हातीक्ष्ण पद्दा ॥ मस्तक तूझा संनिध हा ॥

[1] वसंत ऋतूंतील जे मास तत्संबंधी पदार्थ. [2] दशमुख रावण. [3] कर्ण.
[4] द्रौपदीची वेणी ओढली तद्वत्.

तोडिन डोकें मी असिनें ॥ जाशिल कोठें या गतिनें ॥ ३४ ॥

श्लोक.

कां पळसी कां घाबरसी ॥ हो वश मातें कां मरसी ॥
देउनि काळ्या आंवतणें[1] ॥ होइल कैसे गे जगणें ॥ ३५ ॥

**वसंत०**—आर्या विटा, मी अबला स्त्री आहें.

**विट**—म्हणूनच जिवंत राहिली आहेस.

**शकार**—म्हणूनच मारली गेली नाहींस.

**वसंत०**—( मनांत म्ह० ) यांचें दयेचें भाषण देखील मला भय उत्पन्न करितें, असो. ( उघडपणें म्ह० ) अरे श्रेष्ठा, या तुमच्या करणीवरून मला असें दिसतें कीं, कांहीं अलंकार मजपासून तुह्मीं घ्यायास पाहतां ?

**विट**—छी छी हें काय बोलतेस ! अगे **वसंतसेने**, बागेस शोभा देणारी जी लता तिचीं पुष्पें कोणी खुडतो काय ? तुझे अलंकार आह्मांस नकोत.

**वसंत०**—तर हें काय असें करतां ? ह्मणतां तरी काय ?

**शकार**—मी देव पुरुष, मनुष्य वासुदेव आहें माझा मनोरथ त्वां पूर्ण करावा, हेंच आमचे ह्मणणें आहे.

**वसंत०**—( रागावून ह्म० ) शिव शिव ? कायहें. एकीकडे हो तूं अनुचित बोलणें बोललास.

**शकार**—( टाळी वाजवून हांसून ह्म० ) मित्रा **विटा**, पाहिलें. ही कळवांतिणीची पोरगी मनांतून मजवर खुष होऊन मला ह्मणते एकीकडे चल. आणखी मला ह्मणते तूं थकला आहेस भागला आहेस. पण मी देशांतरास किंवा ग्रामांतरास गेलों नव्हतों. अगे नायकिणीचे पोरी, ह्या विटाच्या डोक्याला मी आपले पाय लावून शपथ करतों. तुझ्या पाठीस लागून हिंडतां फिरतां मी थकलों आणि भागलों आहें.

**विट**—( मनांत ह्म० ) वाहवा, ती काय बोलली आणि हा मूर्ख

१ आमंत्रण.

काय समजला. (उघडपणें **वसंतसेनेस**) **वसंतसेने** हें तूं वेश्यापणास विरुद्ध बोललीस.

पद्य

### श्लोक.

तरुण पुरुष यावे आपल्या हें घरासी ॥
मनिं धर गणिका तूं मार्ग जाता लतासी ॥
निजतनुस धनार्थें मांडिलें विक्रयाला ॥
ह्मणुनि सम भजावें अप्रियाला प्रियाला ॥ ३६ ॥

आणखी सांगतों ऐक.

### श्लोक.

वापींत द्विज शूद्र मूर्ख चतुर स्नानास संपादिती ॥
ज्या नावेंत नरेंद्र विप्र बसले त्या अन्यही बैसती ॥
मोरें जी वरिली लता तिजवरी गे कावळा ही बसे ॥
वापी नाव लता तशीच गणिका सर्वांस भोग्या असे ॥३७॥

**वसंत॰**—अरे गुण हा प्रीतीस कारण आहे. बलात्कारानें प्रीति होत नाहीं.

**शकार**-अरे **विटा**, कामदेवाच्या उत्साहास बागेंत यात्रा मिळाली होती त्या दिवसापासून ही गर्भ दासी त्या भिकाऱ्या **चारुदत्तावर** फिदा झाली आहे. मला वश होत नाहीं. पण संभाळ हो. त्या **चारुदत्ताचें** घर जवळच डाव्या हातास आहे. ही तुझ्या माझ्या हातांतून सुटून न जाईल असें कर.

**विट**—( मनांत ह्म॰ ) जी गोष्ट मनांत ठेवायाची तीच हा मूर्ख उघडी करितो. काय ह्मणावें याला. असो. काय **वसंतसेना चारुदत्तावर** फिदा झाली आहे ह्मणतो ? योग्यच झालें. रत्नापाशी रत्न असावें अशी जी ह्मण आहे त्या ह्मणीप्रमाणेंच झालें. तर मग ती गेली तर जावो. ह्या मूर्खाला घेऊन काय करावयाचें आहे ? ( उघडपणें ) अरे **काणेली पुत्रा**, काय ह्मणतोस, डाव्या हातास जवळच **चारुदत्ताचें** घर आहे काय ?

**शकार**—होय, यांत काय संशय ? हें जवळच डाव्या हातास त्याचें घर आहे.

**वसंत०**—( मनांत म्ह० ) वाहवा ! फार चांगलें. डाव्या हातास त्याचें घर आहे म्हणतो. हें जर खरें आहे तर हा दुर्जन अपकार करीत असतां यानें उपकारच केला असें मी समजतें. कांकीं, यानें घर दाखवून माझ्या प्रियाची आणि माझी गांठ घातली असें झालें.

**शकार**—अरे विटा, उडदांच्या ढिगांत काजळाच्या गोळीप्रमाणें ह्या बळकट अंधकारांत ही **वसंतसेना** दिसतां दिसतां नाहींशी झाली. आतां तिला कोणी कडे सोधावें ?

**विट**—खरेंच. काय तरी हा दाट काळोख. पहा.

## आर्या.

दृष्टीची शक्ति पहा सहसा तिमिरांत जाहली नष्ट ॥
असतां उघडे डोळे वाटति मिटलेच काय हे स्पष्ट ॥ ३८ ॥

आणखी पहा.

## आर्या.

तम लिंपितें शरीरा नभ अंजन वर्षतें असें भावे ॥
दुर्जनसेवेपरि ही दृष्टी तिमिरांत विफलता पावे ॥ ३९ ॥

**शकार**—**विटा**, आतां मी **वसंतसेनेला** सोधतों.

**विट**—अरे **काणेली पुत्रा**, पण तिची कांहीं खूण आहे काय ?

**शकार**—खूण ती कोणती बरें ?

**विट**—तिच्या आंगावरील भूषणांचा शब्द, अथवा आंगावरील फुलांचा सुगंध.

**शकार**—नाकांस फुलांचा वास ऐकूं येतो, परंतु अंधकारानें भरलेल्या माझ्या कानास भूषणांचा शब्द स्पष्ट दिसत नाहीं.

**विट**—( त्याला न कळत वसंतसेनेशीं बोलतो. ) अगे **वसंतसेने** ऐकतेस ?

---

१ अंधकारांत. २ काजळ. ३ वाटतें. हें उलट बोलणें हास्यरस्य पुष्ट्यर्थ योजिलें आहे.

श्लोक.

तूं या प्रदोष समयीं दिससी न कोणा ॥
सौदामिनी जलदसंधित जेंवि लीना ॥
आतां सुगंध सुचवील तुला फुलांचा ॥
तैसाच हा मधुर शब्द हि नूपुरांचा ॥ ४० ॥

मी म्हटलें हें ऐकलेंना वसंतसेने ?

**वसंत०**—( मनांत ) ऐकलें आणि समजलें ही ( नूपुरें काढून हातीं घेते. आंगावरील फुलें काढून एकीकडे टाकिते. आणि अमळ पुढें होऊन हातानें चांचपून म्ह० ) हें काय ? भित चांचपतां चांचपतां हें परुसदार माझ्या हातास लागलें असें वाटतें. हो मी ओळखलें. तेंच हें घराचें परुसदार. पण हें बंद आहे.

( इकडे **चारुदत्त** आपल्या मित्रास म्हणतो. )

**चारु०**—मित्रा, माझा जप समाप्त झाला. आतां तूं जा आणि मातृदेवतांस बलि नेऊन दे.

**विदू०**—मी बुवा जाणार नाहीं.

**चारु०**—( दुःखानें ) धिक्कार असो जीवितास.

श्लोक.

निर्द्रव्या पुरुषा नबंधुजनही साह्यास संतोषती ॥
त्याचे जे प्रियमित्र तेहि फिरती आपत्तिही वाढती ॥
जातें सत्व लयास शीलविधुची कांतिक्षया पावती ॥
जें केलें जन पापकर्म इतरीं तें त्याकडे लाविती ॥४१॥

आणखी

श्लोक.

त्याची संगत कोणिही नकरिती त्या मान कोठें नसे ॥
जातां तो धनिच्या घरा सुवचनें त्याला नकोणी पुसे ॥
थोरांपासुनि दूरदूर फिरतो लाजून दुर्वस्त्रक ॥
वाटे निर्धनता मला खचित हें साव्वें महापातक ॥४२॥

---

१ विद्युल्लता. २ मेघाच्या आड. ३ अदृश्य. ४ शीलरूपचंद्राची. ५ फाटक्या वस्त्राचा.

आणखी श्लोक.

दारिद्र्य मित्रा वससी शरीरीं
माझ्याच तूं मानुनि सौख्य भारी ॥
तुझ्या विशीं हें मज दुःख मोठें ॥
मेल्यास मी जाशिल सांग कोठें ॥ ४३ ॥

**विदू**—( वाईट वाटल्यासारखें करून ह्म० ) हे मित्रा, जर मीं जावेंच अशी तुझी इच्छा आहे तर जातों. पण ही **रदनिका** माझ्या सोबतीस असूं दे.

**चारु०**—**रदनिके** ह्या **मैत्रेया** बरोबर जा.

**रदनिका**—आज्ञा महाराज जातें.

**विदू०**—अगे **रदनिके**, हा बळी आणि दिवा तूं हातीं घे, मी कवाड उघडतों. ( पुढें जाऊन दार उघडतों. )

**वसंत०**—वाहवा, माझ्या दैवयोगानें दार तर उघडलें, आतां आंत जावें. ( पाहून ) हा दिवा आला हें काय ? ( नकळत पदरानें दिवा मालवून घरांत जाते. )

**चारु०**—अरे **मैत्रेया.** हें काय ?

**विदू०**—दार उघडल्यामुळें दारांतून वाऱ्याचा झोत आला, त्यानें दिवा मालवला. असो **रदनिके**, तूं दाराच्या बाहेर हो इतक्यांत मी चौकांतून दिवा लावून घेऊन येतों. असें म्हणून आंत निघून जातो.

**शकार**—अरे विटा थांब, मी **वसंतसेने**ला सोधून काढतों.

**विट०**—बरें सोध सोध.

**शकार**—( सोधल्यासारखें करून ह्मणतो ) विटा, अरे **विटा**, धरली रे धरली.

**विट**—हा मूर्खा, अरे मी आहें तो.

**शकार**—तूं कां ? तर हो एकीकडे. ( पुनः सोधून ह्मणतो. ) अरे **विटा**, धरली रे धरली.

**चेट**—अहो महाराज, मी चेट आहें हा.

**शकार**—काय तूं चेट आहेस ? इकडे विट, तिकडे चेट, तिकडे चेट इकडे विट, हें आहे तरी काय ? आतां तुम्ही दोघेही एकीकडे व्हा कसे. मी तिला आतां धरतों पहा. (पुन्हा सोधून **रदनिकेची** वेणी धरतो. ( अरे **विटा** आतां बरीक **वसंतसेना** खचीत सांपडली.

श्लोक.

होती काळोखांत दडाली ॥ मालागंधें खूण दाविली ॥
केशीं धरिली ह्या पळ्यानें[1]॥ **सीता** जैशी दश **कंठ्यानें**[2] ॥४४॥

**विट**—मित्रा, सांपडली कायरे ? भलें झालें. पळून जात होती.

आर्या.

तूं भाळलीस यौवन दर्पानें सार्थवाहरायाला[3] ॥
आकर्षिलें तुझे कच[4] ह्यानें कुसुमाढ्य तुज हरायाला ॥ ४५ ॥

**शकार**—( **वसंतसेना** समजून तिला म्ह० )

श्लोक.

आतां कोठें पळशिल पोरी ॥
धरिली वेणी बुचडा दोरी ॥
ओरड मार हका देवातें ॥
शंभू शंकर ईश्वर यातें ॥ ४६ ॥

**रदनिका**—( भयपावून ) तुम्ही थोर माणूस असून असें काय करतां हें ?

**विट**—अरे **काणेलीपुत्रा**, हा शब्द निराळा दिसतो. **वसंतसेनेचा** नव्हे.

**शकार**—अरे विटा, तुला समजलें नाहीं. दहींभात खाऊं सोंकलेल्या मांजरीचा जसा स्वर बदलतो तसा ह्या दासीचा स्वर बदलला आहे.

**विट**—तिनें आपला स्वर बदलला काय ? हें मोठेंच आश्चर्य. अथवा आश्चर्य कशाचें. हिचें कसबच आहे हें.

---

१ शूरानें. २ रावणानें. ३ सावकारांत मुख्य जो चारुदत्त त्याला. ४ केंस.

## आर्या.

शिकली कला कुशलता नाचे रणांगणीं सदा गाय ॥
परवंचनी निपुण जी तिजला स्वर फिरविणें नवल काय ॥४७॥

**विदू०**—( हाती दिवा घेऊन ) ओ होहो ! प्रदोषकाळच्या मंद वायूनें दिवा पहा कसा कांपतो आहे ! वधस्तंभापाशीं बोकड नेला असतां त्याचें काळीज जसें थरथर कांपतें तसा. ( दिवा घेऊन पुढें जातो, आणि **रदनिकेला** पुरुषांनीं वेढलेली पाहून ह्म० ) अगे **रदनिके**, हें काय ?

**शकार**—अरे **विटा**, कोणी मनुष्य आलारे मनुष्य.

**विदू०**—अगे हें योग्य नव्हे. **चारुदत्ताच्या** दरिद्रतेमुळें परकी पुरुष घरांत आणितेस हें चांगलें नव्हे.

**रदनि०**—अरे **मैत्रेया**, ही माझी दुर्दशा पहा अगोदर.

**विदू०**—काय तुझी दुर्दशा का आमची ?

**रदनि०**—होहो खरें, तुमचीच.

**विदू०**—तर काय हा तुजवर बलात्कार आहे ?

**रदनि०**—यांत काय संशय ?

**विदू०**—खरेंच कीं काय ?

**रदनि०**—होहो खरेंच. पहा ह्यांनीं मला कसें धरलें आहे तें.

**विदू०**—(क्रोधाविष्ट होऊन काठी उगारून म्ह०) काय करतोस हें? हो एकीकडे. कुत्रा देखील आपले धन्याच्या घरांत परक्यास पाहून अत्यंत कोपायमान होतो, मग मी तर मनुष्य त्यांत ब्राह्मण आहे. उगाच राहीन कीं काय ? हें लांकूड पहा कसें वांकडें आहे. जसें आम्हांसारख्या दरिद्र्याचें दैव; किंवा तुह्मांसारख्या दुर्जनाचें त्हृदय. तर ह्या लांकडाचे घाव घालून वाळलेल्या वेळूप्रमाणें तुझा मस्तक फोडून टाकतों पहा.

**विट**—हे महाब्राह्मणा, क्षमा कर क्षमा कर.

**विदू०**—( **विटास** पाहून ह्म० ) ह्याचा अपराध दिसत नाहीं. ( **शकारास** पाहून म्ह० ) ह्याचाच येथें अपराध दिसतो.

रे राजश्यालका, **संस्थानका**, दुर्जना दुर्मनुष्या, हें चांगलें नव्हे बरें. अरे जरी तो श्रेष्ठ **चारुदत्त** द्रव्यहीन झाला आहे, तरी त्याचे गुण साऱ्या **उज्जयनीनगरींत** प्रख्यात आहेत. तो तुला अगदीं तुच्छ वाटला ह्मणून त्याच्या घरांत शिरून त्याच्या परिजनाशीं दांडगाई करून त्याचा उपमर्द करतोस हें नीट नव्हे. तुला समजलें ?

श्लोक.

झाला असे धनविहीन ह्मणून यातें ॥
धिक्कारितोसि मनिं सोडुनियां नयातें ॥
किर्तीस रक्षुनि जरि धनहीन झाला ॥
मानूं नये तदपि निर्धन[1] त्या नराला ॥

**विट**-(वाईट वाटून) अरे महाब्राह्मणा क्षमा कर क्षमा कर. दुसऱ्या एका मनुष्याच्या भ्रांतीनें अशी गोष्ट आह्मांकडून घडली. केवळ दांडगेपणानें किंवा **चारुदत्ताचा** उपमर्द करावा म्हणून झाली असें नाहीं. जिचा डोळा आह्मांकडे तिलाच आम्ही सोधितों.

**विदू०**—ही तशी आहे काय ?

**विट**—छी छी असें नाहीं. दुसरी कोणी तरुण स्त्री होती. ती कोणीकडे पळाली. तिच्या शंकेनें ही अशी अमर्यादा आम्हांकडून घडली. तर आतां सर्व प्रकारें तुझी प्रार्थना करतों. ( असें म्हणून हातांतील खड्ग खालीं टाकून हात जोडून त्याच्या पायांवर डोकी ठेवतो. )

**विदू०**—हे भल्या माणसा, ऊठऊठ. हें मला ठाऊक नव्हतें म्हणून मी तुला असें बोललों. आतां मला समजलें. बोललों याबद्दल मीच तुला हात जोडतों.

**विट**—छी छी, असें नाहीं, आम्हाला तुझीच प्रार्थना करणें योग्य आहे. मला वचन देशील तर मी उठेन.

**विदू०**—कोणतें वचन पाहिजे, सांग.

---

१ दरिद्रावस्थापन्न.

विट—हें वर्तमान चारुदत्तास सांगणार नाहीं हें वचन.
विदू०—नाहीं सांगणार, हें घे वचन. ऊठ आतां.
विट—( उठून म्ह० ).

आर्या.

हा त्वत्प्रसाद विप्रा म्यां नत होऊनि मस्तकीं धरिला ॥
गुणशस्त्रानें अमुच्या शस्त्रांचा गर्व कीं तुवां हरिला ॥ ४९ ॥

शकार—(ईर्ष्येनें म्ह०) अरे विटा, कशाकरितां ह्या म्हाताऱ्या भटोरग्यापुढें मोठ्या विनयानें हात जोडन त्याचे पायां पडतोस?
विट—मी भ्यालों म्हणून.
शकार—तूं कोणाला भितोस?
विट—मी त्या चारुदत्ताच्या गुणांला भितों.
शकार—आतां कशाचे त्याचे गुण. त्याच्या घरीं कोणाला खावयास देखील मिळावयाचें नाहीं.
विट—अरे असें म्हणूं नको.

श्लोक.

देतां देतां धन निजजना हा असे क्षीण झाला ॥
कोणाचाही विभवसमयीं त्रास[1] यानें न केला ॥
रानीं डोहो विमलसलिलीं शैशिरीं[2] पूर्ण जो तो ॥
ग्रीष्मीं[3] जैसा बहुजनतृषा वारुनी शुष्क होतो ॥ ५० ॥

शकार—( रागावून ) हा कोणरे रांडलेक? कोणत्या बटकीच्या पोटचा? ज्याची येवढी प्रतिष्ठा सांगतोस?

श्लोक.

हा काय राधासुत कर्णवीर ॥
जटायु कीं भार्गव राम धीर ॥
कीं राम हा रावण इंद्रदत्त ॥
किंवा सहस्रार्जुन कुंतिजात ॥ ५१ ॥

---

१ कंटाळा. २ हिवाळ्यांत. ३ उन्हाळ्यांत.

**विट**—मूर्खा, तो नांवाचा श्रेष्ठ **चारुदत्त** आहे बरें. त्याची बरोबरी कोणी करणार नाहीं.

### ओंव्या.

हा दीनांचा कल्पतरू ॥ सज्जनांचा साह्यकारु ॥
विद्या संपत्तीचा भारू ॥ होतां फार लवलासे ॥ ५२ ॥
हा शिक्षितांचा आदर्श[1] ॥ उत्तमाचरणाचा निकष[2] ॥
सद्गुण रत्नांचा कोष[3] ॥ शीलवेलेचा समुद्र[4] हा ॥ ५३ ॥
हा सर्वांचा सत्कारकर्ता ॥ नव्हे कोणातें अवमानिता ॥
मित्रमंडळीचा संतोषदाता ॥ चतुर आणि उदार ॥ ५४ ॥
ऐसे विशेष गुण ज्याचे आंगीं ॥ तोच वांचला म्हणावा जगीं॥
येर ते भेततुल्य अभागी ॥ श्वासमात्र सोडिती ॥ ५५ ॥

असो चला आपण येथून जाऊं.

**शकार**—काय **वसंतसेनेला** घेतल्यावांचून ?

**विट**—ती तर तुला सोडून केव्हांच गेली.

**शकार**—कशी गेली बरें ?

**विट**—कशी गेली सांगूं. सांगतों ऐक.

### श्लोक.

अंधास दृष्टि जसि कीं अळशास सिद्धि ॥
रोग्यास पुष्टि जसि मूर्ख जनास बुद्धि ॥
जाते जशी त्यजुनि मंदमतीस विद्या ॥
गेली तशी त्यजुनि ती तुजला हि त्द्द्या[5] ॥ ५६ ॥

**शकार**—कसेंही असो, मी **वसंतसेनेस** घेतल्यावांचून जाणार नाहीं.

**विट**—मूर्खा, तुला हें कसें कळत नाहीं ?

### आर्या.

गज अंकुशें कपोलीं वळतो वाजी मुखीं लगामानें ॥
स्त्री त्द्दयीं सुगुणानें वश होय न आग्रहें न सामानें ॥ ५७ ॥

---

१ आरसा. २ कसोटी. ३ भांडार. ४ मर्यादशील. ५ मनोहरा.

हें साधन तुजपाशीं नाहीं, यासाठीं जावें हें बरें.

**शकार**—तुला जायाचें असेल तर तूं जा. मी जात नाहीं.

**विट**—बरें तर हा चाललों पहा. ( असें बोलून निघून जातो. )

**शकार**—अरे माझा मित्र विट खरेंच गेला. नाहींसा झाला. ( विदूषकाकडे पाहून म्ह० ) अहो काकपदशीर्षमस्तक दुष्ट बटुक हो, बसा बसा खालीं बसा.

**विदू०**—आम्हांला बसविलेंच आहे.

**शकार**—कोणीं ?

**विदू०**—दुर्दैवानें.

**शकार**—बरें तर उठा आतां.

**विदू०**—उठूं काळेंकरून.

**शकार**—केव्हां ?

**विदू०**—जेव्हां फिरून दैव अनुकूळ होईल.

**शकार**—अरे तर मग, रड रड.

**विदू०**—रडविलेंच आहे आम्हांला.

**शकार**—कोणीं ?

**विदू०**—दारिद्र्यानें.

**शकार**—बरें, हांस हांस.

**विदू०**—येव्हां नाहीं. हासूं पुढें.

**शकार**—केव्हां तर ?

**विदू०**—पुन्हा आमच्या **चारुदत्ताला** संपत्ति येईल तेव्हां.

**शकार**—अरे दुष्ट बटुका, माझा एक निरोप त्या तुझ्या भिकाऱ्या **चारुदत्ताला** सांगशील ? कीं, जिच्यापाशीं सोनें रुपें धन द्रव्य पुष्कळ आहे अशी ती कळवांतिणीची पोरगी **वसंतसेना** कामदेवाच्या उत्सवापासून तुजवर फिदा झाली आहे. आम्हीं बलात्कारानें तिला वश करीत असतां आतांच ती तुझ्या घरांत शिरली आहे. ती जर मुकाट्यानें मजकडे पाठवून देऊन माझ्या स्वाधीन होईल असें करशील तर

चावडीवर गेल्यावांचून माझा खटला त्वां उलगडला असें समजून मी तुझ्यावर पूर्ण प्रीति ठेवीन. आणि असें नकरशील तर मरणपर्यंत तुझें माझें वैर राहील. मी राजश्यालक संस्थानक आहें. आणीक त्याला सांग.

## ओवी.

देठीं गोमयें लिंपिलें कूश्मांड ॥ शुष्कशाक तळलें मासखंड ॥
हेमंतीं शिजविल्या भाताचा पिंड ॥ अतिकाळेंही न नासे ॥५८॥

आणखी त्याला म्हणावें, माझ्या पुढें चांगलें बोलत जा, हळू बोलत जा, आणि मी आपल्या रंगमहालाच्या गच्चीवर बसलों असतां ऐकूं येईल असें बोलत जा, असें जर बोलणार नाहींस, तर कवाडाच्या संधींत सुपारी चुरल्याप्रमाणें तुझें डोकें फोडून टाकीन.

**विदू०**—सांगेन, खचीत सांगेन तुमचा हा निरोप.

**शकार**—( एकीकडे तोंड करून म्ह० ) अरे **चेटा**, माझा मित्र विट खरेंच गेला कायरे !

**चेट**—तर तो अजून बसला आहे काय ?

**शकार**—तर मग चल आपणही लौकर जाऊं.

**चेट**—बरें तर घ्या ही आपली तरवार.

**शकार**—ही तुझ्याच हातीं असूं दे.

**चेट**—ही तुमची तुम्हीच घ्या. मला नको.

**शकार**—आण इकडे ( उलटी तरवार खांद्यावर टाकून म्ह० ) ही मी घेतली पहा.

## आर्या.

तरवार स्कंधावर घेतां हा मी पहा कसा दिसतों ॥
भोंकत असतां कुतरीं धांवुनि कोल्ह्यापरी घरीं घुसतों ॥५९॥

( असें बोलून दोघे निघून जातात. )

**विदू०**—गेले ? एकदांची पिडा टळली. बरें झालें. पण **रदनिके**, हा तुझा अपमान जो त्यांनीं केला तो आपल्या **चारुदत्तास**

सांगूं नये असें मला वाटतें. कांकीं तो अगोदरच दारिद्र्यानें पिडला आहे त्यांत हें त्यानें ऐकलें तर त्यास दुप्पट दुःख होईल.

**रदनिका**—आर्या **मैत्रेया**, मी नांवाची **रदनिका** आहें बरें. माझें तोंड माझ्या स्वाधीन आहे. तूंच मात्र संभाळ.

**विदू०**—खरेंच. तूं तशीच आहेस.

( इकडे **चारुदत्त रदनिका** आली असें समजून **वसंतसेनेला** म्हणतो. )

**चारु०**—अगे **रदनिके**, हा **रोहसेन**[१] वाऱ्यावर येथें निजला आहे खरा पण संध्याकाळच्या थंड वाऱ्यानें अगदीं कांकडला आहे. ह्यासाठीं ह्याला माजघरांत नेऊन निजीव आणि हा शेला त्याच्या आंगावर घाल.

( असें बोलून शेला तिच्याकडे फेंकतो. )

**वसंत०**—( मनांत ) अहो हा आपली दासी असें मला समजला आहे. असो, ( शेला हातीं घेऊन हुंगून मनांत म्ह० ) काय आश्चर्य हें. ह्या शेल्याला जाईच्या फुलांचा वास लावला आहे. ह्यावरून ह्याचें यौवन अजून उदासीन झालें नाहीं. ह्याची भोगेच्छा तरुण आहे असें दिसतें. (असें ह्मणून चोरून आपणच तो शेला पांघरते).

**चारु०**—अगे **रदनिके, रोहसेनाला** घरांत घेऊन जा ह्मटलें तें ऐकिलें कीं नाहीं ?

**वसंत०**—( मनांत ह्म० ) तुझ्या अंतर्गृहांत मीं जावें इतकें माझें भाग्य नाहीं.

**चारु०**—**रदनिके**, मी बोलतों ह्याचें उत्तर देखील देत नाहींसना! हरहर काय दुःख हें! असो काळच मजवर फिरला आहे तुह्मांकडे काय दोष आहे.

**श्लोक.**

जेव्हां हि भाग्यक्षय दुर्दशा नरा ॥

---

१ चारुदत्ताचा मुलगा.

येते अशी काळकृता सुदुर्धरा ॥
घेतात मित्रेंहि अमित्रता तदा ॥
कंटाळती लोकहि रक्त जे सदा ॥ ६० ॥

( इतक्यांत विदूषक आणि **रदनिका** येतात. )

**विदू**•—अरे मित्रा, ही आपली **रदनिका** संभाळ.

**चारु**०--काय? ही **रदनिका** आली ह्मणतोस? तर मग पहिल्यानें आली ती कोण? ती कोणी परस्त्री होती काय? हर हर!

आर्या.

न समजतां पांघरल्या मद्वस्त्रें ही विदूषिता झाली.

**वसंत**०—( मनांत ह्म० ) विदूषिता नव्हे, विभूषिता असें ह्मण.

**चारु**०—( उत्तरार्ध ह्मणतो. )

तरि शरदभ्राच्छादित चंद्र कळेचीच तुल्यता आली ॥ ६१ ॥

अथवा परस्त्रीचें दर्शन घेणें योग्य नव्हे.

**विदू**०—मित्रा परस्त्रीची शंका येथें नको. अरे ही वसंतसेना. कामदेवाच्या उत्सवापासून ही तुजवर अनुरक्त झाली आहे.

**चारुद**०—काय ही **वसंतसेना**! ( मनांत ह्म० )

दिंड्या.

हिनें माझ्या कामास जागवीलें[1] ॥
जगीं माझें वैभव क्षीण झालें ॥ ६२ ॥
क्रोध होतो कुपुरुषीं[2] व्यर्थ जैसा ॥
जिरे[3] माझ्या देहांत काम तैसा ॥ ६३ ॥

**विदू**०—हे मित्रा, राजश्यालकानें तुला कांहीं एक निरोप सांगू सांगितला आहे.

**चारु**०—कोणता निरोप?

**विदू**०—तो ह्मणाला, धनकनकसंपन्न अशी ही कळवांतिणीची पोरगी **वसंतसेना** कामदेवाच्या उत्सवापासून तुजवर फिदा झाली आहे. आह्मी बलात्कारानें वश करीत असतां ती आह्मांला सोडून तुझ्या घरांत शिरली आहे

---

१ काम जागृत केला. २ असमर्थ पुरुषीं. ३ लय पावे.

**वसंत०**—( मनांत ह्म० ) बलात्कारानें वश करीत असतां असें तो बोलला, हें जर खरें आहे तर हें बोलणें मला भूषणच आहे.

**विदू०**—ती जर मुकाट्यानें मजकडे पाठवून माझ्या स्वाधीन होईल असें करशील तर चावडीवर गेल्यावांचून माझा खटला तूं उलगडला असें समजून मी तुजवर पूर्ण प्रीति ठेवीन. आणि असें जर न करशील तर मरणपर्यंत तुझें माझें वैर राहील.

**चारु०**—( अवज्ञेनें. ) अः तो काय, मूर्ख आहे. ( मनांत ह्म० ) देवांगनांनीं जिची स्तुति करावी अशा योग्यतेची ही स्त्री आहे. ह्मणून त्यावेळेस हिनें.

श्लोक. 

घरामधें जा ह्मटलें हिला जरी ॥
गेली नसे पाहुनि निर्धना तरी ॥
वंदे बहू हे पुरुषांसवें सदा ॥
न बोलली एकहि शब्द कीं, तदा ॥ ६४ ॥

( उघडपणें ) हे वसंतसेने मी न जाणतां सेवकजनांस काम सांगावें तसें तुला मी सांगितलें. हा मजकडून मोठा अपराध घडला. ह्यासाठीं मी मस्तक नम्र करून प्रार्थना करतों कीं, मला क्षमा कर.

**वसंत०**—छी छी. हें काय करतां. तुमच्या आज्ञेवांचून मी येथें आलें येणेंकरून मीच अपराधी आहें ह्मणून मीच तुमच्या पायां पडून क्षमा मागून घेतें.

**विदू०**—अहो तुह्मी दोघेजणाही सुखासुखीं एकमेकांस नम्र होऊन शेतांतील साळीच्या लोंबरांप्रमाणें एकमेकांकडे डोकीं लववितां हें काय ? तर मीही उंटाच्या ढोंपराप्रमाणें आपलें मस्तक लववून तुह्मा दोघांस विनंती करितों.

**चारु०**—असो पायां पडणें राहूं दे आतां.

**वसंत०**—(मनांत ह्म०) काय याची रीत सभ्य आणि काय याचें भाषण मधुर ! असो आज अशा बरोबर येथें राहणें योग्य

नाहीं. याला हें ह्मणावें. (उघडपणें ह्म०) हे श्रेष्ठ पुरुषा, जर मजवर तुमची पूर्ण कृपा आहे तर मी विनंती करतें ही मान्य करावी. हे माझे अलंकार तुमच्या घरीं ठेवावे अशी माझी इच्छा आहे. कांकीं ह्या अलंकारांच्या लोभानें दुष्टांनीं माझी पाठ पुरविली आहे. ह्यासाठीं हे अलंकार आपणाजवळ ठेवा.

**चारु०**—ठेव ठेवण्यास हें घर मस्तुत अयोग्य आहे.

**वसंत०**—हें ह्मणणें व्यर्थ. मनुष्य पाहून कोणी ठेव ठेवतो, घर पाहून ठेवीत नाहीं.

**चारु०**—बरें तर. तुझी इच्छा असल्यास ठेव. मैत्रेया, घे तेवढे कोणते अलंकार ते.

**वसंत०**—या वेळीं आपण मजवर कृपा केली असें मी समजतें.

(असें ह्मणून अलंकार त्याच्या स्वाधीन करते.)

**विदू०**—(अलंकार घेऊन) गो तुझें कल्याण असो.

**चारु०**—छी मूर्खा, तिनें हा धर्म केला नाहीं. ठेव ठेविली आहे.

**विदू०**-(एकीकडे वळून ह्म०) जर असें असेल तर चोर कां नेईनात.

**चारु०**—ही थोडक्याच दिवसांनीं.

**विदू०**—ही आमची ठेव.

**चारु०**—परत होईल.

**वसंत०**—हे आर्या, आज्ञा होईल तर आतां मी ह्या मैत्रेयास बरोबर घेऊन आपल्या घरास जाईन असें ह्मणतें.

**चारु०**—बरें आहे, मैत्रेया, जा हिच्या बरोबर. हिला घरीं पोहोंचवून ये.

**विदू०**—नाहीं नाहीं. मी जाणार नाहीं. तुह्मीच जावें. ह्या कलहंसगामिनीच्या मागें तुह्मी चालला ह्मणजे राजहंसा सारखें शोभाल. मी आपला गरीब ब्राह्मण. चव्हाठ्यावर टाकलेल्या भाकरीला जशीं कुत्रीं लगटतात, तसे जिथे तिथे वाटेंत लोक माझ्या पाठीस लागून मला फाडून खातील. मी काय करूं!

**चारु०**—असें आहे काय? असो मीच स्वतां हिच्या बरोबर

जातों. तर राजमार्गांत मनुष्याची स्पष्ट ओळख पटण्याजोगी चांगली दिवटी पेटवावयास सांग.

**विदू०**—अरे **वर्धमानका** मोठी चांगली दिवटी पेटीव.

**वर्धमा०**-(एकीकडे तोंडकरून) अरे तेला वांचून दिवटी पेटते कशी!

**विदू०**-(आपणाशीं बोलतो.) अहो गणिका जशा स्नेहशून्य होऊन निर्धन पुरुषाचा अवमान करितात तद्वत् आमची दिवटी ही स्नेहशून्य[1] झाली !

**चारु०**—**मैत्रेया**, असू दे, आतां दिवटीचें कांहीं प्रयोजन नाहीं. पूर्वेकडे पहा.

श्लोक.

हा चंद्रमा उगवला गगनप्रदीप ॥
आहेत शुक्र[2] गुरु मंगळ ज्यासमीप ॥
ज्याचा कर[3]व्रज पडे ति[4]मिरांत सारा ॥
पंकांत जेंवि पडती शु[6]चिदुग्धधारा ॥ ६५ ॥

**वसंतसेनेच्या** बरोबर तिच्या घरापर्यंत जाऊन तिला प्रीतीनें ह्मणतो. अगे ( **वसंतसेने** ), हेंच तुझें घर. आंत जा.

**वसंत०**—बरें आहे. ( असें ह्मणून प्रीतिपूर्वक **चारुदत्ता** कडे पाहत पाहत निघून जाते. )

**चारु०**—मित्रा, **वसंतसेना** गेली, चल आतां आपण आपल्या घरास जाऊं.

आर्या.

मार्गीं नफिरे कोणी, करिती हे राजदूत संचार ॥
सावधपणें असावें, रात्रीं घडतात बा दंगे फार ॥ ६६ ॥

(इकडे तिकडे फिरून.) मित्रा हे सुवर्णाचे अलंकार रात्रीस तूं संभाळीत जा, आणि दिवसास **वर्धमानकानें** संभाळावे बरें?

**विदू०**—जशी आपली आज्ञा.

( असें बोलून सर्व निघून जातात. )

॥ **प्रथम अंक समाप्त.** ॥

---

१ तैल शून्य. २ मंगळ बृहस्पति शुक्र हे तारे. ३ किरणसमूह. ४ अंधकारांत. ५ चिखलांत. ६ शुभ्र.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक २.

स्थळ.

वसंतसेनेचें घर.

पात्रें.

चेटी.................. वसंतसेनेच्या आईची दासी.
वसंतसेना.............. कलावंतिणीची मुलगी.
मदनिका .............. वसंतसेनेची दासी.
संवाहक .............. पाय रगडण्याचें कसब करणारा.
माथुर ................ मुख्य द्यूतकार.
सभिक ............... द्यूतकाराचा हस्तक.
दर्दुरक................ हा एक द्यूतकार.
चेटी ................. वसंतसेनेची दासी.
कर्णपूरक.............. वसंतसेनेचा दास.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक २.

### प्रारंभ.

( तदनंतर एक **चेटी** ( दासी ) येते. )

**चेटी**—( आपणाशीं बोलते. ) मातेनें मला **वसंतसेने** कडे कांहीं निरोप सांगावयास पाठविलें आहे. ह्यासाठीं मी आतां **वसंतसेने** कडे जात्यें. ( इकडे तिकडे फिरून अवलोकन करून स्व० ) ही **वसंतसेना**, मनांत कांहीं चिंतन करीत बसली आहे. तर तिच्या जवळ जावें.

( इतक्यांत **वसंतसेना** उत्कंठित होत्साती येऊन आसनावर बसत्ये, आणि तिची दासी **मदनिका** जवळ उभी राहत्ये. )

**वसंतसेना**—अगे **मदनिके**, मग पुढें काय झालें.

**मदनिका**—पूर्वीं कांहींच भाषण नसतां पुढें काय झालें ह्मणून ह्मणतां हें कसें ?

**वसंत०**—ऑं—मी काय ह्मटलें गे ?

**मदनि०**—मग पुढें काय झालें असें.

**वसंत०**—( भुवयांस आंठ्या घालून ) ऑं—असें काय ?

( इतक्यांत पहिली **चेटी** जवळ येते. )

**चेटी**—**बाईसाहेब**, मातेनें तुह्माला सांगितलें आहे, कीं, आंग धुऊन लौकर देवांची पूजा करा.

**वसंत०**—अगे, आईला सांग कीं, मी आज आंग धूत नाहीं. ब्राह्मणाकडून देवांची पूजा करीव.

**चेटी**—बरें. ह्याप्रमाणें जाऊन सांगत्यें. (असें ह्मणून निघून जाते.)

**मदनि०**—बाईसाहेब, मी स्नेहभावानें विचारत्यें. कुड्याभावानें विचारीत नाहीं. खरेंच सांगा. तुह्मी मघां बोलला त्याचा आशय काय ?

**वसंत**०—तुला कसें वाटतें ?

**मदनि**०—तुमचें चित्त जाग्यावर नाहीं. ह्या वरून कोणी उत्तम पुरुष मनांत आणून त्याची इच्छा करीत आहां असें मला दिसतें.

**वसंत**०—त्वां चांगलें जाणलें. तूं **मदनिका** दुसऱ्याच्या मनांतील आशय जाणणारी खरी.

**मदनि**०—हें मला आवडलें. भगवान् कामदेव हा तरुणजनाचा मूर्तिमान आनंदच आहे. तर खरेंच सांग, कोणी राजा किंवा राजवल्लभ कोण तूं मनांत आणला आहे ?

**वसंत**०—राजा नाहीं किंवा राजवल्लभही नाहीं.

**मदनि**०-तर, विद्यालंकृत असा एखादा तरुण ब्राह्मण इच्छितेस काय?

**वसंत**०—छी छी, ब्राह्मण आपणास पूज्य आहे.

**मदनि**०—तर मग, अनेक नगरांत अनेक देशांत उदीम व्यापार करून संपन्न झालेला असा एखादा व्यापारी पाहतां वाटतें ?

**वसंत**०—तोही नाहीं. कारण कीं, अशा व्यापाऱ्यांशीं स्नेह केला तर त्यांस देशांतरीं द्वीपांतरीं जावें लागतें तेणेंकरून ते आपणावर प्रीति करणाऱ्या प्रियजनाचा त्याग करून जातात आणि त्यास मोठें विरहदुःख देतात.

**मदनि**०—राजा नाहीं, राजवल्लभ नाहीं, विद्वान ब्राह्मण नाहीं, किंवा व्यापारी नाहीं ह्मणत्येस, तर यांहून निराळा कोण तुला आवडला सांग.

**वसंत**०—अगे **मदनिके**, कामदेवाच्या यात्रेस मी गेलें होत्यें तेव्हां तूंचना मज बरोबर होतीस ?

**मदनि**०—होय. मीच होत्यें.

**वसंत**०—तर मग कां मला नवख्यासारखी पुसत्येस. तुला आठवण नाहीं काय ?

**मदनि**०—हो हो समजलें. तोचना ? ज्याला तुह्मी प्रार्थना केली आणि ज्यानें तुह्माला अभिवचन दिलें ?

**वसंत**०—त्याचें नांव काय बरें ?

**मदनि०**—तो आदित्यवार पेठेंत मोती चौकांत राहतो.

**वसंत०**—अगे मी त्याचें नांव विचारत्यें तें न सांगतां त्याचें ठिकाण सांगत्येस हें काय ? त्याचें नांव सांग.

**मदनि०**—अगे त्याचें नांव श्रेष्ठ **चारुदत्त**. तो साऱ्या नगरींत प्रख्यात आहे.

**वसंत०**—( हर्षपावून ) शाबास **मदनिके** शाबास. त्वां बरोबर सांगितलें. अगे तूं तरी मोठी चतुर आहेस.

**मदनि०**—( मनांत म्ह० ) ह्या पुरुषावर का हिनें मन ठेविलें ? ( उघडपणें ) अगे पण तो केवळ दरिद्री आहे असें ऐकत्यें.

**वसंत०**—म्हणूनच मी त्यास इच्छित्यें. गणिकेनें दरिद्री पुरुषाशीं स्नेह केला असतां तिला कोणी नांव ठेवीत नाहीं.

**मदनि०**—मला येवढें सांग. मोहोर गळून गेल्यावर आम्र वृक्षाचें सेवन मधुकरी[1] करतात काय ?

**वसंत०**—यामुळेंच त्यांचें नांव मधुकरी[2] असें पडलें आहे.

**मदनि०**—इतका जर तो तुझ्या मनाला आवडला तर लागलीच उठून कां त्याजकडे जात नाहींस ?

**वसंत०**—अगे कां जात नाहीं तुला समजलें ? जर अकस्मात् त्याजकडे जावें तर तो सांप्रत प्रत्युपकार करण्याविषयीं दुर्बळ आहे. ह्याजकरितां नजाणो कदाचित् त्याचें दर्शन पुन्हा दुर्लभ होईल. तसें नव्हावें म्हणून विचारांत पडल्यें आहे.

**मदनि०**—ह्या साठींच वाटतें त्याच्या घरीं अलंकार नेऊन ठेविले ?

**वसंत०**—मदनिके, बरेंगे तुझ्या लक्षांत आलें हें ! तूं तरी मोठी धूर्त आहेस.

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो. )

अरे **भट्टारका**[3], दहा मोहरांकरतां जो द्यूतकार[4] अडकावून ठेविला होता तो पळून चालला आहे. त्याला धर धर. तो

---

१ भ्रमरी. २ घरोघर मागून खाणारी. ३ द्यूतकारांचा नाईक. ४ जुवा खेळणारा.

पळतो आहे पहा. अरे धूर्ता, उभा रहा. मीं तुला दुरून पाहिलें. जातोस कुठे? उभा रहा.

( इतक्यांत पडदा एकीकडे सारून घाबऱ्याघाबऱ्या **संवाहक** द्यूतकार येतो. )

**संवाहक**—काय संकट हें! अहो हा **भट्टारक** इकडेसच येत आहे. हें आश्चर्य. आतां नवीन घातलेला लगाम तोडून गाढवी लाथा मारते तसा त्याच्या लाथांनीं मी ताडित होईन. किंवा **कर्णानें** सोडलेल्या शक्तीनें जसा **घटोत्कचाचा** घात झाला तसा माझा आज घात होतो, यांत संशय नाहीं.

## आर्या.

कार्यव्यग्रा **सभिका** बघुनि पळालों त्वरें सुटायाला ॥
आतां कोठें जावें या राजपथांत म्यां लपायाला ॥ १ ॥

असो आतां **सभिक** आणि **माथुरें** हे दोघें जोंपर्यंत मला दुसरी कडे शोधीत आहेत तोंपर्यंत येथून मागल्या पायांनीं ह्या शून्य देवालयांत जाऊन देवी होऊन बसावें म्हणजे झालें.

( असें बोलून थयथय नाचून देवळांत जाऊन देवी होऊन बसतो. )

( इतक्यांत **माथुर** द्यूतकार आणि **सभिक** द्यूतकार येतात. )

**माथुर**—अरे **भट्टारका**, दहा मोहरांकरितां जो **संवाहक** द्यूतकार अडकावून ठेवला होता तो दृष्टि चुकवून पळाला. त्याला धर धर. तो चालला आहे पहा. अरे धूर्ता, उभा रहा उभा रहा. मी दुरून तुला पाहिलें. जातोस कुठें. उभा रहा.

**सभिक**०—अरे आतां कोठें जातोस?

## आर्या.

जा पाताळीं किंवा इंद्राला शरण जा तरी तुजला ॥

१ द्यूतकाराचा हस्तक. २ द्यूतगृहाचा नायक.

एक्या सभिका वांचुनि रक्षाया रुद्रही नसेचि भला ॥ २ ॥

**माथुर—**

श्लोक.

पळुनि **सुसभिका** तूं जासि कोठें ठकारे ॥
नपळति जन ऐसे जे खरे खेळणारे ॥
स्खलन[2] समपथीं कां कांपती कां त्वदंगें ॥
विशद[3] कुळयशें कां लिंपिशी कृष्ण[4] रंगें ॥ ३ ॥

**सभिक॰**—( उमटलेलीं पावलें पाहून ) हा इकडून चालत गेला बरें. (पुढें पाहून) अहो आतां येथून पावलें दिसत नाहींत.

**माथुर**—( पाहून तर्क करतो. ) अरे हीं उलटीं पावलें उमटलीं आहेत. यावरून तो धूर्त द्यूतकार मागें मागें सरून मागल्या पावलांनीं ह्या शून्य देवालयांत शिरला असें दिसतें.

**सभिक॰**—तर मग चला आपण त्याचे मागें जाऊं.

**माथुर**—बरें तर चला.

( दोघे देवळांत शिरलेसें करतात, आणि एकमेकांकडे पाहून खुणेनें दाखवितात. )

**सभिक॰**—काय ही काष्ठाची प्रतिमा आहे ?

**माथुर**—अरे काष्ठाची नव्हे. ही पाषाणाची आहे.

( असें म्हणून त्याला हालवितो आणि चिमटे घेतो. तरी तो कांहीं हांचूं करित नाहीं. )

असो आपण येथेंच द्यूत खेळत बसूं.

( डाव मांडून द्यूत खेळत बसतात. )

**संवाहक**—( द्यूत खेळण्याची इच्छा उठली असतां, तिचें बलात्कारानें दमन करून आपणाशीं म्ह॰ ) अरे हा फांशांचा शब्द निर्धन पुरुषाचेंही चित्त क्षुब्ध करून आपणाकडे ओढितो. जसा दुंदुभीचा शब्द राज्यभ्रष्ट राजाचें चित्त ओढितो. मी जाणतों कीं हें द्यूतकर्म मेरु पर्वताच्या शिखरा वरून झाले-

---

[1] हे संवाहक द्यूतकारा. २ अडखळणें. ३ निर्मळकुळ यश. ४ कज्जलानें.

ल्या पतना प्रमाणें दुःखप्रद आहे, ह्मणून भल्यानें द्यूत कधीं खेळूं नये; तथापि हा फांशांचा शब्द कोकिलशब्दा सारखा माझ्या कानाला मधुर लागून मनाचें हरण करतो. काय करावें ?

**सभिक**—हा माझा डाव. माझा डाव.

**माथुर**—नाहीं. हा माझा डाव.

**संवाह०**—( आपण काय बोललों ह्याचें भान न राहतां एक्या बाजूनें अकस्मात् पुढें येऊन म्ह०) अरे तुमचा नव्हे. माझा डाव माझा डाव.

**सभिक०**—( त्याकडे पाहून ) अरे लुच्चा, सांपडलास. रे सांपडलास.

**माथुर**—( त्याला धरून ). अरे ठका, आम्हांला चुकवून पळालास काय ? आतां भला सांपडलास. टाक आमच्या दहा मोहरा.

**संवाह०**—मला खेळावयास तर द्या. मी आज देईन.

**माथुर**—नाहीं. आतांच दे.

**संवा०**-देईन म्हटल्यावर देईन. उगीच मला छळूं नका. कृपा करा.

**माथुर**—दे. दे तर. आतांच दे.

**संवाह०**—अरेरे माझें डोकें उठलें. पहा. ( असे बोलून भुईवर लोळण घेतो. त्याला दोघे जण बडवितात. )

**माथुर**—हा तूं द्यूतकार मंडळीच्या हातीं सांपडलास.

**संवाह०**—( उठतो आणि खिन्न होऊन म्ह०) काय मी द्यूतकार मंडळीच्या हातीं सांपडलों ? हाय हाय आतां द्यूतकारांचा कायदा मोडतां नये. मोहोरा दिल्या पाहिजेत. पण देऊं कुठून!

**माथुर०**—अरे कांहीं मोबदला दे.

**संवाह०**—हो तसें कांहीं करतों. ( माथुर द्यूतकारा जवळ जाऊन ) अर्धें मी देतों. अर्धें मला सोड.

**माथुर**—बरें कां होईना. अर्धें दे.

**संवाह०**—( **सभिक** द्यूतकारा जवळ जाऊन. ) अर्धं जर सोड-शील तर अर्ध्याचा मोबदला देईन.

**सभिक०**—कांहीं चिंता नाहीं. तसें कांहोईना.

**संवाह०**—( **माथुरास.** ) आर्या अर्धं तुवां सोडलेंना ?

**माथुर**—हो सोडलें.

**संवाह०**—(**सभिकाकडे** पाहून) आर्या, तूंपण अर्धं सोडलें ना.

**सभि०**—हो सोडलें.

**संवाह०**-राम राम. मी मोकळा झालों बरें. हा मीं चाललों पहा.

**माथुर**—अरे लुच्चा ठका, अशा ठकबाजीनें सुटून जाऊं पाहतोस काय ? मी **माथुर** आहें. जातोस कुठे ? टाक दहा मोहोरा.

**संवाह०**—पहा हो दादांनो, आतांच ह्यानें अर्धं सोडलें त्यानें अर्धं सोडलें असें असतां मला गरिबाला अडवून आतां सारेंच द्या ह्मणतात मी कोठून देऊं ?

**माथुर**—( त्याला धरून ) अरे लबाडा, मी **माथुर** आहें. तुज-पेक्षां पक्का आहें. तुझ्यानें मी ठकला जाणार नाहीं. चेष्टा करूं नको. आतांचे आतां सर्व द्रव्य टाकून दे. समजलास ?

**संवाह०**—खरें पण देऊं कोठून.

**माथुर**—आह्मांला काय विचारतोस. आपल्या बापाला विकून दे.

**संवाह०**—मला बाप कोठें आहे ?

**माथुर**—तर आईला विकून दे.

**संवाह०**—आई तरी कोठें आहे ?

**माथुर**—तर मग आपणाला विकून घे आणि आमचें देणें आ-म्हांला दे.

**संवाह०**—बरें तर कृपा करा आणि तुम्हीच मला बाजारांत घेऊन चला.

**माथुर**—हां चल तर चल. हो पुढें.

**संवाह०**—बरें बाबा हा चाललों. (इकडे तिकडे फिरून ह्मण-तो. ) हे श्रेष्ठ जनहो, दहा मोहोरा देऊन ह्या द्यूतकारापासून

मला कोणी विकत घ्या. (आकाशा कडे पाहून ह्म०) काय म्हणतां! हा कश्या करील? नाहीं नाहीं. मी तुमच्या घरचा सर्व कामें करणारा चाकर होईन. कां बोलांना. तसेच पुढें चालला. असो दुसऱ्यांस विचारतों. दादांनो तुह्मी तरी मला दहा मोहोरा देऊन विकत घ्या. हाही माझा तिरस्कार करून निघून गेला. हर हर काय सांगावें! माझा मित्र **चारुदत्त** ह्याचें वैभव नष्ट झाल्यामुळें मी द्यूतकर्मांत शिरलों, आतां दहा मोहरा देखील मला कोणी देत नाहीं. इतका मी दुर्दैवी झालों!

**माथुर**—हां दे लौकर.

**संवाह०**—मला कोणी विकत घेत नाहीं. आतां मी देऊं कोठून?

(असें बोलून खालीं पडतो. त्यास **माथुर** ओढतो.)

**संवाह०**—(ओरडतो) अहो मला मारलें. धांवां. धांवां. माझें रक्षण करा. मला सोडवा.

(इतक्यांत **दर्दुरक** येतो.)

**दर्दुरक०**—(आपणाशीं) अहा! द्यूत ह्मणजे पुरुषास एक राज्याचें सिंहासनच आहे. कांकीं, तो

### श्लोक.

मोजीत नाहींच पराभवातें ॥ देतो सदा मेळवितों धनातें ॥
राजापरी वैभवभोग घेतो ॥ संपन्न मित्रींच उपासिजे तो ॥४॥

आणखी हें द्यूत कसें आहे.

### आर्या गीति.

द्रव्यमिळे द्यूतानें, गृहदारा मित्रही मिळे द्यूतानें ॥
भोगघडे द्यूतानें, होतो सर्वस्व नाशही द्यूतानें ॥ ५ ॥

आणखी हें द्यूत असें आहे.

### ओवी.

तिरूक पडतां सर्वस्व जातें ॥ दुरूक पडतां शरीर शोषतें ॥

रेजा पडतां मन घाबरतें ॥ जावें वाटतें चौक पडतां ॥ ६ ॥

(पुढें पाहून ह्मणतों.) हा आमचा पहिला खेळावयाचा सोबती **माथुर** द्यूतकार इकडेस येत आहे. आतां येथून निघून जाणें तर कठीण आहे. परंतु बुरखा घेऊन आपणाला झांकून बसावें. (इकडे तिकडे उड्या मारून उभा राहतो आणि पांघरूणाकडे पाहून ह्मणतो.) हा शेला उलगडून पांघरावयाच्या लागीं नाहीं. याची घडी करून काखेंत घ्यावी ह्यांतच शोभा. कांकीं,

### श्लोक.

दारिद्र्य सूत्रांविषयीं पटा या ॥
छिद्रें बहू भूषविती पटाया ॥
मी पांघराया नशकें पटा या ॥
घडी सदा शोभवीते पटा या ॥ ७ ॥

अथवा, हा गरीब माझें काय करणार आहे? मी तर या वेळेस असा राहीन.

### श्लोक.

एक पाय गगनावरी ठेवितों ॥ भूतळींच दुसरें पद रोंवितों ॥
तोंवरी वरिच लोंबत राहतों॥ जोंवरी तपन हा वरि पाहतों ॥ ८ ॥

**माथुर**—हाँ—दहा मोहरा देवीव देवीव लौकर.

**संवाह॰**—आतां कोणाकडून देवऊं. ( त्यास **माथुर** ओढतो. )

**दर्दुरक**—हें काय पुढें खटलें चाललें आहे? (आकाशाकडे पाहून) काय ह्मणतोस? ह्या द्यूतकाराला **सभिक** छळतो त्याला कोणी सोडवीत नाहीं. त्याला **दर्दुरक** सोडवील. असें काय? (जवळ जाऊन) अरे एकीकडे व्हा वाट सोडा. (पाहून) काय हा **माथुर** धूर्त, आणि हा गरीब बिचारा **संवाहक**ही.

### श्लोक.

खालीं मस्तक आणि पायवरती ऐसा न जो टांगला ॥
ज्याच्या पाठिस ओढतां नपडला घट्टा सदा चांगला ॥

श्वानांनी नच ओढिलें तडतडा चावूनि अंगें जया ॥
दुर्भाग्या पुरुषास काय सतत द्यूतप्रसंगें तया ॥ ९ ॥

असो आतां **माथुराची** समजूत काढतों. (जवळ जाऊन) **माथुरा**, मी वंदन करतों.

**माथुर**—कोण **दर्दुरक**? **दर्दुरका** मीही तुला वंदन करितों.

**दर्दुरक**—हें काय खटलें आहे?

**माथुर**—ह्यानें माझ्या दहा मोहरा देणे आहेत.

**दर्दुरक**—अँ दहा मोहरा ह्मणजे कःपदार्थ.

**माथुर**—(**दर्दुरकाच्या** काखेंतून वस्त्राचा बोळा ओढतो.) गड्यांनो पहारे पहा. फाटकें वस्त्र पांघरणारा हा गृहस्थ दहा मोहरा कःपदार्थ ह्मणतो.

**दर्दुरक**—अरे मूर्खा, मी बसल्या बसल्या चटया विणीन तर दहा मोहरा फेंकून देईन. तूं काय समजलास? ज्यापाशीं पैका असतो तो काय कमरेस बांधून आणून दुसऱ्याला दाखवीत असतो? अरे तूं केवळ नीच मनुष्य आहेस.

## आर्या.

तूं नष्ट दुष्ट असमी रे दशसंख्याक मोहरा करितां ॥
पंचेंद्रिय युक्ताच्या प्राणाला लाजसी न संहरितां ॥ १० ॥

**माथुर**—अरे बाबा, दहा मोहरा तुला कःपदार्थ वाटतात पण मला त्या वैभवाचे जागीं आहेत.

**दर्दुरक—**असें आहे तर, मी सांगतो असें कर. तूंच ह्याला आणखी दहा मोहोरा द्याव्या आणि ह्यानें पुन्हा द्यूत करावें.

**माथुर**—असें केल्यानें काय होईल?

**दर्दु**०-जर ह्यानें डाव जिंकला तर तुझ्या दहा मोहरा हा परत देईल.

**माथुर**—आणि नाहीं जिंकला तर.

**दर्दुरक**०—तर देणार नाहीं.

**माथुर**—असलें पाचकळ बोलणें तुला योग्य नाहीं. तूं एवढा डौल दाखवितोस, तर तूंच देईनास त्याला? मी नांवाचा **माथुर** धूर्त

आहें. लबाडीचें द्यूत मी तुला दाखवीन. मी कोणाला भ्यावयाचा नाहीं आणि ठकावयाचा नाहीं. जा, तूं बेअब्रूचा आहेस.

**दर्दुरक**०—कोणरे बेअब्रूचा ?

**माथुर**—तूंच बेअब्रूचा.

**दर्दुरक**०—तुझा बाप बेअब्रूचा. कोणाला बेवकूब ह्मणतोसरे ? ( इकडे ह्याशीं असें बोलून, तिकडे **संवाहकास** पळून जाण्याविषयीं खूण करतो. )

**माथुर**—अरे वेश्यापुत्रा, तूं असेंच द्यूत खेळत असतोस काय ?

**दर्दुरक**०—होहो, मी असेंच खेळत असतों.

**माथुर**—अरे **संवाहका**, बऱ्या गोष्टीनें तूं आमच्या मोहोरा दे. नाहीं तर मग पहा.

**संवाह**०—आर्या देईन. खचीत देईन. ( **माथुर संवाहकाला** ओढतो. )

**दर्दुरक**०—मूर्खा, माझ्या मागें त्वां ह्याला मारलें असो. पण माझ्या समक्ष ह्याला मारशील काय ?

**माथुर**—हो मारतो पहा. ( असें बोलून **संवाहकाला** ओढून त्याच्या नाकावर मुष्टिप्रहार करतो. **संवाहकाच्या** नाकावाटे भळ भळ रक्त निघतें तेंपाहून तो मूर्छित होऊन भूमीवर पडतो. ) **दर्दुरक** जाऊन दोघांच्या मध्यें शिरतो. **माथुर** त्याला मारतो, **दर्दुरक** उलटून **माथुराला** मारितो.

**माथुर**—अरेरे दुष्टा शिनळीच्या पोरा, त्वां मला मारलें याचें फळ तूं लवकरच पावशील. बरें.

**दर्दुरक**०—अरे मूर्खा, म्यां तुला आज येथें भररस्त्यांत मारलें. उद्यां राजवाड्यांत मार खाशील तेव्हां पहाशील.

**माथुर**—हो हो बरें पाहीन जा.

**दर्दुरक**—कसा पाहशील ?

**माथुर**—( डोळे पसरून ह्म० ) असा पाहीन.

( इतक्यांत **दर्दुरक माथुराच्या** डोळ्यांत धूळ टाकतो.

आणि **संवाहकाला** पळून जाण्यास खूण करतो. तीच **संवाहक** पळून जातो.)

**दर्दुरक**—( आपल्या मनांत ह्म० ) द्यूतकारांचा नायक हा **माथुर** द्यूतकार. ह्याशीं म्यां कज्जा केला. तर आतां येथें राहणें नीट नाहीं. माझा प्रिय मित्र **शर्विलक** ह्यानें मला सांगितलें आहे कीं **आर्यक** नामा गोपाल पुत्र ह्यास तूं राजा होशील असें कोणी सिद्धानें सांगितलें आहे. ह्मणून माझ्यासारखे बहुत जण त्याला अनुसरले आहेत. तर मीही त्याजकडे जातों. ( असें ह्मणून निघून जातो. )

**संवाहक**—( भयानें पळतांना पुढें पाहून ह्मणतो. ) ह्या घराचा दरवाजा उघडा दिसतो. यांतच शिरावें असें ह्मणून **वसंतसेनेच्या** घरांत शिरतो आणि तिला पाहून ह्मणतो. नायकिणी मी तुला शरण आलों आहें.

**वसंत०**—शरणागतास अभय असो. अगे **चेटी** अगोदर दरवाजा लाव.

**चेटी**—हांजी बाईसाहेब. ( असें ह्मणून दरवाजा लावते. )

**वसंत०**—अरे गृहस्था, तुला भय कोणापासून झालें आहे ?

**संवाह०**—सावकारापासून.

**वसंत०**—मग चिंता नाहीं अगे चेटी, तर मग दरवाजा उघड.

**संवाह०**—( मनांत ह्म० ) सावकाराचें भय कसें असतें हें हिला ठाऊक आहे ही फार चांगली गोष्ट झाली. आपली शक्ति पाहून जो ओझें मस्तकावर घेतो तो चालतांना अडखळत नाहीं. आणि अरण्यांत विपत्ति पावत नाहीं. माझी स्थिति हिनें खचीत जाणली.

( तिकडे **माथुर** आणि **सभिक**. )

**माथुर०**—( डोळे पुसून ) अरे दे दे लौकर आमच्या मोहरा.

**सभिक०**—हे भट्टारका, **दर्दुरकाशीं** आपला कज्जा चालला होता त्या संधीस तो पुरुष पळून गेला.

**माथुर**०—तो पळाला काय ? बरें कांहीं चिंता नाहीं. मी त्याच्या नाकावर बुकी मारिल्यामुळें त्याच्या नाकांतून रक्त वाहत होतें. त्या रक्ताचे थेंब वाटेनें पडले असतील. त्या मार्गावर त्याचा शोध काढीत जाऊं चला. ( असें म्हणून त्याला सोधीत जातात. )

**सभिक**—अरे **भट्टारका**, तो **वसंतसेनेच्या** घरांत शिरला असें वाटतें.

**माथुर**—तर आपल्या मोहोरा बुडाल्या.

**सभिक**०—चला आपण सरकारांत जाऊन सांगूं.

**माथुर**—आपण गेलों तर तो धूर्त येथून निघून दुसरीकडे पळून जाईल. या साठीं त्याला येथेंच अडवून धरलें पाहिजे. ( असें म्हणून तेथेंच उभे राहतात.

**वसंत**०—( त्याचा वृत्तांत विचारून घेण्यास मदनिकेला खूण करित्ये. )

**मदनि**०—तुह्मी कोण, कोणाचे, कोठून आलां, तुह्मी उपजीविका कशानें करतां, तुह्मास भय कोणाचें कशामुळें आहे हें कृपा करून सांगावें असें माझ्या बाईसाहेबाचे मनांत आहे.

**संवाह**०—ऐका मी सांगतों सारें. **पाटलिपुत्रनगरांत** माझें जन्म झालें. माझ्या बापाचें नांव **गृहपति**. मी संवाहकाची वृत्ति ( आंग रगडण्याचें काम ) करून पोट भरतो.

**वसंत**०—आपण ही फार नाजूक कला शिकलां आहां.

**संवाह**०—अहो, मी पहिल्यानें सहज कला ह्मणून शिकलों, पण आतां तीच माझ्या उपजीविकेस साधन झाली.

**मदनि**०—हें आपण फार खेदाचें उत्तर दिलें. असो पुढें सांगा.

**संवाहक**—असा मी आपल्या घरीं असतां यात्रेकऱ्यांच्या मुखापासून देशोदेशींच्या चमत्कारिक गोष्टी ऐकून अपूर्व देश पाहण्याच्या कौतुकानें इकडे आलों. ह्या **उज्जयनी** नगरींत येतांच मला एक यजमान मिळाला. त्याची शुश्रूषा मी

कांहीं दिवस केली. तो पुरुष फार गुणी आहे. देखणा तसाच. गोडबोलणाराही तसाच. आपण केलेला उपकार कधीं उच्चारीत नाहीं, आणि दुसऱ्यानें केलेला अपकार कधीं विसरत नाहीं. शरणागताचें रक्षण करण्याविषयीं तत्पर. फार काय सांगावें. तो ह्मणतो, हा माझा देह परोपकाराकडे लावण्यासाठीं मला देवानें दिला आहे. असे त्याचे गुण किती सांगूं.

**मदनिका**—( वसंतसेनेस ह्म० ) बाईसाहेब, तुमचा जो मूर्तिमंत मनोरथ त्याचे गुण चोरून **उज्जनी** नगरीस शोभविणारा असा हा कोण पुरुष असेल बरें.

**वसंत०**—शाबास मदनिके शाबास. त्वां चांगला तर्क केला, माझ्याही मनांत हाच विचार आला. असो पुढें ऐकूं काय सांगतो तें.

**मदनि०**—बरें पुढें कसें झालें.

**संवाह०**—बाई गे पुढें काय सांगूं. तो सत्पुरुष दुसऱ्या वर दया करून धनाचा व्यय करितां करितां.

**वसंत०**—काय निर्धन झाला म्हणतां ?

**संवाह०**—मी न सांगतां तुम्हांला हें कसें समजलें ?

**वसंत०**—ह्यांत समजावयाचें तें काय. उघडच आहे कीं गुण आणि वैभव एकत्र राहत नाहींत. नासक्या तळ्याला पाणी पुष्कळ असतें.

**मदनि०**—अहो त्यापुरुषाचें नांव काय बरें सांगा.

**संवाह०**—अगे जो पृथ्वीवरचा मनुष्यरूपी केवळ चंद्रच अशा त्या सत्पुरुषाचें नाव जाणत नाहीं असा कोण आहे ? तो **रविवार पेठेंत माणिक** चौकांत सावकारांच्या ओळीस राहतो. त्याचें नांवच विचाराल तर श्रेष्ठ **चारुदत्त**.

**वसंत०**—( हर्षपावून बैठकी वरून खालीं उतरते. ) महाराज हें आपलें घर आहे. अगे **मदनिके**, ह्यांना बसावयास गालि-

चा दे आणि हातीं ताडाचा पंखा घेऊन वारा घाल यांस फार श्रम झाले आहेत.

**मदनि०**—( सांगितल्याप्रमाणें करते )

**संवाह०**—( मनांत म्ह० ) काय हो आश्चर्य हें ! त्या श्रेष्ठ **चारुदत्ताचें** नाव सांगतांच एवढा माझा आदर झाला. शाबास **चारुदत्ता** शाबास. पृथ्वीच्या पाठीवर जिवंत असा तूंच. बाकीचे श्वास मात्र सोडणारे होत. ( पायापडून म्ह० ) असो नायकिणी तूं पण आसनावर बैस.

**वसंत०**—( आसनावर बसून म्ह० ) हे श्रेष्ठा तुमचा धनिक कोठें आहे ? आतां त्यापाशीं कोणतें धन !

**संवाह०**—आतां त्याजपाशीं धन म्हणाल तर.

श्लोक.

सत्कार आहे धन ज्या नराला ॥
म्हणूं धनी सज्जन ही तयाला ॥
पूजा पराची मनिं ज्यास बाणे ॥
पूजाविशेषास हि तोच जाणे ॥ ११ ॥

**वसंत०**—मग पुढें काय ?

**संवाह०**—नंतर मला वेतन करून संवाहकपणाचे कामावर चाकरीस ठेविलें. पुढें जेव्हां तो निर्धन झाला तेव्हां मी त्याला सोडून द्यूतकर्मांत शिरलों. आणि त्यावरच उपजीविका करूं लागलों. पण त्यांतही माझें दैव फिरलें तेव्हां दहा मोहरा मी द्यूतांत हरलों. त्या द्यावयास मजपाशीं नाहींत, म्हणून द्यूतकारमंडळीनें माझे फार हाल केले. मग उपाय चालेना तेव्हां पळून मी इकडे आलों.

**माथुर**—अरे, यानें आम्हांला ठकविलें. अरे यानें आम्हांला बुडविलें.

**संवाह०**—हेच ते द्यूतकार माझ्या मागें लागून आले आहेत. त्यांचें

भाषण ऐकलेंच असेल. ह्यावर आपली मर्जी असेल तसें करावें.

**वसंत०**—अगे **मदनिके**, वासपादप[1] पत्रपुष्पफलांनीं रहित झाला म्हणजे त्याजवर राहणारे पक्षी इतःस्ततः निघून जातात. तशी अवस्था ह्याची झाली आहे. असो त्या द्यूतकारांकडे जाऊन सांग कीं **संवाहकानेंच** हें तुम्हांस दिलें आहे असें म्हणून हें सुवर्ण कंकण त्यांस दे. (असें बोलून हातांतून कंकण काढून दासीच्या स्वाधीन करत्ये.)

**मदनि०**—(कंकण घेऊन) आज्ञा बाई साहेब. तसेंच करत्ये. (असें म्हणून बाहेर जात्ये.)

**माथु०**—अरे ह्यानें आम्हांस ठकविलें. अरे यानें आम्हांला बुडविलें.

**मदनि०**—(मनांत.) जेव्हां हे दोघे वर पाहतात, दीर्घ सुसकारे टाकतात, विचार करतात, एकमेकाशीं खलबत करतात आणि दरवाज्याकडे दृष्टि लावून उभे आहेत. तेव्हां हेच द्यूतकार असतील. (उघडपणें.) भले गृहस्थांनो, मी तुम्हांला दंडवत करत्यें.

**माथुर**—तुझें कल्याण असो.

**मदनि**—तुम्हां उभयतांत मुख्य द्यूतकार कोण?

**माथुर**—तूं कोणाची कोणगे? रति समयीं तुझा ओंठ कोणी घावला आहे असें दिसतें. तूं मनोहर भाषण करतेस, आणि कटाक्ष दृष्टीनें आम्हांकडे पाहतेस पण आम्हांपाशीं पैका मिळावयाचा नाहीं, जा दुसरी कडे.

**मदनि०**—जेव्हां तूं अशीं हलकीं भाषणें करतोस तेव्हां तूं द्यूतकार नव्हेस असें वाटतें. असो, तुमचा कोणी देणेदार आहे काय?

**माथुर**—होय आहे. एक जण आमच्या दहा मोहोरा लागतो पण त्याचें काय येथें?

**मदनि०**—त्याच्याकरतां माझ्या धणिनीनें हें सुवर्णकंकण तुम्हांस दिलें आहे. नाहीं नाहीं चुकलें. तुमच्या देणेदारानेंच तु-

---

[1] रहावयाचें झाड.

म्हांला दिलें आहे. हें घ्या (असें बोलून कंकण त्यांला देत्ये.)

**माथुर**—( मोठ्या हर्षानें तें घेऊन म्ह० ) अगे त्या गृहस्थाला सांग कीं तूं ऋणमुक्त झालास. आतां पुनः आम्हांबरोबर द्यूत करावयास ये. ( असें बोलून निघून जातात. )

**मदनि०**—( वसंतसेनेकडे येऊन. ) बाईसाहेब ते द्यूतकार कंकण घेऊन संतुष्ट होऊन गेले.

**वसंत०**—( संवाहकास म्ह० ) आर्या आतां आपण आपल्या मनुष्यांस भेटावयास जावें.

**संवाह०**—आर्यें ज्याअर्थी त्वां मजवर एवढा उपकार केला त्या अर्थी मजकडून कांहीं प्रत्युपकार व्हावा म्हणून मजपाशीं जी कला आहे ही मी तुझ्या परिजनास शिकवितों.

**वसंत०**—आर्या, ज्या करतां ही कला शिकावयाची त्याची शुश्रूषा आपण पूर्वी केली आहे, आणखी पुढेंही करावी म्हणजे झालें.

**संवाह०**—( मनांत म्ह० ) हिनें तर मला अगदींच झिडकारलें. आतां हिजवर प्रत्युपकार कसा करावा ? ( उघडपणें म्ह० ) आर्यें माझा द्यूतकाराचा त्वां असा अवमान केला त्या अर्थी आतां मी जती होतों. तर **संवाहक** द्यूतकार जती झाला येवढ्या गोष्टीचें स्मरण ठेव बरें.

**वसंत०**—आर्या असें साहस करूं नये.

**संवाह०**—आर्यें निश्चय केला तो केलाच, आतां फिरावयाचा नाहीं. हा जती[1] झालों पहा. ( असें म्हणून इकडे तिकडे फिरून म्ह० )

## आर्या.

द्यूतानें मी झालों लाजिरवाणा समस्त लोकांत ॥
आतां करून उघडा माथा हिंडेन राजमार्गांत ॥ १२ ॥

इतक्यांत पडद्यापलीकडे गलबला होतो.

---

१ बुद्धधर्मांतील संन्याशास जती म्हणतात.

**संवाह०**—( ऐकून ) हें काय आहे ? ( आकाशाकडे पाहून म्ह० ) काय म्हणतां ? **स्तंभभंजक** नामा **वसंतसेनेचा** क्रीडागज मस्त होऊन सुटला आहे ? वाहवा ! तिचा मदोन्मत्त गज कसा आहे तो जाऊन पाहूं बरें. अथवा हत्ती पाहून मला काय करावयाचें आहे. मी जो निश्चय केला आहे त्याप्रमाणें जाऊन करतों. ( असें बोलून निघून जातो. )

( तदनंतर पडदा वर सारून शिपायाचा वेष धरणारा हर्षयुक्त **कर्णपूरक** येतो. )

**कर्णपूरक**—कुठे कुठे ती आर्या **वसंतसेना** कुठे आहे ?

**मदनि०**—अरे दांडग्या, तूं इतका बावरलास कां ? ही तुझ्या समोर आर्या **वसंतसेना** असतां तिला पाहत नाहींस आणि कुठे आहे कुठे आहे म्हणतोस हें काय ?

**कर्णपू०**—( **वसंतसेनेला** पाहून ) आर्ये तुला प्रणाम करितों.

**वसंत०**—**कर्णपूरका**, तुझ्या मुखश्रीवरून तूं संतोषांत आहेस असा दिसतोस. ह्याचें काय कारण ?

**कर्णपू०**—( विस्मय करून ) आर्ये तूं चुकलीस. आज **कर्णपूरकाचा**, पराक्रम त्वां पाहिला नाहीं.

**वसंत०**—**कर्णपूरका**, असा कोणता पराक्रम त्वां केला ?

**कर्णपू०**—ऐक सांगतों. तुझा खेळावयाचा **स्तंभभंजक** नामा जो दुष्ट हस्ती तो सांखळदंड तोडून महाताला मारून उन्मत्त होऊन राजमार्गांत आला तेव्हां सारे लोक भयानें घाबरे होऊन ओरडूं लागले.

आर्या.

उचला पोरें सत्वर धांवत आला पुढें पहा हस्ती ॥
वृक्षप्रासादशिरीं आरूढा हा करीतसे मस्ती ॥ १२ ॥

त्या दुष्ट हस्तीनें पायांतले पैंजण, तोरड्या, गळ्यांतील रत्नांच्या माळा तोडून रानोमाळ टाकल्या आणि सोंड, दांत, पाय ह्यांनीं प्रफुल्लित कमलवनाप्रमाणें **उज्जयनी** नगरीचा

विध्वंस करून मार्गात जाणारा एक जती गांठला. त्याचा दंड कमंडलु फोडून तोडून तोंडांतल्या थुंकीनें त्याला भिजवून दांतांनीं तो वर उचलला. हें पाहून पुनः लोक ओरडूं लागले कीं अरे जती मेला रे जती मेला.

**वसंत॰**—( घाबरून ) काय प्रमाद हा ! काय प्रमाद हा !

**कर्णपू॰**—आर्यै घाबरूं नको. पुढला वृत्तांत ऐक. तो मत्त गज एका दांतावर तुटका सांखळ दंड, आणि एका दांतावर जती घेऊन चालला आहे असें पाहून म्यां **कर्णपूरकानें**, नाहीं नाहीं आर्यैच्या अन्नानें पुष्ट झालेल्या या दासानें सत्वर जाऊन लोहाराच्या दुकानांतून एक लोखंडाची पहार घेऊन त्या दुष्ट गजास हांक मारली.

**वसंत॰**—मग पुढें काय झालें ?

**कर्णपू॰**—मग, विंध्यपर्वताच्या शिखरा सारखा अति उच्च जो गज त्याला पहारेचा प्रहार करून त्याच्या दांताच्या संधींत सांपडलेला जती सोडविला.

**वसंत॰**—शाबास **कर्णपूरका** चांगलें काम केलें त्वां.

**कर्णपू॰**—तेसमयीं शाबास, **कर्णपूरका** शाबास, असें म्हणत सारी **उज्जयनी** माझ्या भोंवतीं मिळाली त्यामुळें जशीं नांवेंत गच्च माणसें भरावीं तशी एके ठिकाणीं माणसांची दाटी झाली. इतक्यांत काय चमत्कार झाला कीं, त्या दाटींत एक पुरुष होता त्यानें कर्ण, कंठ, मणगट, इत्यादि जीं भूषणस्थानें तीं चांचपून पाहिलीं तों तेथें कांहीं नाहीं. मग खिन्न झाल्या सारखा होऊन आकाशाकडे पाहून दीर्घ श्वास सोडला आणि आपल्या आंगावरचा शेला काढून माझ्या आंगावर टाकून दिला. असा तो गुणज्ञ पुरुष त्या मंडळींत मी पाहिला. तो-हा शेला पहा.

**वसंत॰**—**कर्णपूरका**, पहा बरें, त्या शेल्याला जाईच्या फुलांचा वास येतो कीं काय तो.

**कर्णपू०—आर्ये,** माझ्या नाकांत हत्तीच्या मदाचा गंध शिरला आहे. यामुळें फुलांचा वास मला समजत नाहीं.

**वसंत**—बरें, त्यावर नांव कोणाचें आहे पहा.

**कर्णपू०**—यावर नांव आहे, पण मला वाचतां येत नाहीं. आपणच वाचावें. ( असें म्हणून तो शेला **वसंतसेनेच्या** हातीं देतो.

**वसंत०**—( नांव वाचून. ) ह्यावर नांव आर्य **चारुदत्ताचें** आहे. (असें म्हणून तो शेला मोठ्या आवडीनें आपण पांघरित्ये.)

**मदनि—कर्णपूरका,** हा शेला आर्येच्या आंगावर चांगला शोभतो, नाहीं बरें ?

**कर्णपू०**—ऑ—काय म्हणतेस! आर्येच्या आंगांवर चांगला शोभतो काय ? शेला कोणाचा आहे ?

**वसंत०—कर्णपूरका,** या शेल्या बद्दल मी तुला दुसरें बक्षीस देत्यें हें घे ( असें म्हणून त्याला सुवर्णभूषण देत्ये. )

**कर्णपू०**—( तें भूषण मस्तकीं वंदून तिला प्रणाम करून म्ह० ) आतां आर्येच्या आंगावर शेला चांगला शोभतो खरा.

**वसंत०—कर्णपूरका,** यासमयीं तो पुरुष कोठें असेल बरें ?

**कर्णपू०**—याच वाटेनें तो घराकडे गेला.

**वसंत०—मदनिके** आपण दरवाज्या वरच्या माडीवर जाऊन **चारुदत्ताला** पाहूं चल. ( असें झाल्यावर सर्व निघून जातात, )

**दुसरा अंक समाप्त.**

---

# मृच्छकटिक नाटक.



## अंक ३.

स्थल.

चारुदत्ताचें घर.

पात्रें.

| | |
|---|---|
| चेट. | चारुदत्ताचा सेवक. |
| चारुदत्त | सावकाराचा पुत्र. |
| विदूषक | चारुदत्ताचा मित्र. |
| वर्धमानक | चारुदत्ताचा सेवक. |
| शर्विलक | घरफोड्या चोर. |
| रदनिका | चारुदत्ताची दासी. |
| धृता | चारुदत्ताची स्त्री. |



# मृच्छकटिक नाटक.

## अंक ३.

### प्रारंभ.

तदनंतर एक चेट ( दास ) येतो.

**चेट**—( आपणाशीं बोलतो. ) धनी असावा तर असा असावा.

**आर्या.**

भृत्याचा कनवाळू[1], साधू निर्धनहि शोभतो स्वामी[2] ॥
दुर्जन धनगर्वित जो, तो दे स्वजनास दुःख परिणामीं ॥ १ ॥

**आर्या.**

सुजन स्वभृत्यपालक, धनहीनहि आवडे समस्तांला[3] ॥
जो धनगर्वें मिरवे, पुसती कोणी तया न मस्तांला[4] ॥ २ ॥

आणखी **श्लोक.**

खायाशेत सवंकला बइल तो वारावया शक्य न ॥
झाला जो परदारलंपटहि तो वारावया शक्य न ॥
द्यूतक्रीडनसक्त जो मनुज तो वारावया शक्य न ॥
जो स्वाभाविक दोषतोहि मनुजा वारावया शक्य न ॥ ३ ॥

माझा धनी आर्य **चारुदत्त** गाणें ऐकावयास गेला त्याला किती वेळ झाला. मध्यरात्र होऊन गेली. अद्यापि येत नाहीं. तर आतां मी बाहेरच्या देवडीवर जाऊन निजतों. ( असें बोलून तेथें जाऊन निजतो. )

इतक्यांत **चारुदत्त** आणि **विदूषक** उभयतां येतात.

**चारुदत्त**—काय सांगावें **मैत्रेया** आज **रेभिलानें** गाणें फार चांगलें गायलें वाहवा. शाबास. आणखी **मैत्रेया** वीणा[5] वाद्य तरी किती गोड वाजतें ! हें एक पंधरावें[6] रत्नच होय. ) हें समुद्रापासून मात्र निघालें नाहीं.

---

१ दयाळू. २ धणी. ३ सर्वांला. ४ धनमत्ताला. ५ सारंगी किंवा सतार. ६ चवदा रत्नांखेरिज हें रत्न.

### श्लोक.

उत्कंठितास त्त्हृदयानुगुणा प्रिया हे ॥
जायास वेळ सहजांत विनोद आहे ॥
चित्तास शांत करण्याविषयीं प्रवीणा ॥
वाद्यांत वाद्य सुखदायक हेच वीणा ॥ ४ ॥

**विदू०**—मित्रा चल आतां घरीं जाऊं, मला झोंप येते.

**चारुद०**—अहो **रेभिलानें** फार चांगलें गायलें.

**विदू०**—मला दोघांचें हांसू येतें. एक संस्कृत शब्द वाचणारी स्त्री, आणि दुसरा नक्कींत गाणारा गवई. स्त्री संस्कृत शब्द वाचूं लागली म्हणजे नुकतेंच नाक टोंचून वेसण घातलेल्या गाई-सारखी सूं सूं शब्द करते आणि गवई तर, अ अ अ असा आलाफ करून गाऊं लागला म्हणजे सुकल्या फुलांच्या माळा गळ्यांत घालून मंत्र म्हणणाऱ्या वृद्ध पुरोहिताप्रमाणें वाटतो. तो तर मला अगदींच आवडत नाहीं.

**चारु०**—मित्रा, खरेंच आज **रेभिलानें** फार सुंदर गाणें गायलें, तुला तें गोड लागलें नाहीं ? वाहवा !

### आर्या.

सुस्वर मधुर मनोहर भावयुत स्पष्ट सम असें गाणें ॥
ऐकुनि तृप्ति न झाली कोणास हि, गायलें असें त्याणें ॥ ५ ॥

### आणखी आर्या.

गाणें तसेंच निरुपम बोलुनियां फार काय वानावें ॥
गायास आड बसतां गाते हे स्त्री असेंच मानावें ॥ ६ ॥

आणखी

### श्लोक.

त्याचें गान खरें मनोहर तसें अन्यानसे साधलें ॥
श्रोत्याचें मन कर्मकौशल्यगुणें कीं सर्वथा वेधलें ॥
गाणें संपुन दोनचार घटिका झाल्या तथापि ध्वनी ॥
कानीं आझुनिही तसाच घुमतो माझ्या वसे जो मनीं ॥७॥

---

१ गाने कर्मांची कुशलता.

**विदू०**—हे मित्रा, बाजारच्या रस्त्यांत जागोजाग कुत्रीं देखील स्वस्थ निजलीं, तर आपण घरीं जाऊं चल. ( पुढें पाहून म्ह० ) मित्रा पहा, पहा हा भगवान् चंद्रमा अंधकाराला स्थळ देत होत्साता अंतरिक्षप्रासादापासून खालीं उतरत आहे.

**चारु०**—मित्रा, तूं चांगलें बोललास.

**श्लोक.**

हा चंद्र देत स्थळ अंधकारा ॥
अस्तासि जातां दिसतात कोरा[1] ॥
डोहीं बुडे सर्व शरीर ज्याचें ॥
जाणो विषाणाग्रचि[3] त्या गजाचें ॥ ८ ॥

**विदू०**—अहो हेंच आपलें घर. ( हांका मारतो ) अरे **वर्धमानका**, दार उघड.

**वर्धमा०**—**मैत्रेयानें** हांक मारलीशी वाटते. आर्य **चारुदत्त** आला वाटतें. त्याला दार उघडलें पाहिजे. ( उठून दार उघडतो. ) आर्या, मी वंदन करतों. आर्या **मैत्रेया**, तुलाही वंदन करतों. हें बसावयास घातलें आहे. यावर बसावें ( दोघे घरांत गेल्यासारखे करून खालीं बसतात. )

**विदू०**—**वर्धमानका** धन्याचे पाय धुण्या करितां **रदनिकेला** हांक मार.

**चारु०**—( सदयपणानें म्ह० ) निजलेल्या मनुष्यास कशाला उठवितोस ?

**वर्धमा०**—अरे **मैत्रेया**, मी पाणी घालतों तूं पाय धू.

**विदू०**—हे मित्रा, हा दासीपुत्र असतां आपण पाणी घालणार आणि मज ब्राह्मणा कडून पाय धुवविणार काय ?

**चारु**—मित्रा **मैत्रेया**, तसें नाहीं. त्वां पाणी घालावें. आणि **वर्धमानकानें** पाय धुवावे.

**वर्धमा०**—बरें तर **मैत्रेया** तूं पाणी घाल. मी पाय धुतों.

---

१ टोकें. ३ दंताचें अग्र.

**विदू०**—( तसें करतो. आणि **वर्धमानक चारुदत्ताचे** पाय धुऊन मागें सरतो. )

**चारु०**—**वर्धमानका** ह्या ब्राह्मणास पाय धुवायास पाणी दे.

**विदू०**—मला पाय धुऊन काय फळ. फिरून मला गाढवा सारखें भुईवर लोळावयाचें आहेच.

**वर्धमा०**—**मैत्रेया**, तूं ब्राह्मण आहेस नापण ?

**विदू०**—अरे सर्व नागांमध्यें जसा **डुंडभनाग**[1] तसा सर्व ब्राह्मणांमध्यें मी ब्राह्मण आहें.

**वर्धमा०**—तथापि आपले पाय मला धुतले पाहिजेत. थांबा धुतों ( त्याचे पाय धुऊन म्ह० ) आर्या **मैत्रेया** ही दागिन्यांची गांठोडी. दिवसास माझी आणि रात्रीस तुझी. ही घे आपली संभाळ. ( **मैत्रेयाच्या** स्वाधीन गांठोडी करून आपण निघून जातो.

**विदू०**—( ते दागिनें आपल्या जवळ घेऊन म्हणतो. )

हे दागिने अद्यापि बरेच टिकले आहेत. ह्या **उज्जयनी** नगरींत कोणी चोर नाहीं काय ? जो रांडलेक ह्या निद्रा चोरणाऱ्या धनाला चोरून नेत नाहीं. मित्रा हें गाठोंडें अंतरगृहांत नेऊन ठेऊं ?

**चारु०**—नको नको.

## आर्या.

ह्या गणिकेचा ठेवा याला अंतर्गृहीं नको नेऊं ॥
तुजपाशींच असूं दे जोंवरि आपण तिचा तिला देऊं ॥ ९॥

( आंथरुणावर बसून झोंपेची गुंगी आल्यासारखें करून त्याचें गान खरें मनोहर असें इत्यादि पूर्वोक्त श्लोक पुन्हा म्हणतो. )

**विदू०**—मित्रा झोंप आली काय ?

**चारु०**—हो आली तर काय झालें.

---

[1] डुंडुभनाग निर्विष असतो. तो जसा नावाचा नाग तसा मी नांवाचा ब्राह्मण.

श्लोक.

ही झोंप डोळ्यांत शिरे भरारां ॥
येते ललाटावरुनी झरारां ॥
अदृश्य रूपाच जरा न राहे ॥
शरीरसत्वास हरून राहे ॥ १० ॥

**विदू०**—तर आपण निजूं आतां.

( दोघे पांघरून घेऊन स्वस्थ निजतात. )

---

( इतक्यांत **शर्विलक** नामा चोर येतो. )

**शर्विलक**—हें घर चोरी करण्यास बरें दिसतें. आतां आंत शिरावयास वाट पाडली पाहिजे.

श्लोक.

ज्यांतून जाइल सुखेंच शरीर माझें ॥
शिक्षाबळें करिन भोंक तसेंच ताजें ॥
जातों करुनि भुइसपट सर्व अंग ॥
जातो जसा त्यजुनि कांत बिळीं भुजंग ॥ ११ ॥

( आकाशाकडे पाहून हर्षानें म्ह० ) वाहवा. चंद्र अस्तास गेला आणि अंधकार पसरत चालला. हें फार चांगलें झालें.

श्लोक.

शंकून राजपुरुषा[1] करि जो प्रचार[2] ॥
फोडावया परगृहा न जया विचार ॥
गाढांधकारपटलीं न दिसावयाला ॥
माते परी रजनि[3] झांकितसे तयाला ॥ १२ ॥

बागेच्या बाहेरच्या भिंतीस भोंक पाडून मी आंत आलों, आतां ह्या वाड्याच्या आंत जावयास कोठें तरी भोंक पाडलें पाहिजे.

श्लोक.

निंद्यकर्म म्हणती जन चोरी ॥
वाटते मज अशांतचि थोरी ॥

---

१ नगर रक्षक राजे सेवकांस. २ संचार. ३ रात्र.

गुप्त सुप्तजन घात कराया ॥
द्रौणिचा[1] उचित मार्ग धराया ॥ १३ ॥

तर आतां कोणत्या ठिकाणीं भोंक पाडावें ?

### ओव्या.

जल शिंपितां शिथिल झाला ॥ ऐसा प्रदेश पाहिजे शोधिला ॥
शस्त्रें उकरून काढितां विटांला ॥ शब्द न झाला पाहिजे ॥१४॥
प्रातःकाळीं पाहतां नर ॥ कोणा वाटूंनये भयंकर ॥
ऐसें परिमितचि द्वार ॥ पाडतां आलें पाहिजे ॥ १५ ॥
लोणा लागुनियां जर्जर ॥ झाले जेथें विटांचे थर ॥
ऐसें जीर्णस्थळ सत्वर ॥ कोठें शोधून काढावें ॥ १६ ॥
कोठें स्त्रीजनाचें दर्शन ॥ न होई ऐसें विविक्त स्थान ॥
सांपडे जरी दैवें करून ॥ कार्यसिद्धि निश्चित ॥ १७ ॥

( भिंत चांचपून पाहून ) ही पाणी सांडण्याची जागा आहे. ही ओली आहे. येथें लोणा आलेला आहे. येथें उंदरांनीं उकीर ही काढले आहेत. वाहवा काय दैव माझें ! भोंक पाडावयास जसें स्थळ असावें तसेंच सांपडलें. आतां कार्य सिद्धि निश्चित आहे. **स्कंदपुत्रांनीं**[2] प्रथम सिद्धिलक्षण हेंच सांगितलें आहे. असो आतां भोंक पाडावयास कोणीकडून कसा आरंभ करावा ? (विचार करतो) भगवान् **कनकशक्ति**[3] यानें भोंक पाडण्याचे चार उपाय सांगितले आहेत ते असे.

### ओवी.

पक्क्या विटा ओढाव्या ॥ कच्चया विटा फोडाव्या ॥
भेंड्याच्या भिजवाव्या ॥ लांकडाच्या कापाव्या ॥ १८ ॥

आतां येथें पक्क्या विटा आहेत म्हणून त्या ओढून काढून भोंक पाडलें पाहिजे. भोंकें सहा प्रकारचीं आहेत तीं अशीं.

### ओव्या

पद्माकार वापीसन्निभ ॥ बालचंद्र कीं सूर्यबिंब ॥
स्वस्तिक कीं पूर्णकुंभ ॥ हे सहा प्रकार द्वाराचे ॥ १८ ॥

---

१ अश्वत्थाम्याचा. २ चौर्य कर्माचे गुरु. ३ चौर्यशास्त्र कर्ते.

यांतून एका प्रकाराचें ॥ द्वार करीन भिंतीस साचें ॥
कौशल्य पाहून कर्त्याचें ॥ विस्मय करोत पुरजन ॥ १९ ॥

पक्क्या विटांच्या भिंतीवर पूर्ण कुंभच शोभेल. म्हणून तोच प्रकार करतों. मला कांहीं कठीण नाहीं.

## ओव्या.

आजवरी बहुत भिंती ॥ नव्या आणि जुन्या किती ॥
म्यां रात्री फोडिल्या असती ॥ शिरावया अंतर्गृहीं ॥ २० ॥
प्रभात समयीं पौरजन ॥ भिंतीचें भोंक पाहून ॥
दोष वदूनहि स्तवन ॥ करती माझ्या कौशल्याचें ॥ २१ ॥

( कर्माच्या आरंभीं गुरुस वंदन करतो. )

हे वरदा कुमार **कार्तिकेया** तुला नमस्कार असो. हे **कनकशक्ते** तुला नम० हे ब्रह्मण्या देवा, देवा **देवव्रता** तुला नम० हे **भास्करा** हे **नंदिन्** तुला नम० हे **योगाचार्या** तुला नमस्कार. मी **योगाचार्याचा** पहिला शिष्य. त्यानें प्रसन्न होऊन मला ही योगरचना[1] विद्या दिली आहे तिचें सामर्थ्य विलक्षण आहे.

## आर्या.

ही असतां मजपाशीं रक्षक कोणी न पाहतिल मातें ॥
पडलें शस्त्र शरीरीं तरि तें न करील किमपि घायातें ॥ २२ ॥

( भोंक पाडावयास आरंभ करतो. ) अरे रे ! प्रमाणसूत्र नाहीं. तें विस्मृतीनें घरीं राहिलें, किंवा वाटेनें कोठें पडलें कोण जाणें. आतां कसें करावें ? ( चिंतन करतो. ) असो, कांहीं चिंता नाहीं. हें यज्ञोपवीतच प्रमाणसूत्र असो. यज्ञोपवीत हें ब्राह्मणाला फार ठिकाणीं उपयोगीं पडतें. विशेषेंकरून आम्हांसारख्याला.

## ओवी.

यानेंच मापिती द्वार[2]मार्ग ॥ यानेंच उकलिती भूषण[3]संयोग ॥

१ योगरचनाविद्या. २ भिंत फोडून जाण्याचा मार्ग. ३ गोठांचीं तोंडें.

डसतां वृश्चिक कीं भुजंग ॥ यानेंच अवयव बांधिती ॥ २३ ॥

(यज्ञोपवीतानें जागा मोजून भोंक पाडावयास आरंभ करतो.)

( विटा काढून काढून भोंक बरेंच तयार करून भोंकाकडे पाहून म्हणतो. ) आतां एवढी एक वीट काढिली ह्मणजे भोंक तयार झालें. ( इतक्यांत साप डसलासें करतो. ) अरे रे मला साप डसला. ( यज्ञोपवितानें बोट बांधून विषाचा वेग चढल्याप्रमाणें करतो. आणि औषधोपचार करून म्हणतो. ) विष उतरलें आतां मी स्वस्थ झालों ( पुन्हा भोंक पाडण्याचें काम चालवून पाहून म्ह० ) अरे आंत दिवा जळत आहे. पहा

### श्लोक.

प्रभा ही दिव्याची कशी लाल आहे ॥
निघालीच भोकांतुनी दूर वाहे ॥
बहू शोभते अंधकारांत तैशी ॥
कसोटी वरी स्वर्ण रेखाच जैशी ॥ २४ ॥

( सर्व विटा काढून ) आतां भोंक तयार झालें. आतां आंत शिरावें. अथवा पहिल्यानें आपण शिरूनये. पुरुषाचा पुतळा करून आंत शिरवावा. ( तसें करून म्ह० ) अरे आंत कोणी नाहीं. ठीक.

जय **कार्तिकेया** तुला नमस्कार असो. (असें म्हणून आपण आंत शिरतो. आणि पाहून म्ह० ) अरे येथें दोघे पुरुष निजले आहेत. असो प्रसंग पडल्यास झटकर बाहेर निघण्यासाठीं दार उघडून ठेवावें. ( असें म्हणून दार उघडूं लागतो. ) अहो हें घर जुनें झाल्यामुळे कवाड करकर वाजतें. यावर घालावयास पाणी शोधून आणलें पाहिजे. पाणी कोठें सांपडेल ? ( सोधतो. ) अहा सांपडलें पाणी. ( पाणी घेऊन दारावर शिंपडतो आणि शंकित होऊन म्हणतो. हें चांगलें नव्हे. पाणी भुईवर पडलें असतां शब्द उत्पन्न होईल. असो आतां हळूच युक्तीनें कवाड उघडावें. ( कवाड

उघडून मागें पाहून म्हणतो. ) अगोदर परीक्षा केली पाहिजे. ह्या दोघांची झोंप खरी आहे किंवा कपटाची आहे. ( कांहीं चेष्टांनीं परीक्षा करून म्ह० ) अहो यांची झोंप खरी दिसते. कपटाची नव्हे. कशा वरून तर.

श्लोक.

चाले श्वास समान दीर्घ दिसती ह्या पांपण्या निश्चला ॥
आहे दृष्टि निमीलिता नच दिसे अभ्यंतरीं चंचला ॥
अस्ताव्यस्त शरीर ही पसरलें बाहेर शय्येहुनी ॥
आली झोंप खरीच यांस गमते हीं लक्षणें पाहुनी ॥ २५ ॥

( आसमंतात् भागीं. अवलोकन करून म्ह०) काय हा येथें मृदंग, हा पखवाज, ही ढोलकी, हा वीणा, ही सारंगी, हा पोंवा, हीं पुस्तकें. तर हें नाट्याचार्याचें घर आहे काय ? मी तर मोठा वाडा पाहून आंत शिरलों. येथें लभ्यांश कांहीं दिसत नाहीं. बडा घर पोकळ वांसा असें दिसतें. तर काय हा खराखुरा दरिद्री आहे किंवा राजभयानें अथवा चोरभयानें आपलें द्रव्य यानें भूमींत पुरून ठेविलें आहे. म्हणावें तरी काय. मला **शर्विलकाला** भूमिस्थद्रव्य दुर्लभ आहे काय ? असलें तर तेव्हांच शोधून काढीन. पण आहे कीं नाहीं ह्याची परीक्षा करतों. ( पाय आपटून पाहतो. ) पुरलेल्या धनाचें चिन्ह झांकत नाहीं. हा जातीचा दरिद्री आहे खरा. असो जावें आतां.

**विदू०**—( झोंपेंत बरळतो. ) अरे मित्रा, भिंतीला भोंक पाडल्या सारखें दिसतें. अरे घरांत चोर आलासा वाटतो. तर हे सोन्याचे दागिने तूं आपल्या जवळ घे.

**शर्विलक**—हा जागा आहे काय ? मी आंत शिरलों असें पाहून आपण दरिद्री म्हणून माझी थट्टा करतो. याला निजल्या जागीं ठार करूं का ? अथवा याला मारून काय ? हा झोंपेंत बरळत असेल. ( त्याकडे पाहून ) अहो हें कांहीं फाटक्या

पंच्यांत बांधलेलें आहे तरी दिव्याच्या प्रकाशानें झळकत आहे. तस्मात् हें कांहीं तरी सुवर्णाचें भूषण आहे खरें. मी जाऊन तें घेऊं का ? अथवा नको. माझ्या सारखाच हा दरिद्री आहे. याला कशाला पीडा द्यावी. निघून जावें हें बरें. ( जाऊं लागतो. )

विदू०—अरे मित्रा, तुला गाई ब्राह्मणाची शपथ आहे. जर हा सुवर्णालंकार न घेशील तर. घे हे लौकर आपल्या हातीं.

**शर्विलक**—गाईची शपथ ब्राह्मणाची शपथ कोणीं मोडूंनये. ( असें म्हणून ती गांठोडी घ्यावयास पुढें जातो. ) अरे पण दिवा जवळ आहे. असो दिवा मालविण्यास मजपाशीं अग्निकीट[1] आहे. याला सोडून देतों म्हणजे झालें ( तसें करतो ) हाच याचा देश आणि काल. म्यां सोडलेला कीटक या दिव्यावर जावो. वाहवा ! या भद्रपीटकीटकानें[2] दिव्या भोंवतीं फिरून पंखांच्या वाऱ्यानें दिवा मालविला. अरेरे या अंधकाराला धिक्कार असो. अथवा आमच्या ब्राह्मणकुळांत मीही जो अंधकार केला त्याला धिक्कार असो. जो प्रतिग्रह नकरणारा चतुर्वेदी ब्राह्मण त्याचा पुत्र मी **शर्विलक**. जातीचा ब्राह्मण असून गणिका जी **मदनिका** तिच्या प्राप्तीसाठीं हें अनुचित कर्म करतों. असो यावेळेस ब्राह्मणाची प्रार्थना ऐकली पाहिजे. ( असें म्हणून ती भूषणांची गांठोडी घ्यावयास हात पुढें करतो. )

विदू०—मित्रा, तुझ्या हाताचीं बोटें गार कां लागतात ?

**शर्विलक**०—( चपापतो. ) अरेरे काय वेडेपणा हा ! कवाडावर पाणी शिंपडल्यामुळें माझ्या हाताचीं बोटें गार झालीं. असो काखेंत हात घालून त्यांला ऊब आणितो. ( असें म्हणून हात काखेंत घालून उष्ण करून ती गांठोडी घेतो. )

विदू०—घेतली का ?

---

१ पतंग. २ कीटकाचें नाव.

**शर्विलक**०—( हळूच म्ह० ) ब्राह्मणाची प्रार्थना कशी मोडावी, म्हणून घेतली बरें.

**विदू**०—माल ओपून वाणी जसा निश्चिंत होतो तसा मी निश्चिंत झालों. आतां स्वस्थ सुखानें झोंप घेईन.

**शर्विल**०—महा ब्राह्मणा, आतां शंभर वर्षें खुशाल निजून रहा. ( मनांत म्ह० ) वाईट गोष्ट ही. त्या गणिकेसाठीं ब्राह्मणास दुःखांत घातलें. अथवा मींच आपला आत्मा दुःखांत घातला. म्हटलें तरी चिंता नाहीं.

## आर्या.

धिक्कार असो माझ्या दारिद्र्या जें मनांतलीं भानें ॥
हरितें निंदुनियां हीं करितों मी नीचकर्म लोभानें ॥ २५ ॥

आतां मी **मदनिकेला** विकत घेण्याकरितां **वसंतसेने**च्या घरीं जातों. ( अंमळ पुढें जाऊन पाहून म्ह० ) बाहेर कोणाची चाऊल झाली. कोणी गस्तवाला आला काय? असो गपचूप उभें रहावें. अथवा मला **शर्विलकाला** गस्तवाला काय करणार आहे? मी तर,

## ओंव्या.

हिंडण्या विषयीं मार्जार[1] ॥ पळण्या विषयीं कृष्णसार[2] ॥
उडण्याविषयीं खगेश्वरें[3] ॥ असें मी उरःसरें[4] सरकण्या ॥ २६ ॥
निद्रित जागृत मानवांची ॥ परीक्षा करावया साची ॥
विद्या असे श्वानांची[5] ॥ पूर्ण पणें मजपाशीं ॥ २७ ॥
नानापरीचे वेषं[6] घ्यावया ॥ असें मी साक्षांत मायाँ[7] ॥
अनेक भाषा बोलावया ॥ वाग्देवताचं[8] मी असें ॥ २८ ॥
रात्री माजि मी दीपक[9] ॥ संकटस्थळीं डुंडुंमक[10] ॥
स्थळा वरी मी घोटक[11] ॥ जळीं नौकांमी[12] असें ॥ २९ ॥

आणखी मी कसा आहें.

---

१ मांजर. २ हरिण. ३ गरुड. ४ सर्प. ५ कुतऱ्याची. ६ सोंगें. ७ ईश्वरी शक्ति. ८ सरस्वती. ९ दिवा. १० सर्पविशेष. ११ घोडा. १२ नाव.

## अभंग

भुजंगाचे परी असे माझी गती ॥
गिरी[2] परी स्थिती, असे माझी ॥ ३० ॥
गरुडा सारिखें उड्डाण साधीन ॥
जाईन उडोन, अवचीत ॥ ३१ ॥
सशापरीमाझें सर्वत्र पाहणें ॥
सत्वर जाणणें, कोठें काय ॥ ३२ ॥
धरण्या विषयीं असें मी लांडगा ॥
झुंजाया दांडगा, सिंह जैसा ॥ ३३ ॥

( इतक्यांत **चारुदत्ता**ची दासी **रदनिका** येते. )

**रदनिका**— अरे, देवडीवर **वर्धमानक** निजला होता तो कोठें दिसत नाहीं.कोणीकडे मेला गेला कोण जाणे. असो **मैत्रेयाला** हाक मारावी ( इकडे तिकडे पाहत्ये. )

**शर्विल**०—( **रदनिकेला** मारायास जातो. पुन्हा तिजकडे पाहून म्ह ० ) काय ही स्त्री आहे. जाऊं द्या. हिला काय मारावें. पुरुष असता तर ठार केला असता. ( असें म्हणून निघून जातो. )

**रदनिका** — ( आंत जाऊन भय पावून म्ह० ) हाय हाय ! आमच्या घरांतून भितीला भोंक पाडून चोर बाहेर चालला आतां **मैत्रेयाला** उठवावें. ) अरे **मैत्रेया** अरे **मैत्रेया** ऊठ ऊठ लौकर आपल्या घरांत चोर शिरला होता तो भितीला भोंक पाडून पळून गेला.

**विदू**०—( घाबऱ्या घाबऱ्या उठून. ) अगे बटकीचे पोरी म्हणतेस काय. भोंक पाडून चोर पळून गेला ?

**रदनि**०— अहो थट्टा करूं नका. हें भोंक दिसत नाहीं काय ?

**विदू**०— अगे बटकीचे, खरेंच कींगे ह्मणतेस तें ? अबब हें दुसरें दारच उघडलें आहे जसें. अरे मित्रा, **चारुदत्ता,** निजलास काय ? ऊठ ऊठ लौकर. आपल्या घरांत चोर

---

१ साप. २ पर्वत.

शिरला होता तो भींतीला भोंक पाडून पळून गेला.

**चारु॰**— बरें बरें. जाऊं दे गेला तर. मित्रा, थट्टा करतोस ?

**विदू॰**— अरे थट्टा नव्हे. हें पाहा प्रत्यक्ष.

**चारु॰**— कोणत्या ठिकाणीं भोंक पाडलें आहे ?

**विदू॰**— अरे हें आपल्या उशाकडे.

**चारु॰**—( तिकडे पाहून. ) वाहवा ? हा भोंसका तरी मोठा डौलदार पाडला आहे ?

श्लोक.

उकरुनि थर पाडिला विटांचा ॥
बहु विपुल[1] मधें वरीच टांचों[2] ॥
अनुचित[3] जन संगभीत ह्याचें ॥
ह्रदयचि फुटलें महागृहाचें ॥ ३४ ॥

अशा कर्मात ही अशी कुशलता हें मोठें आश्चर्य ?

**विदू॰**— हे मित्रा, हा भोंसका दोघांतून एकानें केला असावा. ह्या नगरी बाहेरच्या चोरानें, अथवा नव्यानें चोरीचें कर्म करणारानें. नाहीं तर आपल्या घरांत वैभव कितीसें आहे हें ह्या उज्जयनी नगरींत सर्वांस विदित आहे.

**चारु॰**— मित्रा, तूं म्हणतोस ती खरी गोष्ट. पहा.

श्लोक.

चोरानें पर गांवच्या नवशिक्या हें कर्म केलें असे ॥
कीं त्याला नकळेचि हे पहुडले निश्चित निर्धूत[4]से ॥
आशेनें शिरला असेल अमच्या पाहोनि मोठ्या घरा ॥
कांहीं ना मिळतां निराश मग तो होऊनि गेला खरा ॥ ३५ ॥

अतां तो बापडा आपल्या मित्रमंडळीला काय सांगेल बरें ? कीं सावकाराच्या पुत्राच्या घरांत शिरलों परंतु कांहींच हातीं लागलें नाहीं. असें सांगेल नव्हे ?

**विदू॰**— अरे त्या दुष्ट चोराकरतां देखील हळहळतोस हें

---

१ पसरट. २ अरुंद. ३ दुर्जन. ४ फाटिंग.

कसें ? त्यानें तर मनांत योजलें असेल कीं हें मोठें घर आहे. यांत शिरून जडावाचे, किंवा सुवर्णाचे अथवा मोत्यांचे दागिने चोरून ग्यावे. ( स्मरण होऊन मनांत खिन्न होतो. ) अरे मजपाशीं दागिनें होते ते कोठें आहेत ? ( पुन्हा स्मरण करून उघडपणें म्हणतो. ) अरे मित्रा, जेव्हां तेव्हां तूं मला म्हणत असतोस कीं, **मैत्रेय** मूर्ख आहे. **मैत्रेय** अज्ञान आहे. पण यावेळेस मीं किती शहाणपण केलें बरें ? कीं त्या दागिन्याची गांठोडी, मीं तुझ्या स्वाधीन केली. नाहींतर त्या रांडलेकानें उपटून नेली असतीना ?

**चारु०**--मित्रा पुरे आतां थट्टा.

**विदू०**--त्वां मला मूर्ख ठरविलें त्यापक्षीं थट्टा केव्हां करावी कुठें करावी हें ज्ञान मला कोठचें ?

**चारु०**--मित्रा खरेंच का माझ्या स्वाधीन केली ?

**विदू०**--खोटें सांगतों कीं काय ?

**चारु०**--कोणत्यावेळेस माझ्या स्वाधीन केली त्वां ?

**विदू०**--अरे, जेव्हां मीं तुला ह्मटलें कीं तुझ्या हाताचीं बोटें गार लागतात, तेव्हां.

**चारु०**--असें काय ? बरें कदाचित् तसें झालें असेल. ( चोहोंकडे पाहून दागिने कोठें नाहींत असें जाणून हर्षानें म्ह० ) अरे मित्रा, तर मी तुला आनंदाची गोष्ट सांगतों. आपलें दैव चांगलें.

**विदू०**—काय दागिने आहेत, नेले नाहींत म्हणतोस ?

**चारु०**—आहेत कशाचे. ते तर नेलेच.

**विदू०**—मग आनंदाची गोष्ट कोणती !

**चारु०**—हीच कीं तो चोर आमच्या घरांतून कृतार्थ होऊन गेला.

**विदू०**—अरे पण ती दुसऱ्याची ठेव होतीना ?

**चारु०**—होहो खरेंच ती ठेव होती नव्हे ? हायहाय, ( असें म्हणून घाबरतो. )

---

१ फटिंग, निर्धन.

**विदू**॰—मित्रा सावध हो. अरे दुसऱ्याची ठेव चोरांनीं नेली त्याला आपण काय करावें. आपणाकडे काय दोष आहे ? तूं इतका घाबरा कां होतोस ?

**चारु**॰—( सावध होऊन म्ह॰ ) मित्रा,

## आर्या.

वाटेल सत्य कोणा झालेलें जन कुतर्क करितील ॥
दारिद्र्य कारणानें संशय माझाच सर्व धरितील ॥ ३६ ॥

काय संकट हें ?

## आर्या.

यद्यपि माझें सारें दुर्दैवानें हरोनि धन नेलें ॥
नेवो, माझें सुचरित दूषित कां आज निर्दयें केलें ॥ ३७ ॥

**विदू**॰--अरे तूं भिऊं नको. मी तिला उलट गोष्ट सांगेन. कीं, कोणीं दिलें कोणीं घेतलें. याला साक्षी कोण आहे.

**चारु**॰--शिव शिव, काय मी यासमयीं खोटें बोलूं ?

## आर्या.

भिक्षा मागुनि तीचें ठेवीचें ऋण कसेंहि फेडीन ॥
परि कीर्तिविघातक जें अनृत मुखांतुन कधी न काढीन ॥३८॥

**रदनि**॰--आतां हें वर्तमान **धूताबाईला** जाऊन सांगतें

( असें बोलून निघून जाते. )

( इतक्यांत दासीसहवर्तमान **चारुदत्ताची स्त्री धूता** येत्ये. )

**धूता**—( घाबऱ्या घाबऱ्या पुसत्ये. ) अगे **रदनिके** खरें सांग. **आर्यां**च्या आणि **मैत्रेया**च्या शरीराला तर कांहीं धक्का लागला नाहींना ?

**रदनि**॰—बाईसाहेब, उभयतांच्या शरीरास कांहीं धक्का लागला नाहींखरा. परंतु वेश्याजनाचे जे अलंकार होते ते चोरानें नेले.

**धूता**—हाय हाय. ( असें म्हणून मूर्छा पावते. )

**रदनि**॰—बाईसाहेब सावध व्हा.

**धूता**—( सावध होऊन. अगे **रदनिके**, तूं काय म्हणतेस ?

कीं आर्यांच्या शरीराला धक्का लागला नाहीं ? पण तुला सांगतें, कीं या समयीं आर्यांच्या शरीराला धक्का लागला असता तर पुरवता, पण त्याच्या अबरूला धक्का लागला- हें चांगलें झालें नाहीं. आतां ह्या **उज्जयनी** नगरींत सर्व लोक असें म्हणतील कीं, दारिद्र्या मुळें ह्या गृहस्थानेंच हें अनुचित कर्म आचरलें. ( वर पाहून उस्वास टाकून म्ह० ) हे भगवंता कृतांता **देवा**, कमलपत्रा वर पडलेल्या जलबिंदु- सारखीं चंचल जीं दरिद्री पुरुषाचीं भागधेयें त्यांच्या बरोबर तूं क्रीडा करतेंस. तुला काय म्हणावें। असो, माझ्या आई- नें दिलेली एक रत्नावली ( रत्नमाला ) मी आजपर्यंत आप णा पाशीं जतन करून ठेविली आहे. ती मी यासमयीं आर्य- पुत्राला देईन, पण तो अभिमाना मुळें घेणार नाहीं. याला कोणती युक्ति करावी. अगे **रदनिके**, त्या **मैत्रेय भटाला** इकडे बोलाव.

**रदनि०**—आज्ञा बाई साहेब. ( विदूषका जवळ जाऊन **मैत्रेय** भटजी तुह्माला **धूताबाई** बोलावतात.



**विदू०**—ती कोठें आहे ?

**रदनि०**—त्या जवळच आहेत. चला.

**विदू०**—( तिजकडे जाऊन **धूताबाई** बरीं आहां ना ?

**धूता०**—**मैत्रेया**, मी तुला नमस्कार करितें.

**विदू०**—अष्टपुत्रा सौभाग्यवतीभव. मला कां बोलावलें ?

**धूता०**—**मैत्रेया**, असा पुढें माझ्या जवळ ये.

**विदू०**—हा मी आलों काय ह्मणतेस ?

**धूता०**—**मैत्रेया**, हात पुढें कर. ही घे.

**विदू०**—हें काय आहे ?

**धूता०**—अरे, म्या रत्नषष्ठीचें व्रत केलें होतें त्याच्या उद्यापना बद्दल आपल्या वैभवाप्रमाणें ब्राह्मणास कांहीं दान द्यावया करितां एक ब्राह्मण मीं योजला होता पण तो दुसरीकडे

प्रतिग्रह करण्यास गेला, यासाठीं त्याचे जागीं तूंच होऊन ही रत्नमाला घे.

**विदू०**(रत्नमाला घेऊन) तुझें कल्याण असो, मी जातों. आतां समजलों. ही रत्नमाला मी आपल्या प्रिय मित्राला नेऊन देतों.

**धूता०**—आर्या **मैत्रेया,** मला लाजवूंनको. असें बोलून निघून जाते.

**विदू०**—( आश्चर्य करून ) काय हो हिचा थोरपणा हा !

**चारु०**— **मैत्रेयाला** इतका उशीर कां लागला ? ह्या दुःखानें ती ब्राह्मणी भलतेंच काहीं करील काय न कळे. ( हाक मारतो ) अरे **मैत्रेया,** अरे **मैत्रेया.**

**विदू०**—( जवळ जाऊन. ) हा आलों मी. अरे मित्रा, हें घे. ( असें म्हणून रत्नमाला पुढें करतो. )

**चारु०**—मित्रा, हें काय आहे ?

**विदू०**—अरे, तूं आपल्या स्वभावास अनुरूप अशी जी बायको केली त्याचें हें फळ.

**चारु०**—हाँ—ब्राह्मणी मजवर दया करते काय ? हर हर काय संकट हें! मी दरीद्री खरा.

### आर्या.

मद्भाग्य सर्व गेलें स्त्रीद्रव्यानें दिला मला असरा ॥
पुरुषाची स्त्री स्त्रीचा पुरुष करायास हेतु अर्थ खरा ॥ ३९ ॥

अथवा मी दरिद्री नव्हें. कां कीं मला,

### आर्या.

आहे अनुकूलस्त्री समदुःखसुखी सुमित्र तूंहि तसा ॥
नाहीं सत्यहि ढळलें वद मग होईन मी दरिद्रि कसा ॥ ४० ॥

**मैत्रेया** ही रत्नमाला घेऊन आतांच **वसंतसेने**कडे जा आणि तिला माझा निरोप सांग कीं, त्वांजे सुवर्णालंकार मजपाशीं ठेविले होते ते माझे च असें समजून नकळतां मी द्यूतांत हारविले. यासाठीं त्याच्याबद्दल ही रत्नमाला तुज देतो. ही कृपा करून घे.

विदू०—छी मित्रा हें काय करतोस ! अरे ते अलंकार अल्प मूल्याचे. त्यांचा त्वां उपभोगही केला नाहीं. अथवा अभिलाषही केला नाहीं. ते चोरानें नेले. त्यांच्या करतां पृथ्वीच्या मोलाची ही रत्नमाला तिला देतोस काय ?

चारु०—मित्रा, तें मनांत आणूं नको.

## आर्या.

अवलंबुनियां ज्यातें मजपाशीं ठेविला तिनें ठेवा ॥
तोजो विश्वास महा त्याचें हें मूल्य होय भूदेवा ॥४१॥

यासाठीं तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. ही घेऊन जा आणि तिच्या कडून ही घेवविल्यावांचून येऊं नको. जा आतां. ऊठ लौकर. अरे **वर्धमानका**, विटा पडल्या आहेत त्यांनींच हें भोंक बुजवून बेमालूम कर लौकर. ऊशीर लावूं नको. लोक नांव ठेवितील. यासाठीं हे भोंक तसेंच ठेवतां कामास नये.

## आर्या.

हें भोंक त्या विटांनीं कौशल्यें सुदृढ शीघ्र बुजवावें ॥
लोकापवादभीतिस्तव हें पडकें असें न ठेवावें ॥ ४२ ॥

मित्रा **मैत्रेया** तूं तरी तिकडे गेल्यावर बोलण्यांत आपलें दैन्य दाखवूं नको हो.

विदू०— जो दरिद्री आहे त्यानें उदारपणाची गोष्ट काय सांगावी ?

चारु०—मी दरिद्री नाहीं बरें. मघांच तुला सांगितलेंना ( आहे अनुकूलास्त्री इत्यादि पूर्वोक्त आर्या म्हणतो ) तर आतां तूं जा लौकर. मीही शौचविधि करून स्नानसंध्या करतों.

( असें झाल्यावर सर्व निघून जातात. )

**संधिच्छेद नामक.**

**तिसरा अंक.**

**समाप्त.**

# मृच्छकटिक नाटक.

## अंक ४.

स्थळ.

वसंतसेनेचें घर.

पात्रें.

चेटि.................वसंतसेनेच्या आईची दासी.
वसंतसेना.............कलावंतिणीची मुलगी.
मदनिका. ............वसंतसेनेची दासी.
शर्विलक. ............घरफोड्या चोर.
गाडीवान.............वसंतसेनेचा चाकर.
दासी. ...............वसंतसेनेची.
विदूषक. ............चारुदत्ताचा मित्र.
बंधुल. ..............दासीपुत्र.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक ४.

## प्रारंभ.

---

( तदनंतर **चेटी** येते. )

**चेटी**—मातेनें मला **वसंतसेने**कडे जावयास आज्ञा केली आहे. आतां तिज कडे जातें. ( पुढें पाहून ) ही **वसंतसेना** चित्राच्या फळीकडे दृष्टि लावून **मदनिके** बरोबर कांहीं बोलत बसली आहे. असो मी जवळ जात्यें. ( असें म्हणून जवळ जात्ये. )

( इतक्यांत वर सांगितल्या प्रमाणें चित्राची फळी हातांत घेऊन **वसंतसेना** आणि दासी **मदनिका** दोघी येतात. )

**वसंतसेना**—अगे **मदनिके**, ही **चारुदत्ताची** तसबीर हुबेहूब काढलेली आहे, नाहीं बरें ?

**मदनिका**—होय, हुबेहूब काढली आहे खरी.

**वसंत॰**—त्वां कशा वरून जाणिलें ?

**मदनि॰**—तुझी स्नेहयुक्तदृष्टि या चित्रावर संलग्न झाली आहे यावरून मी म्हणत्यें.

**वसंत॰**—**मदनिके**, तूं वेश्याजनाच्या चालीप्रमाणें तोंडापुरतें बोलतेस कीं काय ?

**मदनि॰**—जेवढा वेश्याजन तेवढा तोंडापुरतें खोटें बोलतो काय ?

**वसंत॰**—अगे, अनेक प्रकारच्या पुरुषांशीं प्रसंग पडल्या मुळें वेश्याजन मर्जी प्रमाणें बोलणारा होतो.

**मदनि॰**—तुझी दृष्टि आणि मन हीं दोन्ही ज्या ठिकाणीं रमलीं तेथें दुसरें कारण सोधावयास नको.

**वसंत॰**—एकून मी सखीजनाच्या थट्टेला पात्र झाल्यें; असें दिसतें.

**मदनि॰**—नाहीं नाहीं, थट्टा कशाची. सखीच्या मर्जी प्रमाणें वागावें असा स्त्रियांचा स्वभावच आहे.

**चेटी**—( जवळ जाऊन ) आईसाहेबांनीं मला तुम्हा कडे पाठविलें आहे. आईसाहेब आज्ञा करितात कीं बुरख्याची गाडी मागल्या दारीं आली आहे, तर तींत बसून आपण जावें.

**वसंत॰**—काय त्या श्रेष्ठ **चारुदत्ता** कडून गाडी आली आहे तो मला नेतो काय ?

**चेटी**—नाहीं नाहीं. ज्यानें गाडी बरोबर दहा हजार मोहरांचा अलंकार पाठविला आहे तो नेणार.

**वसंत॰**—तो कोण बरें ?

**चेटी**—तोच हा राजश्यालक संस्थान[1].

**वसंत॰**—जा जा येथून. पुन्हा ही गोष्ट मज पुढें बोलूं नको.

**चेटी**—बाईसाहेब, क्षमा करा. रागें भरूं नका. मी निरोप आणला तो आपणास सांगितला. मज कडे काय आहे ?

**चेटी**—तर मग आईसाहेबांला काय जाऊन सांगूं ?

**वसंत॰**—तिला इतकेंच सांग कीं, जर म्यां जिवंत रहावें असें तूं इच्छितेस तर पुन्हा असा निरोप मला पाठवूं नको.

**चेटी**—बरें मर्जी आपली. असेंच जाऊन सांगतें.

( असें बोलून निघून जातें. )

( इतक्यांत **शर्विलक** येतो. )

**शर्विलक॰**—( आपणाशीं बोलतो. )

## श्लोक.

रात्रीला दिधलीच लाज कर्तिनें[2] निद्रेसही जिंकिलें ॥
राजाचे बहु दक्ष रक्षक तयां जिंकोनि म्यां टाकिलें ॥
हीं कर्में करितां सरोनि अवघी गेली निशा[3] सत्वरी ॥
झालों मी सहसा रवी उगवतां निस्तेज चंद्रापरी ॥ १ ॥

---

१ हें त्याचें नांव. २ उद्योग करून. ३ रात्र.

## आणखी श्लोक.

वाटे[1] चालत कोणि येत असतां आला पहाया मला ॥
कोणी धांवत शीघ्र येत असतां पाठीस हा लागला ॥
माझें दूषित चित्त यास्तव भयें ऐशा करी कल्पना ॥
दोषांहीं अपुल्याच निश्चित अशा येतात शंका मना ॥ २ ॥

## आणखी श्लोक.

गोष्टी सांगत बैसले नर जिथे तें गेह म्यां सोडिलें ॥
स्त्रीचें ज्या स्थळिं आधिपत्य दिसलें तेंही असे टाकिलें ॥
झालों स्तंभसमान[2] मी नृपतिचे पाहोनियां किंकर[3] ॥
क्लेशाचे व्यवसाय[4] सारुनि[5] असे केली निशीवासर[6] ॥ ३ ॥

( असें म्हणून इकडे तिकडे फिरतो. )

( तिकडे **वसंतसेना मदनिकेस** म्हणते )

**वसंत०**—अगे **मदनिके**, ही चित्राची फळी ( तसबीर ) माझ्या बिछान्यावर नेऊन ठेव आणि तेथून ताडाचा विंझणा घेऊन ये.

**मदनि०**—हां जी बाईसाहेब. ( असें म्हणून तसबीर घेऊन निघून जाते. )

**शर्विल०**—हाच **वसंतसेनेचा** वाडा. ह्या वाड्यांत जाऊन **मदनिकेचा** शोध करावा. ( आंत जातो. ) आतां **मदनिकेला** कोणीकडे पाहूं ? ( इतक्यांत हातीं विंझणा घेऊन **मदनिका** तिकडून येते. )

**शर्विलक**—( पुढें पाहून ) अहो ही **मदनिका** आली.

## आर्या.

लावण्याची खाणी स्त्री मदनाची रतीच मूर्तिमती ॥
कामाग्नि तप्त माझें अंग करी शीत चंदनासम ती ॥ ४ ॥

अगे **मदनिके**, तुला मी फार वेळ शोधित आहें. भेटलीस बरें झालें.

---

१ असें वाटतें. २ खांबासारखा निश्चेष्ट. ३ दूत. ४ उद्योग. ५ करून. ६ रात्रीचा दिवस केला.

**मदनि०**—( पुढें पाहून ) आँ! हा **शर्विलक** इकडे कोठून? **शर्विलका**, ये, कोणी कडून आलास?

**शर्विल०**—सांगतों तुला सारें. ( उभयतां एकमेकांकडे प्रीतीनें पाहतात. )

**वसंत०**—( आपणाशीं बोलत्ये. ) **मदनिके**ला लौकर ये म्हणोन सांगितलें असतां अजून आली नाहीं. येवढा वेळ काय करित आहे कोण जाणें (वाटेकडे पाहून) ही आपली पण कोणा पुरुषाशीं गोष्टी सांगत उभी राहिली आहे. आणि त्याकडे मोठ्या प्रीतीनें दृष्टि लावून पाहत आहे. ह्या वरून असा तर्क होतो कीं जो पुरुष हिला दासीपणांतून काढून आपलीशी करणार आहे, तोच हा असावा. बरें बोलूं द्या उभयतांला. कोणाच्या सुखाचा भंग करूं नये. आतां मी तिला हाक मारीत नाहीं.

**मदनि०**—**शर्विलका**, सांग सांग काय तें.

**शर्विल०**—( शंकित होऊन मागें पुढें चोहोंकडे पाहतो. )

**मदनि०**—**शर्विलका**, तूं असा शंकितसा दिसतोस.

**शर्विल०**—तुला कांहीं गुह्य गोष्ट सांगावयाची आहे. पण आतां येथें कोणी ऐकत नाहींना?

**मदनि०**—येथें कोणी नाहीं. सांग सांग भिऊं नको.

**वसंत०**—( ऐकून ) काय गुह्य गोष्ट आहे म्हणतो? तर आपण ऐकूं नये.

**शर्विलक**—कायगे मदनिके, कांहीं मोल घेऊन तुला **वसंतसेना** सोडील का?

**वसंत०**—काय! माझ्या संबंधाच्या गोष्टी दिसतात. तर आड उभें राहून काय बोलतात तें ऐकलें पाहिजे.

**मदनि०**—**शर्विलका**, ही गोष्ट मीं एकवेळ **वसंतसेने**ला विचारली होती. तेव्हां ती म्हणाली, जर मी स्वतंत्र असत्यें तर द्रव्य घेतल्यावांचून सर्व दासीजनाला सोडलें असतें. पण काय करूं. धनीपणा माझ्या आईकडे पडला.—पण **शर्वि-**

लका माझ्या धनिनीपासून मला सोडवायापुरतें द्रव्य तुजपाशीं कोठें आहे ?

**शर्विलक**—तूं म्हणत्येस तें खरें. पण मीं कांहीं तजवीज केली आहे. तुला सांगतों.

**आर्या.**

दारिद्र्यानें जरि मी पीडित, तरि चित्त तुजवरी धरिलें ॥
यास्तव रात्रीं सखि म्यां साहस कांहीं त्वदर्थ आचरिलें ॥ ५॥

**वसंत॰**—याची आकृति प्रसन्न असून साहस कर्माच्या योगानें घाबरल्या सारखी दिसत्ये.

**मदनि॰**—**शर्विलका**, स्त्रियांच्या छंदास लागून त्वां दोन गोष्टींची हानि करून घेतली.

**शर्विल॰**—दोन गोष्टी कोणत्या गे ?

**मदनि॰**—शरीर आणि लौकिक.

**शर्विल॰**—वेडे, साहस कर्म केल्या वांचून संपत्ति मिळत नाहीं. समजलें ?

**मदनि॰**—एकून आपला दुर्लौकिक झाला नाहीं असें तुला वाटतें. असो, पण माझ्या करितां साहस कर्म करतांना त्वां कांहीं विपरीत आचरण तर केलें नाहींना ?

**शर्विल॰**—मी तसें कधीं करीत नाहीं. पहा.

**श्लोक.**

नाहीं चोरित भूषणें युवतिचीं जैशीं लतेचीं फुलें ॥
विप्राचें धनही कधींन हरितों यज्ञार्थ संपादिलें ॥
दाई पासुनि लेंकुरें नच कधीं वित्तार्थ मी चोरितों ॥
कार्या कार्य विचार चौर्य समयीं चित्तांत मी राखितों ॥ ६ ॥

असो, तूं **वसंतसेनेला** अशी विनंती कर कीं,

**आर्या.**

माप तुझ्या आंगाचें घेउन घडले असेच समजावें ॥
हे गोप्य अलंकार स्लेहें माझ्या तुवांचि धरिजावे ॥ ७ ॥

**मदनि०—शर्विलका**, जे उजागरीनें घालावयास योग्य नाहींत असे अलंकार माझी धनीन कधींही आंगावर घालणार नाहीं. असो पण ते अलंकार मला दाखीव. पाहूं दे कसे आहेत ते.

**शर्विल०**—हे पहा अलंकार. ( असें म्हणून शंकित पणें इकडे तिकडे पाहून तिच्या हातीं देतो. )

**मदनि०**—( निरखून पाहून म्ह० ) अरे हे अलंकार ओळखीचे दिसतात. हे तुला कोठें मिळाले खरें सांग.

**शर्विल०**—मदनिके, तुला या गोष्टीची पंचाईत कशाला पाहिजे. तूं मुकाट्यानें घे म्हणजे झालें.

**मदनि०**—( रागें भरून ) तूं माझ्याशीं इतकी प्रतारणा करतोस. जर माझा विश्वास तुला नाहीं तर मग मला द्रव्य देऊन सोडवून तरी कशाला नेतोस ?

**शर्विल०**—खरें सांगूं तुला ? आज सकाळीं मला समजलें कीं माणिकचौकांत जो **चारुदत्त** नामा सावकार राहतो त्याच्या घरचे हे.

( हें ऐकून तिकडे **वसंतसेना** आणि इकडे **मदनिका** मूर्छा पावतात. )

**शर्विल०—मदनिके**, सावध हो सावध हो.

**दिंड्या.**

विषादानें जाहलीं शिथिल आंगें ॥
घाबरी कां पाहशी मला सांगें ॥ ८ ॥
नेत असतां मी तुला तनू कंपा ॥
पावली कां, न करिशी अनूकंपा ॥ ९ ॥

**मदनि०**—( सावध होऊन म्ह० ) अरे साहसिका, निर्दया, माझ्या करतां हें अनुचित कर्म करतांना त्या घरांत त्वां कोणाचा जीव घेतला किंवा कोणावर घाव घातला असें तर कांहीं केलें नाहींना ?

**शर्विल०—मदनिके**, तुला ठाऊक असूं दे. हा **शर्विलक** जो

भ्याला किंवा जो निजला त्याजवर प्रहार करीत नसतो. मी कोणाचा जीव घेतला नाहीं, अथवा कोणावर घावही घातला नाहीं. तूं भलती कल्पना करून भिऊं नको.

**मदनि०**—खरेंना हें ?

**शर्विल०**—हो हो, खरें खरें.

**वसंत०**—( शुद्धीवर येऊन ) मी पुन्हा जिवंत झाल्यें हें मोठेंच आश्चर्य.

**मदनि०**—आतां मला बरें वाटलें.

**शर्विल०**—( ईर्ष्येनें म्ह० ) कांगे **मदनिके**, आतां मला बरें वाटलें असें म्हणतेस. यांत तुझें कायगे बरें झालें.

### श्लोक.

स्नेहास गुंतुनि तुझ्याच अकार्य केलें ॥
ज्यां पूर्वज प्रथित[1] कीर्तिस दूषियेलें[2] ॥
रक्षूनि मान तुज नेत असें घराला ॥
दावूनि सख्य मज इच्छिसि तूं पराला ॥ १० ॥

( मनांत कांहीं विषाद आणून म्ह० )

### ओवी.

जे कुलीन पुरुष तरुवर ॥ पाळिती संपत्तिफळांचे भार ॥
ते निष्फळत्वा पावती सत्वर ॥ वेश्यापक्ष्यांनीं भक्षितां ॥ ११ ॥

### श्लोक.

काम हा अग्नि, सुरत ज्वाला, प्रणय[3] इंधनें ॥
ज्या माजि आहुती होती नरांचीं यौवनें धनें ॥ १२ ॥

**वसंत०**—हा व्यर्थ रागें भरतो.

**शर्विल०**—( आपणाशीं बोलतो. ) सर्वथा असें आहे.

### आर्या.

जे श्रीवरिहि स्त्रीवरि ठेविति विश्वास गमति ते मूढ ॥
श्रीची तशी स्त्रियेची गति चंचल कुटिल आणखी गूढ ॥१३॥

---

१ प्रख्यात. २ दूषित केलें. ३ प्रीति हें पेटवण.

## आणखी श्लोक.

करूं नये प्रीति कधीं स्त्रियांवरी ॥
संक्ता[१] नरा मानिति त्या तृणापरी ॥
जी रक्त[२] तीशींच सदा रमावें ॥
विरक्त[३] तीतें सहसा त्यजावें ॥ १२ ॥

कोणी म्हटलें आहे तें खरें आहे.

## श्लोक.

वित्तामुळें[४] रडति हांसति, ह्या नराला ॥
विश्वास दाखवुनि नागविती भल्याला ॥
तस्मात् सुशील कुलजें नचत्या भजाव्या ॥
वेश्या श्मशानकुसुमा परि त्या त्यजाव्या ॥ १५ ॥

आणखी असे आहे.

## श्लोक.

समुद्राच्याँवीची[५] परि चपल वृत्तीस वरिती ॥
स्त्रिया, संध्यारांगा[६] परि लव भरी रागँ[७] धरिती ॥
हरोनी अर्थातें त्यजिति पुरुषा अर्थ रहिता ॥
पिळोनी रंगातें त्यजिति मग तो जेंवि अळिता ॥ १६ ॥

स्त्रिया स्वभावानें चपल खऱ्या. पहा.

## ओवी.

एक पुरुष ह्रदयीं धरिती ॥
एकास दृष्टीनें बोलाविती ॥
एकावरी प्रेमा दाविती ॥
संग करिती एकाचा ॥

कोणी कवीनें म्हटलें आहे, तें खरें आहे.

## दिंडी.

पर्वतार्ग्री न रुजती कमळ वेली ॥
सँरी[८] अश्वाची गर्दभें न केली ॥

---

१ आपणावर आसक्त झालेल्या. २ अनुरक्त. ३ उदासीन. ४ धनाकरितां. ५ लाटा. ६ संध्याकाळचा रंग. ७ प्रीति ८ बरोबरी.

हरिक पेरुनि नुगवती कधीं शाली ॥
पण्य वनितानच सतीपदा आली ॥ १८ ॥

अरे दुष्टा **चारुदत्ता**, आतां होतास कीं नव्हतास असा करून टाकतों. पहा. ( अमळ पुढें चालतो. )

**मदनि०**—( त्याचा पदर धरून म्ह० ) असें असंबद्ध भाषण करून व्यर्थ रागावतोस हें काय ?

**शर्विल०**—व्यर्थ कसा रागावतों ?

**मदनि०**—अरे हे दागिने माझ्या धनिनीचे आहेत. तिनें आपणा साठीं करविले.

**शर्विल०**—मग काय म्हणतेस ?

**मदनि०**—हे तिनें **चारुदत्ता** जवळ ठेवावयास दिले होते.

**शर्विल०**—त्या जवळ कशा करतां दिले ?

**मदनि०**—( त्याच्या कानांत सांगत्ये ) अशा करतां.

**शर्विल०**—( मनांत विस्मय करून ) तर मग गोष्ट वाईट झाली.

**आर्या.**

जी शाखा आश्रयली होउन संतप्त ऊष्ण तापानें ॥
छायार्थ, तिचीं खुडिलीं मूर्खें म्यां न कळुनी स्वतां पानें ॥१९॥

**वसंत०**—काय, याला पश्चात्ताप झाला ! या वरून यानें नकळून हें कर्म केलें खरें.

**शर्विल०**—**मदनिके**, आतां कसें काय पुढें करावें ?

**मदनि०**—या विषयीं तूं पंडित आहेस. तुला सांगावयास नको.

**शर्विल०**—असें कांहीं नाहीं. पहा.

**आर्या.**

म्हणती स्त्रिया स्वभावें पंडित तेथें विशेष बुद्धि वसे ॥
पांडित्य पूरुषांला शास्त्राभ्यासें करूनि येत असे ॥ २० ॥

**मदनि०**—**शर्विलका**, जर माझें ऐकशील तर हे दागिने त्या श्रेष्ठ **चारुदत्ताच्या** हातीं जातील असें कर.

---

१ साळी. २ वेश्या. ३ साध्वीच्या योग्यतेस.

**शर्विल०**—**मदनिके**, तूं म्हणतेस तसें मी करीन; पण त्यानें मला दिवाणांत नेलें तर मग कसें ?

**मदनि०**—छीछी, अशी गोष्ट घडणार नाहीं. चंद्रापासून ताप कधीं होत असतो काय ?

**वसंत०**—शाबास, **मदनिके** शाबास.

**शर्विल०**—**मदनिके** तुला आणखी एक सांगतों. मी त्याचें कांहींच भय बाळगीत नाहीं.

## श्लोक.

या साहसीं न मजला भय वा विषाद ॥
त्याचा किमर्थ कथिशी मज साधुवाद ॥
देतें मनास मम कुत्सित कर्म लाज ॥
आम्हां शठांस नृप काय करील आज ॥ २१ ॥

तथापि दुसरा उपाय सुचेल तर योजावा.

**मदनि०**—दुसरा उपाय हा आहे, तो मी सांगूं ?

**शर्विल०**—कोणता तो सांग.

**वसंत०**—ही कोणता दुसरा उपाय सांगेल बरें !

**मदनि०**—त्याच श्रेष्ट **चारुदत्ताचा** दूत होऊन हे दागिने त्यानें पाठविले आहेत असें सांगून माझी धनीन **वसंतसेना** हिला नेऊन द्यावे.

**शर्विल०**—असें केल्यानें काय होईल ?

**मदनि०**—तूं चोर होणार नाहींस, तो गृहस्थ ऋणमुक्त होईल, आणि जिचे दागिने तिच्या हातीं गेले असें होईल.

**शर्विल०**—हें तर मोठेंच साहस.

**मदनि०**—नाहीं नाहीं. न देशील तर बरीक मोठें साहस.

**वसंत०**—**मदनिके** शाबास. तूं दासी असून कुलीना प्रमाणें मसलत दिली. तुला दासी कोण म्हणेल ?

**शर्विल०**—बरें तर मी तसें करीन. पण तिची गांठ कशी पडेल ?

## आर्या.

तुझिया समागमानें झाली मज बुद्धि उत्तमा प्राप्त ॥
होतां नष्टेंदुनिशा कोण मिळे मार्ग दाविता आप्त ॥ २२ ॥

**मदनि०**—तूं या मदनमंदिरांत घटकाभर बैस. इतक्यांत मी **वसंतसेनेला** तूं आल्याचें वर्तमान सांगून येत्यें.

**शर्विल०**—बरें तर जा. मी येथें बसतों. लौकर ये हो.

**मदनि०**—( **वसंतसेने** कडे जाऊन तिला म्ह० ) बाई साहेब, श्रेष्ठ, **चारुदत्ता** कडून एक ब्राह्मण आला आहे.

**वसंत०**—त्याच्या कडूनच आला असें त्वां कशा वरून जाणलें ?

**मदनि०**—हें जाणण्याचें काय कठीण आहे ?

**वसंत**—(मनांत) (माथा डोलवून हांसून म्ह०) योग्य. (प्रसिद्धपणें.) येऊंदे त्याला.

**मदनि०**—आज्ञा. ( असें म्हणून **शर्विलका** कडे येऊन त्याला म्ह०) चल तुला **वसंतसेने** कडे नेतें. (पुढें जाऊन.) **ती वसंतसेना.** जवळ जा.

**शर्विल०**—(आंत जाऊन **वसंतसेनेस** पाहून म्ह०) तुझें कल्याण असो.

**वसंत०**—भटजीबावा, तुम्हांला मी वंदन करित्यें. हें आसन, यावर बसावें.

**शर्विल०**—(खालीं बसून.) श्रेष्ठ **चारुदत्त** ह्याची तुला विनंती आहे कीं आमचा वाडा जुना होऊन मोडकळीस आला आहे. दागिने संभाळणें कठीण पडतें, या साठीं हे तुझे तूं संभाळ. इतकें बोलून ती दागिन्याची गांठोडी ) **मदनिकेच्या** हातीं देऊन मुकाट्यानें चालता होतो.

**वसंत०**—भटजीबावा, माझा उटल निरोप त्या श्रेष्ठाला घेऊन जा.

**शर्विल०**—(मनांत म्ह०) तिकडे जातो कोण लेंक ? (उघडपणें.) कोणता उलट निरोप घेऊन जाऊं ?

**वसंत०**—ही **मदनिका** आपण न्यावी.

**शर्विल०**—यांतील अभिप्राय मला समजला नाहीं.

**वसंत०**—मला समजला आहे.

**शर्विल०**—कसा बरें ?

**वसंत०**—त्या श्रेष्ठ **चारुदत्तानें** मला असें सांगितलें होतें कीं, जो मनुष्य हे अलंकार तुला आणून देईल त्याला त्वां आपली दासी **मदनिका** द्यावी. तर त्यानेंच ही तुम्हांला दिली असें समजावें.

**शर्विल०**—( मनांत म्ह० ) अरेरे, हिनें मला जाणलें. (उघडपणें.) शाबास **चारुदत्ता** शाबास.

## आर्या.

उत्तम गुण मिळवाया यत्न करावा नरीं झटोनि सदा ॥
निर्धन गुणवंताचें निर्गुण धनवंत साम्य नकरि कदा ॥ २३ ॥

आणखी. **श्लोक.**

गुणार्थ उद्योग किजे नरांहीं[१] ॥
अमाप्य कांहींच गुणांस नाहीं ॥
चंद्रें[२] गुणांनींच अलंघ्य साचा ॥
माथा पहा आक्रमिला शिवाचा ॥ २४ ॥

**वसंत०**—गाडीवान् कोणी आहे ? गाडी जोडून आण. ( इतक्यांत गाडीवान् गाडी घेऊन येतो. )

**गाडीवान०**—बाईसाहेब, गाडी तयार आहे.

**वसंत०**—**मदनिके**, ह्या ब्राह्मणाचे हातीं म्यां तुला दिलें. आतां एकदां मला भेट आणि गाडींत बैस. पण मला विसरूं नको.

**मदनि०**—(रडत्ये.) आतां मी बाईसाहेबांला अंतरलें. (असें म्हणून **वसंतसेने**च्या पायां वर डोय ठेवित्ये. )

**वसंत०**—सांमत तूं वंदनीय झाली आहेस. ऊठ जा आतां गाडींत बैस.

**शर्विल०**—**वसंतसेने**, तुझें कल्याण असो. **मदनिके**, हिच्या पायां वर डोकी ठेव.

---

१ मनुष्यांनीं. २ चंद्रानें.

आर्या.

डोळे भरून पहावें वंदावें आदरें तुंवां हिजला ॥
झाला हिच्या प्रसादें दुर्लभ वधुशब्दलाभ हा तुजला ॥२५॥

(असें म्हणून **मदनिके**सह गाडींत बसून जावयास निघतो.)

(इकडे पडद्या पलीकडून शब्द होतो.)

कोण आहे येथें? कोतवालाची आज्ञा आहे कीं, **आर्यक** नामा गोपालपुत्र तो राजा होणार असें कोणीं सिद्धानें त्याला भविष्य सांगितल्यावरून **पालक** राजानें त्या शंकेमुळें गवळवाड्यांतून त्याला धरून आणून बंदीशाळेंत कोंडून टाकलें आहे. तर आपापल्या जागीं सर्वांनीं फार सावधपणानें रहावें.

**शर्विल०**—(ऐकून) काय? **पालक** राजानें माझा प्रिय मित्र **आर्यक** बद्धकरून नेला? काय करूं आतां? सांप्रत मी सपत्नीक झालों आहें. हिला सोडून जाववत नाहीं. आणि मित्राची उपेक्षाही करवत नाहीं. असें उभयसंकट प्राप्त झालें. तथापि या समयी तर.

आर्या.

सर्वांत मित्र वनिता दोन्ही प्रिय वाटती नराला हो ॥
वनिताशताधिक मला मित्राचा आज वाटतो लाहो ॥२६॥

असो. अरे, गाडी उभी कर. मला खालीं उतरूं दे.

(गाडींतून खालीं उतरतो.)

**मदनि०**—(डोळ्यांतून पाणी काढून हात जोडून म्हणत्ये.) असें आहे खरें, परंतु मला वडील माणसांच्या स्वाधीन करून मग आपण जावें.

**शर्विल०**—शाबास प्रिये. माझ्या मनांत जसें आलें तसेंच तूं बोललीस. (गाडीवानाला म्हणतो.) अरे **चेटा** तुला **रेभिल सावाचें** घर माहीत आहे का?

---

[1] वेश्येची दासी असतां शर्विलकाची वधू (स्त्री) झालीस हाच लाभ. [2] गवळ्याचा मुलगा. [3] लाभ.

**गाडीवान**—हो, आहे तर काय झालें ?

**शर्विल०**—तर, माझ्या प्रियेला त्या घरीं घेऊन जा.

**गाडीवान**—आपण आज्ञा कराल तसें.

**शर्विल०**—प्रिये, सध्यां तूं माझ्या मित्राच्या घरीं जा. मी मागाहून लौकरच येईन.

**मदनिका**—तुमच्या आज्ञेप्रमाणें मी तिकडे जातें. पण तुम्ही जिकडे जात आहां तिकडे फार सावधपणानें असावें. ( असें बोलून निघून जाते. )

**शर्विल०**—मी यासमयीं.

**ओंव्या.**

माझे ज्ञाती असती बहुत ॥ स्वभुजपराक्रमें विख्यात ॥
राजापमानें झालि कुपित ॥ ऐसे राजभृत्य बहु असती ॥ २७ ॥
त्यांस देऊन उत्तेजन ॥ सर्वांस एकदांच उठवून ॥
आपला प्रिय मित्र सोडवीन ॥ पराक्रम पाहीन राजाचा ॥२८॥

आणखी **ओंव्या.**

माझा प्रिय मित्र सहवासी ॥ कारण नसतां तयासी ॥
शंका धरूनी मानसीं ॥ धरूनि नेलें शत्रुजनीं ॥ २९ ॥
जैसा चंद्र राहुमुखांत ॥ तैसा पडला जो बंधनांत ॥
बळात्कारें जाऊन त्वरित ॥ सोडवीन तयातें ॥ ३० ॥

( असें बोलून निघून जातो. )

( इतक्यांत वसंतसेनेची एक दासी येत्ये. )

**दासी**—( **वसंतसेने** जवळ जाऊन ) बाईसाहेब तुमचें दैव चांगलें. श्रेष्ठ **चारुदत्ता**कडून एक ब्राह्मण कांहीं वस्तु घेऊन आला आहे.

**वसंत०**—वाहवा, आज काय सुदिन हा ! अगे जा लौकर आणि **बंधूला** बरोबर त्याला इकडे घेऊन ये.

**दासी**—आज्ञा बाईसाहेब. ( असे म्हणून बाहेर जात्ये. आणि **बंधुलका**सहवर्तमान **विदूषकास** आंत घेऊन येत्ये.

**विषदूक**—( पाहून ) काय हो आश्चर्य हें ! तपश्चर्येचे क्लेश भोगून मिळविलेल्या पुष्पकविमानांत बसून **रावण**राजा डौलानें जात असे. पण आज मी, ब्राह्मण तपश्चर्येचे क्लेश न भोगतां नगरनारीजन बरोबर घेऊन चालत आहें.

**दासी**—भटजीबावा, आमच्या वाड्याचा हा दरवाजा पहा.

**विदू॰**—( पाहून आश्चर्य करितो ).

**कटाव.**

पाहून वाड्याचें द्वार, भटजीबावा झाला गार. पुढें सडे चंदनाचे—टाकियले फार, तेथें केरानसे थार, बहुत भूमिचा विस्तार, गोमयानें सारविला दिसे हिरवाचार, त्यावर कुंकुमाचा मार, सुरंग सुरंग रंग वेली त्यावरकुसुमांचा भार, भूमीतळा वरिल शोभा मानुनी असार, उच्चकरुनि माथा पाहे—गगनचमत्कार, ज्याच्या माथ्यावरी कनकपताका अपार, वायुवेगें हलति सोगे, त्याच हतीं पालवितो, जाणो जवळ बोलावितो, तोरणास हस्ति दंत, जडूनि केला शोभिवंत, जाणो उभा भाग्यवंत स्वर्गजाच्या शुंडास्थुळा शुभ्रते त्या समान, दोहीं भागीं पुष्पमाला—हलतिलंब मान, दोहोंकडे कनककुंभ—मांडयले पूर्ण, त्यावर शोभति आम्रपर्ण कनक कशिपुवक्षतसें सुदृढ कनक कपाट असा दरवाज्याचा थाट पाहून विप्र झाला भाट, आंत जावयाची वाट, दासीनें विप्रा दाखविली; ऐशी हे दरवाज्याची शोभा त्या विप्रें पाहिली. ॥ १ ॥

**दासी**—भटजी बावा, इकडे यावें. हा वाड्याचा पहिला चौक ह्यांत प्रवेश करावा.

**विदू॰**—( प्रवेश करून पाहून म्हणतो. )

**कटाव.**

दासी बोले भटजीबावा, याचा पहिला चौक पहावा, आपण आंत प्रवेश करावा. पाहून भटजी म्हणे वहावा, चंद्र शंख समउज्वल कांती, संगिनजोतींउंच भिंती, जयांस दिधलीन

वी सफेती, वेलबुटी वर फार शोभती, रत्न शिळांचे जिने तयाला, अनेक रंगी मिनाछताला, रंगमहाल सोनेरि बैठका, रंगामेजीतमाम ऐनें भर्जरि पडदे लोड तिवासे खणोखणीं झुंबरें-फानसें, ऐसा चौंबाजूनें माड्या, त्यांच्या खिडक्या असती उघड्या, मुक्त झालरी वरती सारुन, स्फटिक गवाक्षें चक्षू उघडुन, जाणो **उज्जयनी** नगराची, शोभा पाहति कुतुकें साची, द्वारपाळते झोंपसुखानें; घेती नवदतिशब्दमुखानें दहिंभाताचे बळीटाकिले, ते खायाला काक मिळाले, चुनाचकीं हा या शंकेनें, नस्पर्शति ते प्रथम चंचुनें, पुनरपि येउनि त्यांनीं झडप घातली, ऐशी हे पहिल्या चौकाचीशोभा त्या विप्रें पाहिली;॥२॥ बरें पुढें वाट दाखीव.

## चौक दुसरा.

दासी बोले भटजी बावा, यावें दुसरा चौक पहावा, आपण आंत प्रवेश करावा, पाहुन भटजी म्हणे वाहवा, दुसऱ्या चौकामधिं मोठाले, हे गाडीचे बैल बांधिले, रतीबखाऊन पुष्ट जाहले ज्यांचा शिंगां तेल माखिलें, तिकडे म्हैसा बसला कैसा आवमानित कुलपूरुष जैसा, सुसकारे टाकितसे तैसा, कुस्ती झाल्यावर मल्लाची, जैशी मान रगडिति त्यांची, तैशी रगडिति येडक्याची. झाली असेल झुंझ तयांची, तिकडे घोंडे पुष्कळ दिसती, कोणी त्यांच्या पाठी पुसती, अयाल वेण्या कोणि घालिती, कोणी पुछातें विंचरिती, कोणी लगाम तोंडीं देती, खोगिर घालुनि तयार करिती, कोणी त्यांना चाल शिकविती, फिरवायाला बाहेर नेती, दाणापाणी रतीब चारिती. कोणी त्यांवर झुली बांधिती, तिकडे हस्ती करितो मस्ती, त्याला पाजी पाणी भिस्ती, पहा कसा दो अंगीं झुलतो, महात त्याला रतीब देतो, गोळे बांधुन पुढें टाकितो, सोंडेनें गज मुखीं घालीतो, पागेमध्यें वानर थोर, बांधियेला दृढ जैसा चोर, कोणी न जाती त्याज समोर, त्यानें फारचि मस्ती मांडिली, ऐशी

हे दुसऱ्या चौकांची शोभा त्या विप्रें पाहिली. ॥ ६ ॥ पुढें वाट दाखीव.

## चौक ३.

### कटाव.

श्रीमंताचे पुत्र विलासी, कामुक होऊन येति घरासी, त्यांला बैठक बसावयासी, चौबाजूनें मंच मांडिले, मध्यें रुजामेमऊ घातले, त्यांवर गालीचेहि पसरले, चौरंगावर रम्यपुस्तकें, वाचाया ठेविलीं कौतुकें, येकिकडे भर्जरीपटावर रत्नखचित सोंगटीं मांडिलीं, नानापरिचीं चित्रें रंगित, पहा वयाला जवळ ठेविलीं, बुद्धिबळें गंजिफा वाडिच्या, यंत्रें पेट्या बहुवाद्यांच्या, द्राक्षें अंजिर केळीं पिकलीं, सुवर्ण ताटें भरुन ठेविलीं, शीतळ उदकें पूर्ण सुरय्या, त्यांच्या खालीं असती तिवय्या, पानसुपारी भरूनि तबकें, जवळ फुलाचें सुंदर झुबके, भरुनि विड्याचे आंत मसाले, जवळ रुप्याचे असति चौफुले, संपादाया त्यांची मर्जी, जवळ ठेविली तमाखु मिर्जी, जे जे ब्रिसनी घरास येती, त्यांना रंजविण्याची युक्ती, यापरि करूनी ठेविली, ऐशी हे तिसऱ्या चौकाची, शोभा त्या विप्रें पाहिली. ॥ ४ ॥ बरें आतां पुढें वाट दाखीव.

## चौक ४.

दासी बोले भटजीबावा, यावें चौथाचौक पहावा, आपण आंत प्रवेश करावा, पाहुन भटजी म्हणे वाहवा, जिकडे तिकडे वाद्यें दिसती, त्यांचे ध्वनिमंजूळ ऊठती, कोणी सारंग्या वाजविती, वस्तादाला हाक मारिती, विणा घेउनि मांडिवरती, वनिता त्यांच्या तारा जुळिती, कोणी मृदंग घेऊन बसती, धिम्‌ धिम्‌ धिम्‌ धिम्‌ थरिकिट्‌ थरिकिट्‌ ऐसे त्यांचे निघती अवाज. कोणी वाजविती पखवाज, अंगावर घालुनियां साज, कोणा नाहीं तेथें लाज, कोणी गायक तालिम देती, कोणी

नाचायाला शिकती, कोणी सुस्वर गायन करिती, धृपद तराणा प्रबंध गाती, सरिगम पधनी निधपम गरिसा, सप्त सूरतिग्राम मूर्छना, राग रागिणी त्या फीरविती, अलाफ गाउनि स्वर आळविती, कोणी गाती कोणी ऐकती, आनंदानें काळ सारिती, यापरि तेथें धूम चालली, ऐशी हे चवथ्या चौकाची शोभा त्याविषें पाहिली. ॥ ५ ॥ बरें आतां पुढें वाट दाखीव.

## चौक ५.

दासी बोले भटजीबावा, आतां पांचवा चौक पहावा, आपण आंत प्रवेश करावा, पाहुनि भटजी म्हणे वाहवा, येथे षड्स चतुर्विधान्नें, करिती नानाविध पक्वान्नें, घिवरकचोऱ्या साखरफेण्या, मोतीचूर जिलेब्यादळ्या, भातकेशरी परमकूसरी, खीरशिरापुरि पूरणपोळ्या, वडे घारगे आणि सांडगे, तळिती त्यांचा वास ऊमगे, हिंगफोडणी गरम मसाले, त्याचे खमंग वास सूटले, तिकडे कोणी मोदक वळिती, कोणी ते श्रीखंड गाळिती, महानसें अंतरींतापती, धूममिषानें श्वास टाकिती, त्यांच्या घेऊनियां वासातें, दरिद्रियांचे मन, लोभवतें कोणी मजला असे म्हणेना, पाणी घेऊनि पादधावना, करूनि सत्वर येइं ब्राह्मणा, पात्र वाढलें करीं भोजना, मला येइना बोलतांना, ऐशीं अन्नें अम्हा निर्धना, कोठुनि मिळतिल दैवविहीना. यांची मालक वसंतसेना, भाग्यवंत येथील माणसें, असें भाग्य इतरांला नदिसे, स्वर्गांतिल गंधर्व नायिका तैशा येथिल पुरुष बायका, खातीपीती मौजमारिती वस्त्रभूषणें लेउनि फिरती, मला वाटती देवेंद्राची नगरी येथें उतरली. पांचव्या चौकाची हे शोभा त्या विषें पाहिली ॥ ६ ॥ असो, स्वर्गांतील गंधर्व आणि अप्सरा ह्यांप्रमाणें नानाविध वस्त्रालंकारांनीं सुशोभित गणिका आणि बंधुल ह्यांनीं खरेंच हें गृह इंद्र भुवनासारखें केलें आहे. अरे तुम्ही बंधुल हे कोण आहांरे ?

**बंधुल०**—आम्ही कोण तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? सांगतों ऐका.

### अभंग.

परगृहीं आम्हीं असों बहू तूष्ट ॥ परान्नानें पुष्ट असों सदा ॥ ३१ ॥
पराव्या पुरुषांपासूनी कारटीं ॥ परांगनापोटीं झालों आम्हीं ॥ ३२ ॥
परधनावरी अम्हां असे आर्ता ॥ सद्गुणाची वार्ता स्वमीं नाहीं ॥३३॥
खेळतसों आम्हीं बंधुल नांवाचे ॥ छावे कुंजराचे तयापरी ॥ ३४ ॥

**विदू०**—बरें आहे तुमचें सवाहात नशीब बेळ्यांनो. असो, गो चेटी, पुढें वाट दाखीव.

**दासी०**—भटजी बावा इकडे या. हा सहावा चौक आहे. यांत प्रवेश करावा.

**विदू०**—(प्रवेश करून पाहून म्ह०) अहाहा, काय येथें चमत्कार हा! ह्या सहाव्या चौकांत

### कटाव.

दासी बोले भटजी बावा, यावें सहावा चौक पहावा, आपण आंत प्रवेश करावा; पाहुन भटजी म्हणे वहावा, दरवाज्याच्या चौकटीला, सोन्याचाच मुलामा केला, त्यावर नाना रंगी रत्नें, जडलीं असती महाप्रयत्नें, त्यांचीं तेजें दिसती; सेजें एकवटुनि तीवरती जाती, इंद्र धनुची शोभोदती, इंद्रनीळ गोमेद मौक्तिकें, हिरे पाच वैडूर्य माणिकें, पुष्कराज पोंवळीं सुरंगें, ऐशीं रत्नें नाना जाती, कारागिर घेउनियां हातीं, मनामध्यें ते विचार करिती, योग्य स्थानें पाहुनि जडतीं, असे दागिनें जडावाचे, तेथें करिती नाना परिचे; बहु मोलाचे, बहुत मिन्याचे, कोणि करावी गणती त्यांची तेथें वाण नसे मोत्याची, रत्न जडित हातांतिल पौंची, बाळ्या बुगड्या काप गुंफिती, पेट्या पेटी जवे पटविती, साणेवरती मणी घासिती, शंख, पोंवळीं यांचे

१ आवड. २ हत्तीचे.

कातिती, उंच उंच वस्त्रातें घेउनि, त्यांस फुलांचा वास लाविती, कस्तूरीचे नाभ फोडिती, कोणि सुवासिक चंदन घेउनि, गंध उगाळुनि वाट्या भरती, अष्टगंध अरगजाहि करिती, कामिजनासह वेश्यावसती, सिद्ध करुनि तांबूल आर्पती, परस्परांते प्रेमें पाहति, हास्यविनोदें काळक्रमिती, पुन्हा पुन्हा मदिरेचें पान, करूनि घेती स्वसमाधान, नाहीं त्यांला घरचें भान, जाणो कामाचेंच दुकान, दुसरे कामुकजन हे बसले, स्त्रीपुत्रादिक सर्व विसरले, रात्रंदिवसां पडुनि राहिले, गणिकांनीं जीपिउनि उरली, तीच उष्टी मदिरा त्यांनीं प्राशिली, ऐशी सहाव्या चौकाची शोभा त्या विप्रें पाहिली ॥ ७ ॥

पुढें वाट दाखीव.

**दासी०**—या या, भटजी बावा, पुढें या हा सातवा चौक पहा. यांत प्रवेश करा.

**विदू०**—( प्रवेश करून पाहून म्ह० ) वाहवा; ह्या सातव्या चौकांत तर

## कटाव.

दासी बोले भटजी बावा, सातवा हा चौक पाहवा, आपण आंत प्रवेश करावा, पाहून भटजी म्हणे वाहवा, सातव्या चौकामध्यें पाहिले, नाना परिचे पक्षि पाळिले, शुक पिक मैनासुंदर बोले, बोलती ते पंजरीं घातले, राजहंस सारस हे फिरती, कपोत पारावतहि दंपति, उडोनि सज्जावरती बसती, परस्परांचें चुंबन करिती, सुरत सुखाचा अनुभव घेती दूधभात खाऊन सुखानें, रावे पुटपुट करति मुखानें, पुष्परसांचीं करूनि सेवनें, कोकिल गाती मधुर स्वरानें, लावक तित्तिर बुलबुल पक्षी, झुंजाया दुसऱ्यातें लक्षी, विचित्र रंगीपक्षी शोभती, मोरमयूरी सवें नाचती, पक्ष आपुले थरारवीती, पुच्छभार विस्तारुनि सारा, रविकिरणांनीं तर जाहाल्या, वाड्याला जणु घालिति वारा, चंद्र किरण

सम शुभ्र वर्ण हे, राजहंस हंसी ते घेऊनी, मंदगतीला शिकावयाला, फिरति स्त्रियांच्या मागुनि मागुनि, तिकडे सारस पक्षी दिसती, विटाप्रमाणें धीट होऊनी, डुलतडुलत, डौलानें फिरती, ऐसें हें गणिकेचें मंदिर, इंद्रभुवन समदिसतें सुंदर, ऐशी स्थानें पहावयाचीं, आणखी कितिगे राहिलीं, ऐशी सातव्याचौकाची शोभा त्या विप्रें पाहिली ॥ ८ ॥

दासी— या आतां फार नाहींत. हा शेवटला आठवा चौक प्रवेश करावा.

विदू०— ( प्रवेश करून पाहून म्हणतो. ) अगे चेटी, हा कोणगे? जो भरगची जरीचादुपेटा पांघरून आंगावर पांटीभर अलंकार घालून डौलानें डुलत डुलत इकडे तिकडे फिरत आहे?

दासी— भटजीबावा, हा माझ्या धनिनीचा भाऊ होय.

विदू०—वसंतसेनेचा भाऊ काय? तिचा भाऊ होण्यास ह्यानें किती तप केलें असेल कोण जाणे परंतु यांत कांहीं योग्यता किंवा प्रतिष्ठा नाहीं. जरी हा नेटका सुभाणा दिसतो तरी श्मशानांतल्या चंपक वृक्षाप्रमाणें लोकांस हा असेव्य आहे. ( दुसरेकडे पाहून ) तो असो. पण ही कोणगे; जी बुटीदार शालू नेसुन तेलानें चबचबलेला लाल जोडा पायांत घालून उंच पलंगा वर बसली आहे?

दासी०— ही माझ्या यजमानिनीची मातोश्री.

विदू०— अबब मसणांतल्या डाकिनी प्रमाणें हिच्या पोटाचा केवढा विस्तार हा? तर काय हिला अगोदर आंत बसवून महादेवाच्या देवळा प्रमाणें मग दरवाजा बांधला काय?

दासी०—भटजी बावा, आमच्या मातोश्रीची थट्टा अशी करूंनका. अहो हिला चातुर्थिक हिंवानें फार पीडिलें आहे.

विदू०—( थट्टा करून म्ह० ) हे भगवंता चातुर्थिका अशाउपचारांनीं मज ब्राह्मणा कडे ही एकवेळ कृपादृष्टि करून पहा.

दासी०— वेड्या मरशील.

**विदू०**— — ( हांसून म्ह० ) अगे दासीपुत्रिके, असला सुजलेल्या पोटाचा ढेर मेला तर बरा. दारू पिऊन पिऊन माजलेली ही थेरडी अशा दशेस पावली आहे. ही जर मेली तर हजार कोल्ह्यांचीं पोटें भरतील. अगे अशा अगडबंब शरीराच्या तुम्ही बायका चालतांतरी कशागे ? तुम्हांला होड्या गाड्या वाहतात काय ?

**दासी**— नाहीं नाहीं. होडया गाड्या कशाला पाहिजेत.

**विदू०**— हो येथे विचार करावयास नको. प्रेमरूप निर्मल जलानें भरलेल्या मदनसमुद्रांत स्तन, जघन, नितंब, हींच तुम्हांस सुंदर गमनसाधनें आहेत. असो. अशा प्रकारचा हा वसंतसेनेचा सर्व संपत्तीनीं भरलेला आठ चौकांचा वाडा पाहून तिन्ही लोकांची संपत्ति एकत्र झाली असें मी समजतों. याचें वर्णन करावयास माझ्या वाणीला शक्ति नाहीं. हें गणिकागृह म्हणावें, किंवा कुबेराचें मंदिर आहे म्हणावें. असो तुझी यजमानीन कोठें आहे ?

**दासी**— आर्या, ती बागेंतल्या बंगल्यांत बसली आहे. आपण आंत जावें,

### कटाव.

दासी बोले भटजीबावा, या चौकांतिल बाग पाहावा आपण आंत प्रवेश करावा, पाहुन भटजी म्हणे वाहवा, सुंदरबाग दिसे हा येथें, नाना विध फुल झाडें तेथें, जाइजुई शेंवती मोगरी, कुंद कुसर मालती कणेरी, सोनटका माधवी चमेली, स्वर्ण केतकी कापुर वेली, बकुल मनोहर सुवर्ण चंपक, मोतीया मोगरा सुवासिक, मरवा पाच सुवासिक दवणा, उग्रगंध तो त्यांत पुदाणा, यापरिचीं फुल झाडें फुललीं, त्यांवर मधुपकुळें लोभवलीं, पुष्पांचा मकरंद सेविती, गुंगुं गुंजारव बहु करिती, फुल झाडांचीं फुलें गळालीं पुष्पांची जणूशेज घातली, मधें लहानसें तळें निर्मिलें, त्यामध्यें जळ मंदिर केलें, सरोवरांतिल कमळें

फुलली, जाणो नेत्रें त्यांहि उघडिलीं, कारंज्याच्या धारा उडती, झाडां खालुनि पाट वाहती, हें सुखभोगी **वसंतसेना**, इतरां कैचें दैवविहीना, पाहुनि वृत्ती सुखावली ॥ ऐशी त्या प्रमदवनाची शोभा त्या विप्रें पाहिली ॥ ९ ॥

**विदू०**—( पाहून जवळ जाऊन म्ह० ) नायकिणी, तुझें कल्याण असो.

**वसंत०**—( कोण **मैत्रेय** आला काय ? ) (उभी राहून ) **आर्या.** तुझें स्वागत असो. ह्या आसना वर बसावें.

**विदू०**—तूं पण खालीं बैस.

( दोघे खालीं बसतात )

**वसंत०**—**आर्या**, शेटजी खुशाल आहेत ना ?

**विदू० आर्ये**, खुशाल आहे तो.

**वसंत०**—**आर्या**, सांप्रत काळीं

**श्लोक.**

शाखा सद्गुण पालवी विनय ही विश्रंभ मूळें, दया ॥
छाया स्वाचरण प्रकांड, फुललीं चारित्र पुष्पें जया ॥
सत्कारोपकृती फळें, रससुधातुल्या गिरावाहती ॥
ऐशा सज्जन पादपा वरी सुत्दत्पक्षी सुखें राहती ॥ ३५ ॥

**विदू०**—( मनांत म्ह० ) ह्या धूर्त गणिकेनें ताडलें वाटतें. ( उघडपणें ) हो यांत काय संशय ? तसेंच आहे.

**वसंत०**-**आर्या**, तुला इकडे येण्याचें कोणतें कारण तें सांगशील ?

**विदू०**—सांगतों ऐक. त्या श्रेष्ठ **चारुदत्तानें** हात जोडून तुला विनंती केली आहे.

**वसंत०**—( आपण हात जोडून म्ह० ) काय आज्ञा केली आहे ?

**विदू०**—त्याचें म्हणणें आहे कीं, त्वां जे सुवर्णालंकार विश्वासानें मजपाशीं ठेवले ते माझे असें समजून म्यां द्यूतांत हार

विले. ज्या द्यूतकारानें ते जिंकून घेतले तो राजाचा अपराधी आहे. तो प्रस्तुत कोठें गेला समजत नाहीं.

**दासी**—बाईसाहेब, तुम्ही मोठ्या दैवाचीं. तुमचा यजमान जुवे बाज झाला.

**वसंत**०—( मनांत म्ह० ) काय चोरानें नेलें असून द्यूतांत हारविलें म्हणतो ? शाबास **चारुदत्ता** ? ह्या तुझ्या गुणावर जीव ओवाळून टाकावा. ( उघडपणें ) मग पुढें काय ?

**विदू**०—म्हणून त्यांच्या मोबादला ही रत्नमाला कृपा करून घ्यावी.

**वसंत**०—( मनांत म्ह०) काय, ते अलंकार ह्याला दाखवूं काय ? ( चिंतन करून. ) पण नको. पाहूं पुढें काय तें. ( असें म्हणून उगीच बसते. )

**विदू**०— कां ? ही रत्नमाला कां घेत नाहींस ?

**वसंत**०—( हांसून सखीच्या मुखा कडे पाहून म्ह० ) **मैत्रेया,** त्या सज्जनानें पाठविलेली रत्नमाला मी कशी घेणार नाहीं ? घेत्यें दे इकडे. (असें म्हणून रत्नमाला घेऊन बाजूस ठेवते आणि मनांत म्ह०) काय आश्चर्य हें ? फुलांचा भर गेला तरी सहकार तरूपासून मकरंद बिंदू पडतातच. (उघडपणे ) **मैत्रेया,** त्या द्यूतकाराला माझा निरोप सांग कीं मीही तुझ्या दर्शना करितां संध्याकाळीं तुज कडे येणार आहें.

**विदू**०—( मनांत म्ह० ) ही त्याज कडे जाऊन आणखी दुसरें कांहीं मागून घेणार आहे वाटतें ( उघडपणें ) अगे मी सांगेन त्याला. ( मनांत) कीं गणिकेच्या प्रसंगापासून दूर रहा म्हणून. ( असें बोलून निघून जातो. )

**वसंत**०— अगे **चोटि,** ही रत्नमाला घे. चल आपण त्या **चारुदत्ता** कडे त्याचें मनोरंजन करण्या करितां जाऊं.

**दासी**०— बाई साहेब, पहा हें अभाळ दाट भरलें आहे. ही जावयाची वेळ नव्हे.

**वसंत**०— असो कसें तरी. मी जाणार.

## आर्या.

येवोत मेघ किंवा रात्रि असोवा पडो सदा वर्ष[1] ॥
नाहीं मोजित तें मी मजला जाया प्रियाकडे हर्ष ॥ ३६॥

अगे तो हार घेऊन तूं लौकर ये. (असें झाल्या वर सर्व निघून जातात. )

## चवथा अंक समाप्त.

---

१ वृष्टि.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक ५.

स्थल.

### चारुदत्ताची बाग.

पात्रें.

चारुदत्त. ............... सावकाराचा पुत्र.
विदूषक................ चारुदत्ताचा मित्र.
वसंतसेना ............... कलावंतिणीची मुलगी.
चेट कुंभीलक. ........... वसंतसेनेचा दास.
विट. .................. वसंतसेनेचा सोबती.
चेटी .................. वसंतसेनेची दासी.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक ५.

### प्रारंभ.

( तदनंतर **चारुदत्त** उत्कंठित होत्साता येऊन आसनावर बसतो. )

**चारुदत्त**—( वर आकाशा कडे पाहून म्हणतो. ) हें आज अकाल दुर्दिन उद्भवलें आहे. हें असें.

श्लोक.

आनंदले नटति पाहुनि ज्यास मोर ॥
त्रासोनि हंस नच ठाकति ज्या समोर ॥
तेंहें अकालिकचि दुर्दिन होय भारी ॥
कामी जनास गगनासहि रोधकारी ॥ १ ॥

आणखी

श्लोक.

हा मेघ आर्द्रमहिषोदरतुल्य काळा ॥
शंखाकृती धरि करांत बलाकमाळा ॥
विद्युत्प्रभा वसन पीत कसोनि हातें ॥
वाटे दुजा हरिच आक्रमितो नभातें ॥ २ ॥

आणखी

आर्या.

माधव गात्रश्यामल शुभ्रबलाकासमूहरचितदर ॥
विद्युत्पीतवसन हा शोभे अंभोद जेंवि चक्रधर ॥ ३ ॥

ओवी.

मेघोदरांतूनि जलाच्या धारा ॥ भूमीवरी पडती झरारा ॥
जैशा शुद्ध रजताच्या तारा ॥ विद्युत्प्रकाशें झळकती ॥ ४ ॥

---

१ पावसाचें काहूर. २ विघ्न करणार. ३ रेड्याचें पोट. ४ बगळे. ५ विष्णुच.

होतां विद्युल्लतेचें स्फुरण ॥ दिसती नदिसती क्षणक्षण ॥
जाणो अंबरपटाच्या दशा जीर्ण ॥ झडोनि खालीं पडताती ॥५॥

आणखी

श्लोक.

कांहीं हंस मयूर कोक बकसे वेगें उडों पाहती ॥
कांहीं कांसव मीन नक्र सुसरी पाण्यामधें पोंहती ॥
कांहीं पर्वत वृक्ष तुंग शिखरप्रासादसे दीसती ॥
वातें हालवितां नभीं घन असे नाना कृती शोभती ॥ ६ ॥

आणखी

श्लोक.

भासे कौरवराष्ट्रतुल्य नभ हें जें अंधकारा धरी ॥
हर्षानें बहु गर्जना करि शिखी **दुर्योधना**चे परी ॥
द्यूतीं निर्जित धर्मसा पिक वनीं आला असे संप्रती ॥
गेले स्त्रीसह हंस **पांडव** तसे अज्ञातवासा प्रती ॥ ७ ॥

( चिंतन करून ह्म० ) **मैत्रेय वसंतसेने** कडे जाऊन फार वेळ झाला. अद्यापि परत कां येत नाहीं ?

( इतक्यांत विदूषक येतो. )

**विदूषक**—( आपणाशीं बोलतो. ) काय आश्चर्य सांगावें ? ह्या गणिकेचा केवढा लोभाविष्टपणा आणि केवढा कृपणपणा हा ? दुसरी तिसरी गोष्ट कांहीं नकाढतां आणि अनादर बुद्धीनें माझ्याशीं कांहीं नबोलतां मुकाट्यानें रत्नमाला तिनें घेतली. तिची येवढी मोठी संपत्ति असून मला इतकें देखील म्हणाली नाहीं, कीं आर्या **मैत्रेया,** अंमळ बैस. तूं श्रमला असशील. थोडीशी सुंठ साखर खाऊन पाणी पिऊन मग जा. छी ? ही तिची चाल फार वाईट. कोणी म्हणतात ते खरें आहे. कंदावांचून कमळ, अवंचक वणिक्, विश्वासूक सोनार, कलहावांचून ग्रामसंबंध, आणि निर्लोभ गणिका असें असणें हें फार विरळ. तर आतां

मी आपल्या मित्राला कसें तरी करून ह्या गणिकेच्या प्रसंगापासून परावृत्त करीन. तो माझा प्रियमित्र वृक्षवाटिकेंत बसला आहे, तिकडे जातों. ( जवळ जाऊन ) मित्रा, तुझें कल्याण असो.

चारुदत्त—( त्याज कडे पाहून ) काय माझा मित्र **मैत्रेय** आला? मित्रा आलास बरें झालें. खालीं बैस.

विदू०—हा बसलों.

चारु०—मित्रा, इतका उशीर कां लागला? असो ज्या कार्यास तूं गेला होतास तें कार्य कसें काय झालें तें सांग.

विदू०—मित्रा, तें कार्य बिघडलें.

चारु०—काय म्हणतोस? तिनें रत्नमाला घेतली नाहीं काय?

विदू०—असें दैव आमचें कोठें आहे? तिनें कमला सारख्या कोमल करांचा अंजली मस्तकीं धरून ती घेतली.

चारु०—तर मग काय म्हणतोस, कीं कार्य बिघडलें?

विदू०—बिघडलें नाहीं तर काय झालें? अरे, ज्यांचा उपभोग आपण एक दिवस देखील घेतला नाहीं, जे चोरांनीं नेले आणि ज्यांचें मोल ही मोठेंसें नाहीं, अशा अलंकारांकरितां चतुः समुद्रांतील सारभूत जी अमूल्य रत्नमाला ती घालविली, याहून नाश तो कोणता? मी म्हटलें, ती गणिका रत्नमाला घेणार नाहीं. तुझ्या स्नेहामुळें परत देईल. पण ती असली लोभी. तिनें घेतली ती घेतलीच.

चारु०—मित्रा, असें म्हणू नको अरे, असें आहे.

## आर्या.

अवलंबुनियां[1] ज्यातें मजपाशीं ठेविला तिनें ठेवा ॥
तोहा विश्वास[2] महा, त्याचें हें मूल्य[3] होय भूदेवा[4] ॥ ८ ॥

विदू०—मित्रा, आणखी दुसरें एक मला संतापास कारण झालें. ती सखीजनाला खूण करून तोंडाला पदर लावून. मज

१ धरून. २ विश्वासातें. ३ मोल. ४ हे ब्राह्मणा मैत्रेया.

कडे पाहून खदखदां हांसली. असा तिनें माझा उपहास केला. यासाठीं मित्रा, मी ब्राह्मण असतां तुला हात जोडून विनंती करतों. अतःपर हा जननिंद्य जो गणिकासंबंध त्याचा त्याग कर. त्या प्रसंगांत चित्त घालूं नको, ती संध्याकाळीं तुज कडे येणार आहे. आल्यावर आणखी काय घेऊन जाईल कोण जाणें? ह्या गणिका म्हणजे जोडयांतल्या खड्या सारख्या आहेत. लौकर निघत नाहींत आणि खुपल्यावांचून राहात नाहींत. आणखी सांगतों. हे मित्रा, गणिका, हस्ती, कायस्थ, भिक्षुक, चोर, आणि रासभ, हे जिथे राहतात तिथें दुष्टभाव उत्पन्न झाले नाहींत असें नाहीं; होतातच.

**चारु०**—मित्रा, ही निंदा पुरे आतां. माझ्या अवस्थेनेंच मला त्या प्रसंगांतून काढलें आहे. पहा

श्लोक.

वेगातें करितो तुरंग[१] गमनीं चालावयाला अती ॥
त्याचीं तीं परि पावलें नच तशीं शक्तिक्षयें चालती ॥
तैशा पूरुषचित्तवृत्ति चपला चोहोंकडे धांवती ॥
खिन्ना होउनित्या पुन्हा परतुनी चित्ता प्रतीपावती ॥ ९ ॥

मित्रा, आणखी सांगतों ऐक

## आर्या.

ज्याचा अर्थ तया ती कांता, तो अर्थलभ्य जन जाण ॥
( मनांत ) नाहीं नाहीं ( पुन्हा उघडपणें म्ह० )
अर्थानें त्यजिलें मज तिज म्यां त्यजिलेचि हें मनीं आण ॥१०॥

**विदू०**—( खालीं पाहून मनांत म्ह० ) जेव्हां हा वरतीं पाहून दीर्घ[२] उस्वास टाकतो तेव्हां असा तर्क होतो कीं, मीं याचें निवारण केलें असतां याची उत्कंठा अधिकच वाढली. तस्मात् कामाची गति वक्र आहे असें जें म्हणतात तें खरें

१ अश्व. २ फार. ३ परंतु.

आहे. (उघड पणें) हे मित्रा, मी निघालों तेव्हां ती म्हणाली, **मैत्रेया, चारुदत्ताला** सांग कीं, आज संध्याकाळीं मी तुझ्या भेटीस येईन. यावरून असा तर्क होतो कीं ती रत्नमालेनें संतुष्ट झाली नाहीं. म्हणून दुसरें कांहीं मागावयास येणार असेल.

**चारु॰**—मित्रा, बरें, येऊंदे. आली तर संतुष्ट होऊन जाईल.

(इतक्यांत **कुंभीलक** नामा चेट येतो.)

**चेट**—ऐकाहो लोकांनो.

## श्लोक.

जैशी जैशी होतसे वृष्टिभारी ॥
तैशी तैशी भीजते पाठ सारी ॥
जैसा जैसा लागतो थंड वारा ॥
तैसेंतैसें आंग कांपे थरारा ॥ ११ ॥

(हास्यकरून ह्मणतो.)

## श्लोक.

छिद्रें सात जयास वाजविन तो वेणू[1] अतां सुस्वरें ॥
तारा सात जिला अशी घुमवितों वीणा पहा[2] मी करें ॥
गाणें गाइन तेंच मी उचित जें त्या रासभाला[3] असे ॥
गाया **नारद तुंबुरू** मजपुढें येतील आतां कसे ॥ १२ ॥

माझी धनीन **वसंतसेना**, तिनें मला आज्ञा केली आहे की, अरे **कुंभीलका**, आर्य **चारुदत्ताकडे** जाऊन त्याला कळीव कीं आपल्या भेटीस **वसंतसेना** येत आहे. तर या साठीं **चारुदत्ताच्या** घरें गेलें पाहिजे. (असें म्हणून इकडे तिकडे फिरून पुढें पाहून म्ह॰) तो **चारुदत्त** बागेंत बसला आहे. आणि तो द्वाड भटही त्याच्या जवळ आहे. असो मी जवळ जातो. काय, बागेचा झोंपा लावला आहे. आतां आंत

१ भोंकें. २ पांवा. ३ गाढवाला.

कसें जावें ? हा झोंपा कोण उघडील ? असो, त्या भटाला खूण करावी म्हणजे तो येईल. ( असें म्हणून मातीचीं ढेंकळें त्याच्या आंगावर फेंकतो. )

**विदू०**—अरे, कुंपणांतील आंब्याचे झाडावर जशीं ढेंकळें मारावीं तशीं मला ढेंकळें कोण मारतो ?

**चारु०**—अरे, बंगल्याच्या सज्जावर पारवे क्रीडा करतात. त्यानीं माती पाडली असेल.

**विदू०**—अरे रांडलेका दुष्टा पारव्या, थांबथांब, ह्या दांडक्यानें पाडाचा आंबा पाडावा तसा तुला ह्या सज्जावरून खालीं पाडतों पहा. ( असें म्हणून दांडकें घेऊन मारावयास धांवतो. )

**चारु०**—( विदूषकाचें यज्ञोपवीत धरून ओढतो. ) मित्रा, बैस खालीं, हें काय करतोस ? तो गरीब बिचारा पारवा आपल्या स्त्रीसहवर्तमान मौजेनें बसला आहे. त्याला उपद्रव कां करतोस. बसूंदे त्याला.

**चेट**—काय हा मूर्ख भट त्या पारव्याकडेसच पाहतो, मजकडे पाहत नाहीं. असो आणखी ढेंकूळ मारून पाहतों.

( असें म्हणून पुन्हा ढेंकूळ मारतो. )

**विदू०**—( चोहों दिशांकडे पाहून ) आँ—झोंप्याकडे **कुंभीलक** आला आहे काय ? आलोंआलों, थांब. ( जवळ जाऊन झोंपा उघडतो. ) अरे, **कुंभीलका**, आलास, ये आंत.

**चेट**—( आंत जाऊंन ) भटजीबावा, तुह्माला मी वंदन करतों.

**विदू०**—कल्याण. अरे **कुंभीलका**, अशा आंधाराच्या आणि पावसाच्या वेळेस तूं इकडे कोणीकडे आलास ?

**चेट**— अरे, ही ती.

**विदू०** — कोण ? ही ती कोण ?

**चेट**— अरे ही ती.

**विदू०** — ही ती ही ती असें काय करतोस नीट बोल.

**चेट**— तूं तरी कोण ही ती कोण ही ती असें काय विचारतोस ? नीट विचार.

**विदू०** — बरें असो. नीट सांग. ही कोण ती.

**चेट**—( मनांत म्ह० ) आतां दुसऱ्या प्रकारानें सांगावें ( उघडपणें. ) अरे तुला प्रश्न घालतों.

**विदू०**—तुझ्या डोकीवर मी पाय ठेवतों.

**चेट०**—बरें सांग तूं. आंब्याला मोहोर येण्याचा ऋतु कोणता ?

**विदू०**—अरे रांडलेका, ग्रीष्म.

**चेट**—( हांसून ) नाहीं नाहीं, ग्रीष्म नाहीं.

**विदू०**—( मनांत. ) आतां येथें काय करावें ?

( विचार करून ) असो **चारुदत्ता** कडे जाऊन त्याला विचारावें. तो बुद्धिवान् आहे; उत्तर सांगेल.

( उघडपणें अरे अंमळ उभा रहा. मीं जाऊन येतों.

( **चारुदत्ता**कडे जाऊन. ) मित्रा, तुला पुसतों तें सांग. आंब्याला मोहोर येण्याचा ऋतु कोणता ?

**चारु०**—मूर्खा, वसंत.

**विदू०**—असें काय ? ठीक. ( चेटाकडे येऊन त्याला म्ह० ) मूर्खा वसंत.

**चेट**—आतां दुसरा प्रश्न तुला घालतों. धनसंपन्न राष्ट्राचें रक्षण कोण करतो ?

**विदू०**—अरे रथ्या[1].

**चेट**—( हांसून. ) छी हें नव्हे.

**विदू०**—आतां मी संशयांत पडलों. ( विचार करून ) असो, पुन्हा **चारुदत्तास** पुसून घ्यावें. थांब अंमळ. ( **चारुदत्ता** कडे जाऊन ) मित्रा धनसंपन्न राष्ट्राचें संरक्षण कोण करतो ? सांग बरें.

**चारु०**—मित्रा. सेना.

---

१ मार्गाचें नांव.

विदू०—( चेटाकडे जाऊन. ) अरे रांडलेका, सेना.
चेट—आतां ते दोन्ही शब्द जोडून लौकर बोल.
विदू०—सेना वसंत.
चेट—अँ: फिरवून बोल.
विदू०—( शरीर फिरवून बोलतो. ) सेना वसंत.
चेट—अरे मूर्खा, पदें फिरवून बोल.
विदू०—( पावलें फिरून म्हणतो. ) सेना वसंत.
चेट—अरे, अक्षरांचीं पदें फिरीव.
विदू०—( विचार करून. ) हां समजलों. वसंतसेना.
चेट—हीच ती आली आहे.
विदू०—तर मग **चारुदत्ताला** सांगितलें पाहिजे. ( **चारुदत्ता** कडे जाऊन ) मित्रा **चारुदत्ता**, तुझा धनिक[१] आला आहे.
चारु०—आमच्या कुळांत धनिक कोठचा ?
विदू०—कुळांत नाहीं पण द्वारांत आहे.
चारु०—मित्रा, नीट सांग कायतें.
विदू०—अरे **वसंतसेना** आली आहे.
चारु०—मित्रा, मला चाळवितोस काय !
विदू०—मित्रा, जर मज ब्राह्मणाच्या वचनावर विश्वास नसला तर ह्या **कुंभीलकास** विचार. अरे रांडलेका **कुंभीलका**, जवळ ये.
चेट—( जवळजाऊन ) शेट साहेब, मी मुजरा करतों.
चारु०—गड्या, तूं आलास बरें झालें. पण खरें सांग **वसंतसेना** आली आहे काय ?
चेट—होय खरेंच **वसंतसेना** आली आहे. मला तिनेंच पाठविलें आपणास कळविण्यासाठीं. ती आली पहा.
चारु०—( हर्षपावून. ) गड्या, त्वां आनंदाची गोष्ट सांगितली. मी प्रियवचन कधीं निष्फळ करीत नाहीं. तर हें तुला बक्षी-

---

१ सावकार.

स घे. (असें ह्मणून आंगावरचा शेला काढून त्यास देतो.)

**चेट**—(शेला घेऊन वंदन करून हर्षानें म्हणतो.) हा शेला मी आपल्या यजमाननीस दाखवितों.

(असें म्हणून निघून जातो.)

**विदू॰**—मित्रा, ही इतक्या अंधेरांत, पावसांत कां आली समजलास ?

**चारु॰**—माझ्या ध्यानांत पुरतेसें आलें नाहीं.

**विदू॰**—मला समजलें कां आली आहे तें. तुझी रत्नमाला अल्प मोलाची आणि तिचे अलंकार बहु मोलाचे, म्हणून असंतुष्टहोत्साती दुसरें कांहीं मागावयास आली आहे.

**चारु॰**—आली तर फार चांगलें झालें. संतुष्ट होऊन जाईल.

(तदनंतर अभिसारिकेचा उत्तम वेष घेऊन उत्कंठित होत्साती **वसंतसेना** येते. आणि तिच्या बरोबर तिजवर छत्री धरणारी एक दासी व एक **विट** येतात.)

**विट**—(**वसंतसेने**ला उद्देशून म्ह॰) ही या समयीं.

**श्लोक.**

नाहीं पद्मकरीं तरीं दिसतसे प्रत्यक्षलक्ष्मी परी ॥
कामाची समशेर[1] कामतरुची[2] प्रत्यक्ष जी मंजरी ॥
पाहोनी झुरती कुलीन वनिता भाग्यास जीच्या मनीं ॥
ती जाते गजगामिनी रतिसुखा लज्जावती कामिनी ॥ १३ ॥

**वसंतसेने** पहा.

**श्लोक.**

होऊनि शैलशिखरावरि लंबमान[3] ॥
हे गर्जतात घन दुंदुभिच्या समान ॥
ऐकोनिशब्द उडती शिखि[4]पक्षें[5]वातें ॥
कीं वीजिंती[6] मणिमय[7]व्यजनीं नभातें[8] ॥ १४ ॥

---

१ तरवार. २ मोहितकरणारी. ३ लोंबलेले. ४ मोर. ५ पंखांच्यावाऱ्यानें. ६ वारा घालिती. ७ रत्नखचित पंख्यांनीं. ८ आकाशाला.

आणखी श्लोक.

धारा जर्जर दर्दुरें[1] प्रसरती पंकीं उड्या घालिती ॥
झाले मोर विमुक्तकंठ[3] फुलली झाडें पहा डोलती ॥
साधूला खळ मंडळी तशिचही चंद्रास मेघावळी ॥
झांकी ती कुलटेसमान[4] चपॅला राहे न एके स्थळीं ॥ १५ ॥

**वसंत०**—अरे तूं फार चांगलें बोललास. पहा ही रात्र.

साक्या.

मूढे पीनपयोधर कांता मी, मजशीं हा कांत ॥
रमतो येथें तूं कांआलिस भंगाया एकांत ॥ १६ ॥
ऐसें वारंवार गर्जितें काय वारिते मातें ॥
निशासपत्नी कुपित होउनी रोंधितसे मार्गातें ॥ १७ ॥

**विट**—तरमग हिची निंदा केली पाहिजे.

**वसंत**—अरे स्त्रीजातीचा स्वभावच असा. निंदा करून काय फळ. तुला एक सांगत्यें.

आर्या.

गर्जोत मेघ किंवा वर्षोत विजा लवोत भिववाया ॥
मोजितिन अशा विघ्ना स्त्रिया निघाल्या प्रियाकडे जाया॥१८॥

**विट—वसंतसेने** पहा हा दुसरा चमत्कार.

आर्या.

पवनचि जवन तुरग ज्या जलमयधाराचि शस्त्रधारा ज्या ॥
ज्या स्तनित दुंदुभिध्वनि शोभे विद्युत् पताक ज्या राज्या॥१९॥
तो मेघराज नेतो हरुनि नभीं करसमूह चंद्राचा ॥
राजा जसा स्वनगरा नेतो करभार अबल शत्रूचा ॥ २० ॥

**वसंत०**—अरे हा निर्दयपणा पहा कसा तो.

साक्या.

तडिद्दलाका यांच्या योगें कर्बुर[6] झालिल्यानीं ॥

---

१ बेडूक. २ धांवती. ३ शब्दयुक्त. ४ जारिणी सारखी. ५ विद्युल्लता. ६ चित्रवर्ण.

गर्जुनि विरहिजनाच्या चित्तीं क्षत केलें मेघांनीं ॥ २१ ॥
त्यावरि दुर्मति हतांश बक हा पहा करितसे मार ॥
प्रावृट् प्रावृट् ऐसें बोलुनि घाली क्षतांत खार ॥ २२ ॥

**विट—वसंतसेने**, असेंच आहे. हें दुसरें पहा.

### श्लोक अनुष्टुप.

बलाका पांडुरोष्णीष विद्युत्स्फुरण चामर ॥
मत्तवारण सारूप्य मेघांचें दावि अंबर ॥ २३ ॥

**वसंत०—विटा**, पहा पहा, ही मौज.

### श्लोक.

मेघीं आर्द्र तमालपत्रमलिनीं आकाश आच्छादिलें ॥
बाणीं हस्तिस तेंवि वारुळशता धाराशतें भेदिलें ॥
शोभे वीज घनावरीहि दिवटी प्रासादमाथां जशी ॥
चंद्राची हरिली प्रभा जलधरें स्त्री दुर्बलाची तशी ॥ २४ ॥

**विट—वसंतसेने**, पहा हा काय चमत्कार दिसतो तो ?

### साक्या.

ज्यांच्या पाठीवर बांधियले विद्युल्लेखा दोर ॥
धांवुनि धाराधर हे खाली धारा सोडिति थोर ॥ २५ ॥
जाणो हे गज शक्राज्ञेनें रजताच्या दोरांनीं ॥
ओढुनि नेती ह्या पृथ्वीला वर अपल्या जोरांनीं ॥ २६ ॥
आणखी पहा.

### श्लोक.

विजेच्या चापल्यें क्षुभित घन नीलाभ वळले ॥
महावातें अभ्यंतरिं उदधि जैसे खवळले ॥
तिहीं गंधोद्दामा हरिततृणसस्यांकुरवती ॥
असे केली धाराशतशरविदीर्णा वसुमती ॥ २७ ॥

---

१. दुष्ट. २ शुभ्र शिरोवेष्टन. ३ तमालवृक्षाच्या ओल्यापाना सारखें काळें. ४ शतशःवारुळांस. ५ नीलवर्ण. ६ सागर. ७ गंधविशिष्ट. ८ पृथ्वी.

**वसंत०**—विटा हा दुसरा चमत्कार पहा.

### श्लोक.

मोरांनीं बहु आदरें करुनि जो येये असा बाहिला[1] ॥
वेगें जाउनि जो बलाकततिनें[2] सोत्कंठ आलिंगिला ॥
हंसांनीं निजपंकजे त्यजुनियां त्रासोनि जो पाहिला ॥
तो हा मेघ दिशांस झांकित नभीं नीलांबरें[3] राहिला ॥ २८ ॥

**विट**—होय असेंच आहे. तेंच पहा.

### ओंव्या.

झांकिलीं पद्मरूप नयनें ॥ नष्टलीं दिवसरात्रींचीं भानें ॥
जया अंधकार ज्ञान विजेनें ॥ दिशारूप मुखें झांकिलीं ॥२९॥
ऐसें हें जगत सुंदरी ॥ मेघांचें आच्छादन ज्यावरी ॥
ऐशा जलधारा गृहांतरीं ॥ जाणो निश्चेष्ट पहुडलें ॥ ३० ॥

**वसंत०**—असेंच आहे. पहा.

### ओंव्या.

तारा गेल्या नाशाप्रती ॥ जैशी दुर्जनावरी उपकृती ॥
कांतवियुक्त युवती ॥ तैशा भासती दश दिशा ॥ ३१ ॥
पेटतां विद्युल्लता ज्वलन ॥ अंतरीं गेले संतापोन ॥
वाटे विरघळलें गगन ॥ जळरूपें पडतसे ॥ ३२ ॥
आणखी पहा.

### आर्या.

उतरे चढेहि वर्षे गर्जे पाडी घनांधकारातें ॥
प्राप्तनवश्रीपुरुषापरि[4] मेघ धरी अनेक रूपातें ॥ ३३ ॥

**विट**—हो असें आहे खरें. मला तर वाटतें हें आकाश.

### श्लोक.

विद्युल्लतांनीं जळतेंच काय ॥
धाराजळांनीं गळतेंच काय ॥

---

१ बोलाविला. २ माळेनें. ३ निळवस्त्रानें. ४ ज्याला नवीसंपत्ति प्राप्तझाली त्या पुरुषाप्रमाणें.

बलाहकांनीं हसतेंच काय ॥
वायुभ्रमें निःश्वसतेंच काय ॥ ३४ ॥

**वसंत**०—( मेघाकडे पाहून म्हणते. )

### आर्या.

रे निर्लज्जा मेघा असतां मी जात दयितवेश्मातें ॥
गर्जुनि भिवविशि धाराहस्तांनीं स्पर्श करिशि कां मातें ॥ ३५ ॥

हे **शक्रा** ( जलधरा ) तुला हें योग्य नाहीं.

### दिंडी.

काय माझा संकेत तुशीं याया ॥
म्हणुनि गर्जसि तूं मला भीववाया ॥
निघालें मी हे प्रियाकडे जाया ॥
योग्य नाहिंस तूं मार्ग निरोधाया ॥ ३६ ॥

### आर्या.

जेवि **अहिल्येसाठीं गौतम** मि असें असत्य वदलास ॥
तद्वत् मम दुःखातें पाहुन **शक्रा** निवार जलदास ॥ ३७ ॥

### आर्या.

कर गर्जना जलधरा वृष्टि विजा पाड चित्त भिववाया ॥
रोधायास नशक्या स्त्रिया निघाल्या प्रियाकडे जाया ॥ ३८ ॥

( आश्चर्यानें विद्युल्लतेस म्हणते. )

### आर्या.

जरि वर्षे घन वर्षो स्पष्ट असे कठिण चित्त पुरुषांचें ॥
परि बाई चपले तूं जाणसि कैसें न दुःख वनितांचें ॥ ३९ ॥

**विट**—अगे पुरे आतां. तूं हिची निंदा करूं नको. तुजवर हिचा उपकार आहे. पहा.

### ओंव्या.

ही **ऐरावता**ची सुवर्ण रज्जुका ॥ कीं पर्वतशिखरींची शुभ्र पताका ॥
कीं **इंद्रभुवनीं**ची उज्वल दीपिका ॥ दिव्य तेजें झळकत ॥ ४० ॥

ऐशी विद्युल्लता चमकून ॥ वारंवार स्वप्रकाशें करुन ॥
गाढांधकारीं तुज लागून ॥ प्रिय सदनाची वाट दाविते ॥ ४१ ॥

**वसंत**०—विटा हेंच तें घर नव्हे काय?

**विट**—होय हेंच तें घर. अगे तूं सकलकलाभिज्ञ आहेस, चतुर आहेस, तुला मीं उपदेश करावा असें नाहीं. तथापि स्नेहास्तव सांगितल्यावांचून राहवत नाहीं म्हणून सांगतों. आंता आंत गेल्या वर, अत्यंत कोप करूं नको हो. कांकीं,

## आर्या.

कोपें नघडेल रती अथवा कोपाविणें नसे काम ॥
कोपुनि कोपीव प्रिय समजुनि समजीव चित्तविश्राम ॥ ४२ ॥

**वसंत**०—असो, मी आल्यें ह्मणून त्या आर्य **चारुदत्ताला** कळीव जा.

**विट**०—बरें आहे. कळवितों. ( **चारुदत्ता** जवळ जाऊन )

## श्लोक.

काळीं फुल्लकदंब नीपसुरभीं[१] पाहोनि मेघावली ॥
आली कांतगृहा सहर्ष मदना मेघोदकें भीजली ॥
भ्याली गर्जित विद्युतांसि बघुनि त्वद्दर्शना पातली ॥
आहे कर्दमलिप्त पाय धुत ती द्वारींउभी राहिली ॥ ४३ ॥

**चारु**०—( ऐकून ) मित्रा, हें काय म्हणतो तें पुरतें समजून घे.

**विदू**०—बरें, तुझ्या आज्ञे प्रमाणें करितों. ( **वसंतसेने** कडे जाऊन तिला म्हणतो. ) आलीसका. बरें झालें. तुझें कल्याण असो.

**वसंत**०—**आर्या** मी तुला वंदन करित्यें. तुझेंहि स्वागत असो. ( विटाला ह्म० ) **विटा** ही छत्रधारिका परत जातांना तुझ्या कामीं पडेल.

**विट**—( मनांत ह्म० ) ह्या युक्तीनें ही मला परत जावयास सु-

---

१ कदंब आणि नीप ह्या वृक्षांचीं फुलें कामोद्दीपक आहेत.

चविते. ( उघडपणें ) बरें तर जातों मी. पण **वसंतसेने** सांगतों येवढें ध्यानांत ठेव.

**ओंव्या.**

कपटानृतशाठ्याचें आगर ॥ रतिकेलिविलासाचें मंदिर ॥
सुरतोत्सवसंग्रहाचें घर ॥ वेश्याशरीर प्रसिद्ध हें ॥ ४४ ॥
ह्या वेश्याशरीर बाजारीं ॥ फार ठेवावी सावधगिरी ॥
घ्यावी सुखाची सामग्री ॥ चातुर्य मूल्य देउनी ॥ ४५ ॥

( असें म्हणून निघून जातो. )

**वसं॰**—आर्या **मैत्रेया**, तुमचा द्यूतकार कोठें आहे तो दाखीव.

**विदू॰**—( मनांत ह्म॰ ) वाहवा ! द्यूतकार कोठें आहे, म्हणते ह्या शब्दानें माझ्या मित्रास मोठाच मान हिनें दिला. असो ( उघडपणे. ) अगे तो शुष्कवृक्षवाटिकेंत बसला आहे.

**वसंत॰**—आर्या, तुमची शुष्कवृक्षवाटिका ती कोणती ?

**विदू॰**—अगे जेथें कोणी खात नाहीं कीं पीत नाहीं ती शुष्क वाटिकाच.

**वसंत॰**—( ऐकून हांसते. ) असें आहे काय ?

**विदू॰**—अगे आंत जा.

**वसंत॰**—( आपणांशीं ) आंत जाऊन म्यां त्याशीं काय बोलावें ?

**चेटी**—इतकेंच बोलावें. कीं, हे द्यूतकार, हा प्रदोष समय तुला शुभ आहे कीं ?

**वसंत॰**—असें माझ्यानें बोलवेल काय ?

**चेटी**—हा समय तुझ्या कडून बोलवील.

**विदू॰**—अगे आंत जा.

**वसंत॰**—( आंत जात्ये, आणि **चारुदत्ताच्या** जवळ जाऊन त्याला फुलें मारत्ये. ) अहो द्यूतकार, हा प्रदोषसमय तुह्माला सुखाचा आहे कीं ?

**चारु॰**—( तिज कडे पाहून ) काय **वसंतसेना** आली ? ( हर्षानें उठून ) हेप्रिये तुला काय सांगूं !

### श्लोक.

सदा जागतां जाय माझा प्रदोष ॥
तशी कंठितों रात्र दुःखें अशेष ॥
मला लाभ झाला तुझ्या दर्शनाचा ॥
ह्मणूनीच तो आज झाला सुखाचा ॥ ४६ ॥

तुझें स्वागत असो. हें आसन आहे. ह्याज वर बसावें.

**विदू०**—हो हो, तुझ्या साठीं गालीच्या घातला आहे ह्या वर बैस हो.

( सर्व आसनावर खालीं बसतात. )

**चारु०**—मित्रा पहा पहा.

### आर्या.

वृष्टिजलें थबथबल्या श्रवणविलंबित कदंबकुसुमानें ॥
अभिषेकिला स्तन, जसा राज्यपदीं राजपुत्र सन्मानें ॥ ४७ ॥

तर मित्रा, **वसंतसेने**चीं दोन्हीं वस्त्रें अगदीं भिजलीं आहेत. या साठीं हिला दुसरीं उत्तम कोरडीं वस्त्रें आणून दे.

**विदू०**—बरें आहे तुझ्या आज्ञेप्रमाणें करितों. ( उठतों )

**चेटी**—आर्या **मैत्रेया**, तुम्ही बसा. हें काम मीच करित्यें. (असें म्हणून घरांतून दुसरीं वस्त्रें आणून देते. )

**विदू०**—एकीकडे मुख करून हे मित्रा, हिला कांहीं विचारावें असें माझ्या मनांत आलें आहे. मी विचारूं ?

**चारु०**—बरें विचार. तुझ्या मनांत काय आलें असेल तें.

**विदू०**—( **वसंतसेनेस** ) अगे तुं अशा काळोखांत आणि अशा पावसांत कशाकरतां येथें आलीस बरें ?

**चेटी**—बाईसाहेब, हा ब्राम्हण अगदीं भोळा दिसतो. मी याला उत्तर देत्यें.

**वसंत०**—अगे हा पक्का शहाणा आहे असें म्हण.

**चेटी**—अहो भटजी बावा, ह्मा असें विचारावयास इच्छित आहेत कीं त्या रत्नमालेचें मोल किती आहे.

**विदू**०—( एकीकडे वळून ) मी **चारुदत्ताला** मघांच सांगितलें कीं तिचे अलंकार बहुमूल्य आणि आपली रत्नावली अल्प मूल्य, म्हणून ती संतुष्ट झाली नाहीं. या साठीं दुसरें कांहीं मागावयास आली आहे.

**चेटी**—असो सांगत्यें ऐक. ती रत्नावली आपली असें समजून वसंतसेनेनें द्यूतांत हारविली. ती ज्यानें जिंकली तो द्यूतकार राजाचा अपराधी तो कोणीकडे गेला समजत नाहीं.

**विदू**०—ही तर आमचीच कल्पना. ही उष्टी झाली.

**चेटी**—जोंपर्यंत त्याचा शोध लागेल तोंपर्यंत हे सुवर्णालंकार तुम्हां जवळ असूंद्या. ( असें म्हणून ते अलंकार दाखवित्ये. )

**विदू**०—( अलंकार पाहून विचार करतो. )

**चेटी**—( हांसून म्ह० ) फारशी दृष्टि लावून पाहतां ? हे तुमच्या ओळखीचे आहेत काय ?

**बिदू**०—कारागिराची कुशलता पाहून माझी दृष्टि ह्यांकडे लागली आहे.

**चेटी**—तर तुमच्या दृष्टिनें तुम्हांला चकविलें. अहो तेच हे अलंकार. जे तुम्हां पाशीं ठेविले होते.

**विदू**०—( हर्ष पावून ) मित्रा, तेच हे सुवर्णालंकार. जे आपल्या घरांतून चोरानें नेले.

**चारु**०—हे मित्रा, खरेंच कायरे ? तर मग अशी गोष्ट झाली.

## आर्या.

न्यासप्रतिक्रियेची[१] आम्हीं जी गुप्त कल्पना केली ॥
फिरली तीच अम्हांवरि तेणें अमची विटंबना[२] झाली ॥ ४८ ॥

**विदू**०—मित्रा, तेच हे खरे याविषयीं मी शपथ करितों पाहिजे तर.

**चारु**०—तर मग ही मोठीच आनंदाची गोष्ट.

**विदू**०—( एकीकडे वळून ) बरें मी तिला पुसूंका कीं, हे अलं-

---

१ ठेव परत करण्याची. २ फजिती.

कार तुम्हांला कोणीकडून मिळाले म्हणोन ?

**चारु॰**—चिंता काय आहे. विचार.

**विदू॰**—( चेटीच्या काना जवळ तोंड नेऊन. ) ओं. हँहँ.

**चेटी**—( विदूषकाच्या कानीं लागून ) असें असें.

**चारु॰**—असें कानांत कां कुजबुजतां. मी कोणी परकी आहे काय ? मला कळूंद्या काय तें.

**विदू॰**—( चारुदत्ताच्या कांनीं लागून म्ह॰ ) असें असें ही सांगत्ये. विचारा पाहिजे तर.

**चारु॰**—भद्रे, खरेंच सांगत्येस काय. तेच हे सुवर्णालंकार ?

**विदू॰**—मित्रा याविषयीं संशय नको. तेच हे. तेच हे.

**चारु॰**—( चेटीला ) भद्रे, मी कोणाचें प्रियकर वचन कधीं निष्फळ करीत नाहीं. या साठीं ही आंगठी तुला बक्षीस घे. ( असें म्हणून आंगठी काढावयास बोटाकडे हात नेतो, आणि बोटांत आंगठी नाहीं असें पाहून लज्जित होतो. )

**वसंत॰**—( मनांत म्ह॰ ) या साठींच तुझ्या संगतीची इच्छा करावी ती.

**चारु॰**—( एकीकडे वळून खेदानें. ) कायहो दुःख हें !

### श्लोक.

जनामध्यें जो धनहीन[1] झाला ॥
असोनि ही जीवितें[2] काय त्याला ॥
कोपास ज्याच्या फळ[3] येत नाहीं ॥
तैसें प्रसादासहि ये न[4] कांहीं ॥ ४९ ॥

आणखी

### आर्या.

सत्पक्षें[5]रहित पक्षी शुष्क तरू कीं तडागें[6] जलहीन ॥
दंष्ट्रा[7]हीन भुजंगम[8] तैसा धनहीन होय नर दीन[9] ॥ ५० ॥

---

१ द्रव्यरहित. २ प्राण. ३ कोप आला तरी व्यर्थ होतो. ४ तसेंच कोणावर प्रसन्न चित्त झालें तरी त्याचें कांहींच फल होत नाहीं. ५ चांगले पंख ज्याला नाहींत. ६ तळें. ७ ज्याला दाढा नाहींत असा. ८ सर्प. ९ कवडीचा माल.

आणखी **श्लोक.**

शून्या गृहा समचि ते नर जे दरिद्र ॥
तोयाविणें दिसति कूप तसे अभद्र ॥
कीं इष्ट मित्र जन सोडुनि ज्यांस जाती ॥
संतोषकाल अवघे फलहीन होती ॥ ५१ ॥

विदू०—मित्रा, इतका संताप करूं नको. तुजकडे कांहीं अपराध नाहीं. ( विनोदपूर्वक म्हणतो. ) अगे माझा तो पडदणीचा पंच्या कोठें आहे ? ज्यांत दागिने होते ?

**वसंत०**—आर्या **चारुदत्ता,** रत्नमालेनें ह्या जनाची तुलना करणें हें तुला योग्य नाहीं. खरें सांग त्वां असें कां केलें ?

**चारु०**—( विस्मययुक्त होऊन म्ह० ) अगे **वसंतसेने,** असें नकरावें तर कसें करावें. पहावें.

**आर्या.**

वाटेल सत्य कोणा झालें तें जन कुतर्क करितील ॥
दारिद्र्यकारणानें संशय माझाच सर्व धरितील ॥ ५२ ॥

**विदू०**—**वसंतसेने,** तूं आज येथेंच निजणार काय ?

**चेटी**—आर्या **मैत्रेया,** आपणाला इतकी रिकामी उठाठेव कशास पाहिजे.

**विदू०**—हेमित्रा, सुखानें बसलेल्या जनास उठवावया साठींच काय पुनः विस्तृत जलधारा सोडित पर्जन्य आला पहा.

**चारु०**—खरी गोष्ट बोललास मित्रा, पहा काय चमत्कार ?

**श्लोक.**

मेघोदरा भेदुनियां निघाल्या ॥
पंकांतुनी जेंवि मृणालि[1] आल्या ॥
धाराच चंद्रव्यसनें हजारा ॥
सोडीतसे हे दिवें[2] अश्रुधारा ॥ ५३ ॥

---

१ कमल तंतू. २ आकाश.

आणखी पहा. **आर्या.**

सज्जन चित्त सुनिर्मळ **विजय**[१]शरसमान कर्कशाकारा ॥
चंडानिलसंचोदित जलधर हे वर्षतात जलधारा ॥ ५४ ॥
सोडितिजलदजलाचे बिंदू **बल**[२]**रामवस्त्रसमकाय** ॥
**इंद्राच्या** कोशांतिल घेउनि मुक्तां[३]च टाकिती काय ॥ ५५ ॥

प्रिये **वसंतसेने** हा चमत्कार पहा,

**श्लोक अनुष्टुप्.**

तमाल[४]पिष्ट नीलांनीं मेघांनीं नभें लिंपिलें ॥
संसक्त[६]शीतसुरभि वातांनीं उपजीं[७]विलें ॥ ५६ ॥

**श्लोक.**

अंभोधराशींच गमे रमाया ॥ आली पहा आपण होउनीया ॥
कांता जशी येउनियां प्रियातें ॥ आलिंगिते वीज तशी तयातें ॥५७॥

**वसंत०**—( अभिप्राय समजून शृंगारभावानें **चारुदत्तास** आलिंगिते )

**चारु०**—( स्पर्शसुखाचा आनंद दाखवून ) आपण तिला आलिंगून म्हणतो.

**साकी.**

बारे मेघा बहु गर्जावें स्मरपीडित जें गात्र ॥
तें झालें कीं तुझ्या प्रसादें स्पर्शसुखाला पात्र ॥ ५८ ॥

**विदू०**—रे दुष्टा दुर्दिना, या समयीं तूं अयोग्यकर्म करतोस. कांकीं, मेघाच्या गर्जितानें आणि विद्युल्लतेच्या स्फुरणानें हिला भिववितोस.

**चारु०**—मित्रा दुर्दिनाची निंदा करूं नको. ह्याचा आज मजवर उपकार आहे.

---

१ अर्जुन बाणासारख्या. २ बलरामाच्या वस्त्रा सारखे काळे जलदमेघ. ३ मोत्यें. ४ तमालपत्राच्या चूर्णासारखें काळे मेघ. ५ आकाश. ६ स्पर्श शीतळ सुवासिक. ७ ज्याला वारा घातला असें नभ.

आर्या.

दुर्दिन बहुदिन राहो जलधर वर्षो विजा स्फुरोत सुखें ॥
कीं दुर्लभप्रियेनें आलिंगुनि चुंबिलें मला स्वमुखें ॥ ५९ ॥

आणखी मित्रा, दिंड्या.

धन्य त्यांचीं जीवितें मानवांचीं ॥
घरीं आल्या चालोनि कामिनीचीं ॥ ६० ॥
मेघतोयें जाहलीं आर्द्र गात्रें ॥
तयां जे आलिंगिती निजें गात्रें ॥ ६१ ॥

प्रिये वसंतसेने. श्लोक.

स्तंभ केवळ पुरातन झाले ॥
जीर्ण मंडप वितानहि हाले ॥ ६२ ॥
मासलीं भिजुन भिंतहि चित्रें ॥
रंगहीन दिसतात विचित्रें ॥ ६३ ॥

( आकाशाकडे पाहून. ) अरे इंद्रधनुष्य. प्रिये पहा.

ओवी.

विद्युज्जिव्हा लांबवूनी ॥ जलधर हनुवटी खालवूनी ॥
इंद्रचाप भुज उभारोनी ॥ जांभई देतें अंतरीक्ष ॥ ६४ ॥

यासाठीं चल आंत जाऊं. असें म्हणून उठून चालूं लागतात. प्रिये पहा पहा.

श्लोक.

ताडावरी कर्कश शब्द होतो ॥
जळीं स्थळीं केवळ मंद हो तो ॥ ६५ ॥
जशा विण्याचा झडतात तारा ॥
तालानुसारें पडतात धारा ॥ ६६ ॥

---

दुर्दिनात्मक
पांचवा अंक
समाप्त.

# मृच्छकटिक नाटक.

अंक ६.

स्थळ.

चारुदत्ताचें घर वगैरे.

पात्रें.

चेटी.................... वसंतसेनेची दासी.
वसंतसेना................ कलावंतिणीची मुलगी.
रदनिका.................. चारुदत्ताची दासी.
बालक.................... चारुदत्ताचा मुलगा.
वर्धमानक................ चारुदत्ताचा सेवक.
स्थावरक................. राजश्यालाचा सेवक.
आर्यक................... गवळ्याचा मुलगा.
वीरक.................... शिपायांचा नाईक.
चंदनक................... शिपायांचा नाईक.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक ६.

### प्रारंभ.

( तदनंतर **वसंतसेनेची चेटी** येत्ये. )

**चेटी**—काय अजून आर्या **वसंतसेना** जागी होत नाहीं ? असो आंत जाऊन तिला जागी करत्यें. ( असें म्हणून इकडे तिकडे फिरत्ये. )

( इतक्यांत पांघरूण घेऊन आंथरुणावर **वसंतसेना** निजत्ये. )

**चेटी**-(तिजकडे पाहून) बाईसाहेब, उठाउठा आतां. बाहेर उजाडलें.

**वसंतसेना**—( जागी होऊन ) काय रात्र असतांच उजाडलें म्हणत्येस ?

**चेटी**— आम्हांस उजाडलें. तुम्हासारख्यांस मात्र रात्र आहे.

**वसंत॰**—अगे पण तो तुमचा द्यूतकार कोठें आहे ?

**चेटी**—अहो, तो श्रेष्ठ **चारुदत्त वर्धमानकास** सांगून मघा **पुष्पकरंडकनामक** जीर्णोद्यानांत गेला.

**वसंत॰**—काय, श्रेष्ठ **चारुदत्त पुष्पकरंडक** जीर्णोद्यानांत गेला ? बरें त्यानें **वर्धमानकाला** काय आज्ञा केली ?

**चेटी**—**वसंतसेने**करतां रात्रीची गाडी तयार कर अशी आज्ञा केली.

**वसंत॰**—त्या गाडींत बसून मला कोणीकडे जायाचें ?

**चेटी**—आर्यें, जिकडे **चारुदत्त** गेला आहे तिकडेसच तुला जावयाचें.

**वसंत॰**—( चेटीला आलिंगून आनंदानें म्हणत्ये. ) अगे, मीं त्याला रात्रीस पुरतेपणेंपाहिलें नाहीं. यासाठीं आतां जाऊन मी त्याला डोळे भरून पाहीन. कायगे, या वाड्याच्या आंतल्या चौकांत मी प्रविष्ट झालें काय ?

**चेटी**—केवळ आंतल्या चौकांत प्रविष्ट इतकेंच नाहीं; सर्व जना-च्या ह्रदयांत प्रविष्ट झाली आहेस.

**वसंत०**—तर मग **चारुदत्ताच्या** परिजनास माझ्या मुळें दुःख होतें काय ?

**चेटी**—दुःख होईल.

**वसंत०**—केव्हां ?

**चेटी**—जेव्हां तूं जाशील.

**वसंत०**—असें काय ? तर मग मलाच अगोदर दुःख होईल येथून जातांना. ( प्रेमानें म्ह० ) अगे **चेटी**, ही रत्नमाला घे आणि माझी बहीण **धूताबाई** घरांत आहे तिला नेऊन दे. तिला सांग कीं, मी **वसंतसेना** ह्या श्रेष्ठ **चारुदत्ताच्या** गुणावर आसक्त होऊन त्याची दासी झालें. तेव्हां तुमची ही दासीच आहें. या साठीं ही रत्नमाला तुम्ही आपल्या गळ्यांत घालावी. ही ज्या ठिकाणची त्याच ठिकाणीं असावी हें योग्य आहे.

**चेटी**—आर्ये, असें केल्यानें तो **चारुदत्त** तुज वर कोप करील.

**वसंत०**— तूं जा. तो कांहीं कोप करणार नाहीं.

**चेटी**—जशी तुझी आज्ञा होईल तसें. ( असें म्हणून रत्नमाला घेऊन जात्ये. आणि पुन्हा परत येऊन ह्म० ) आर्ये, **धूताबाई** असें ह्मणतात कीं श्रेष्ठ **चारुदत्तानें** तुला कृपा करून जी दिली, ती मीं घेऊन आपल्या गळ्यांत घालावी हें योग्य नाहीं. तो श्रेष्ठ **चारुदत्तच** माझें श्रेष्ठभूषण आहे असें त्वां समजावें.

( तदनंतर मुलास घेऊन **रदनिका** येत्ये. )

**रदनिका**—बाळा ये, आपण गाडी घेऊन खेळूं.

**बालक**—( तोंड वेंगाडून ह्म० ) अगे **रदनिके**, ही मातीची गाडी मला कशाला पाहिजे. ही नको. मला तशी सोन्याची गाडी आणून दे.

**रदनि०**—( दुःखाचा सुसकारा टाकून ) बाळा सोन्याचें नांव कशाला घेतोस. सांप्रत आपल्या घरीं सोन्याचा विटाळ आहे. तुझ्या बापाला पुन्हा संपत्ति आली म्हणजे तूं सोन्याची गाडी घेऊन खेळशील. (मनांत म्ह०) आतां याला कोणीकडे नेऊन याचें चित्त रमवूं ? असो याला **वसंतसेने** कडे घेऊन जावें. ( तिच्या जवळ जाऊन. ) आर्ये, मी तुला वंदन करित्यें.

**वसंत०**—**रदनिके**, आलीस ये बैस, अगे, हा कोणाचागे मुलगा ? याच्या आंगावर अलंकारभूषणें नसतांही गोजीरवाणा दिसतो. याचें मुख चंद्राप्रमाणें माझ्या त्हृदयास फार आनंद देतें.

**रदनि०**— आर्ये, हा **चारुदत्ता**चा मुलगा. ह्याचें नांव **रोहसेन**.

**वसंत**— ( हात पुढें करून ) येरे बाळा मज कडे. मला आलिंगन दे. ( असें म्हणून मुलाला घेऊन आपल्या मांडीवर बसवित्ये. ) याचा तोंडवळा अगदीं बापा सारखा दिसतो.

**रदनि०**— केवळ तोंडवळाच सारखा आहे असें नाहीं; याचा स्वभावहि त्या सारखाच आहे. सांप्रतकाळीं **चारुदत्ता**च्या त्हृदयाला आनंदविणारा हाच आहे. याच सुखा वर तो दिवस काढतो.

**वसंत०**— खरें म्हणत्येस. अगे, पण हा रडतो कशासाठीं ? काय मागतो ? बाळा, तुला काय पाहिजे ?

**रदनि०**— शेजारचे गृहस्थाच्या मुलानें एक सोन्याची गाडी खेळावयास आणली होती ती यानें पाहिली. त्याबरोबर हा कांहीं वेळ खेळला. मग तो मुलगा आपली गाडी घेऊन गेल्या वर हा मला गाडी दे म्हणून मागूं लागला. तेंव्हां मी एक मातीची गाडी करून याला खेळावयास दिली. पण हट्टी मुलगा म्हणतो, मला मातीची गाडी नको. तसी सोन्याची गाडी दे म्हणून रडत आहे. आतां मी याला सोन्याची गाडी कोठून देऊं ?

**वसंत०**— हायहाय धिक्कार असो निर्धनतेला ! ह्या मुलाला ही दुसऱ्याची संपत्ति पाहून तशी आपणास नाहीं म्हणून वाईट

वाटतें. हे भगवंता कृतांता कालपुरुषा, कमलपत्रावरील बिंदूप्रमाणें पुरुषाच्या चंचल भागधेयां बरोबर क्रीडा करतोसना ? ( डोळ्यांत अश्रू आणून म्ह० ) माझ्या लाडक्या, रडूं नको. तूं ही सोन्याची गाडी घेऊन खेळशील बरें.

**बालक**— **रदनिके**, ही कोणगे ?

**वसंत**०— ही तुझ्या पित्याची गुणांनीं विकत घेतलेली दासी आहे. समजलास ?

**रदनि**० वत्सा, ही तुझी आई होत्ये.

**बालक**— **रदनिके**, तूं खोटें बोलत्येस. जर ही माझी आई तर हिच्या आंगा वर इतके दागिने, गे, कसे ?

**वसंत**०— **बाळा**, ह्या गोजिरवाण्या मुखानें तूं कितीरे त्हदयभेदक करुण भाषण करतोस ? ( असें म्हणून आंगा वरचे दागिने काढून रडूं लागत्ये आणि म्हणत्ये. ) ही पहा. आतां मी तुझी आई झालेंना ? तर हे सोन्याचे दागिने घे आणि ह्यांची गाडी कर.

**बालक**— जा जा मी नाहीं घेणार, तूं रडत्येस.

**वसंत**०— ( डोळे पुसून ) बाळा, मी रडत नाहीं. जा खेळ खुशाल. ( मातीच्या गाडी वर ते अलंकार भरून म्ह० ) लेंकरा, घे जा सोन्याची गाडी कर बरें. ( मुलाला अलंकारांसुद्धां घेऊन **रदनिका** निघून जात्ये. )

( तदनंतर गाडी घेऊन **वर्धमानक** चेट येतो. )

**वर्धमान**०—**रदनिके**, **रदनिके**, आर्या **वसंतसेना** हिला सांग कीं मागील दरवाज्याशीं बुरक्याची गाडी तयार आहे.

**रदनिका**—( प्रवेश करुन ) आर्यें **वसंतसेने**, **वर्धमानक** चेट विनंती करतो कीं मागील दरवज्यापाशीं गाडी तयार आहे म्हणून.

**वसंत**०—अगे चेटी, त्याला म्हणावें घटकाभर थांब. मी वेणीफणी करुन येत्यें.

**वर्धमा०**—अरेरे, मी गाडींतली बैठक आणावयास विसरलों. गाडीखान्यांत जाऊन ती घेऊन येतों. पण गाडी मोकळी सोडून जावें तर हे बैल वेसणीला न जुमानतां गाडी भलती-कडेस नेतील. यासाठीं गाडी घेऊन जावें हें बरें. ( असें म्हणून गाडी घेऊन जातो. )

**वसंत०**—अगे चेटी, माझें फणेरें घेऊन ये. मी वेणी घालत्यें. ( फणेरें घेऊन वेणी घालीत बसत्ये. इतक्यांत दुसऱ्या एका गाडी वर बसून **स्थावरक** नांवाचा चेट येतो. )

**स्थावरक**—राजश्यालक **संस्थान** ह्यानें मला आज्ञा केली आहे कीं अरे **स्थावरका,** माझी गाडी घेऊन **पुष्पकरंडक** जीर्णोद्यानाकडे लौकर ये म्हणून. तर मला तिकडेस लौकर गेलें पाहिजे. लौकर चला, बैलांनो, लौकर चला. ( पुढें जाऊन पाहून म्हणतो.) गांवठी गाड्यांनीं रस्त्यांत किती दाटी केली आहे ही ! आतां जावें तरी कसें ? धमकी दिली पाहिजे. ( मोठ्या डौलानें म्हणतो. ) अरे गाडीवाल्यांनो, आपापल्या गाड्या लौकर एक्या बाजूस करून वाट मोकळी करा. माझी गाडी लौकर पुढें जावयाची आहे. ( ऐकलेंसें करून म्ह० ) काय म्हणतां ? ही गाडी कोणाची कोणा करतां? कोठें नेतोस ? सांगतों ऐका. ही गाडी राजश्यालक संस्थान याची, त्याच्याच करितां **पुष्पकरंडक** नामक जीर्णोद्यानांत नेतों. तर लौकर एकीकडे व्हा. ( पुढें पाहून. ) हीं कसा मार्ग पैस झाला ! द्यूत नायकाला पाहून पराजित झालेला द्यूतकार जसा लाजून पळतो, तसा मला पाहून तोंड झांकून झटकर एकीकडे पळून गेला हा कोण असेल बरें? असो कोणी, त्याची पंचाईत मला कशाला पाहिजे. आपण लौकर जावें म्हणजे झालें. अहो माणसानों, पैस व्हा पैस व्हा; रस्ता सोडा ( ऐकलेंसें करून ) काय म्हणतां ? घटकाभर उभा रहा किंवा चाक मारून निघून जा ? औं, अरे मी श्यालकसंस्थानाचा शूर गाडीवान् आहें. मी खोळंबून उभा राहीन, किंवा चाक मारून एकीक-

डून जाईन काय? अथवा असो. हा बिचारा एकटाच आहे आणि याची गाडी ओझ्यानें फार लादलेली आहे. तसें कां होईना. आतां मी ही गाडी त्या बागेच्या दरवाज्यापाशीं उभी करून वाट मोकळी करतों. ( असें म्हणून **चारुदत्ता**च्या बागेच्या मागल्या दरवाज्यापाशीं गाडी उभी करून अरे हा मी आलों थांब. असें म्हणून तिकडे जातो. )

**रदनिका**—आर्ये, चाकांचा शब्द ऐकूं येतो. यावरून गाडी आली असें वाटतें.

**वसंत०**—अगे, चल तर लौकर. माझें हृदय जाण्यास त्वरा करतें. मला दरवाज्याची वाट दाखीव.

**रदनि०**—बरें तर या. माझ्या मागून इकडून या.

**वसं०**—( अंमळ पुढें जाऊन म्ह० ) अगे **रदनिके**, आतां तूं येथेंच उभी रहा. मी जात्यें. ( असें बोलून गाडींत बसावयास जात्ये. )

**रदनिका**—आज्ञा बाईसाहेब. ( असें म्हणून निघून जात्ये. )

**वसंत०**—( उजवा डोळा लवला असें दाखवून त्या **स्थावरका**च्या गाडींत आपली गाडी अशा समजुतीनें बसून म्ह० ) हें काय? असा अपशकुन कां होतो? माझा उजवा डोळा कां लवतो? अथवा **चारुदत्ता**चेंच दर्शन न होण्याचें सूचक हें दुश्चिन्ह आहे काय?

**स्थावरक**—( येऊन म्ह० ) मार्गांतील गाडे म्यां एकीकडे सारले. आतां आपली गाडी घेऊन जावें. ( गाडी वर चढून गाडी चालवून मनांत म्हणतो. ) गाडी जड कां येते बरें? अथवा त्या गाड्यांचीं चाकें फिरविल्यामुळें मलाच श्रम झाले म्हणून गाडी जडशी मला वाटत्ये. असो आतां लवकर गेलें पाहिजे. झ्यों झ्यों बाळ्या बाळ्या, हैक. ( इतक्यांत पडद्यांतून शब्द होतो. ) अरे द्वारपालकांनो, आपापल्या चौकीच्या जागीं सावध असा. जो गवळ्याचा पोर बंदीखान्यांत घातला होता

तो बंदिशाळेचा दरवाजा फोडून पाहरेकऱ्यांस मारून बिडी तोडून पळून जात आहे, त्याला धरा. त्याला धरा. (इतक्यांत पडदा वर सारून घाबरलेला एका पायांत बिडीची सांखळी लोंबवीत डोईवर बुरखा घेऊन **आर्यक** धांवत येतो आणि इकडे तिकडे फिरतो.)

**स्थावरक**—(मनांत म्ह०) शहरामध्यें आज मोठी गडबड दिसते, तर आपण आतां लौकर जावें (असें म्हणून गाडी हांकीत निघून जातो.)

**आर्यक**—(हा विलक्षण समय प्राप्त झाला पहा.)

ओंव्या.

नरपतीचें बंधनागार ॥ मनुष्यांस दुःख सागर ॥
मी त्यांत पडोनि बाहेर ॥ दैव योगें निघालों ॥ १ ॥
एका पायीं लोह शृंखळा ॥ ओढितां वाजे खळखळा ॥
बंधन तोडोनी मोकळा ॥ गज तैसा मी फिरतसें ॥ २ ॥

अहो काय प्रसंग हा मजवर आला. मजविषयीं जें सिद्धानें भाकीत केलें त्याचें भय मनांत धरून **पालकराजानें** गोवळवाड्यापासून मला धरून आणून पायांत बिड्या घालून बंदिशाळेंत घातलें. परंतु दैवेंकरून माझा प्रिय मित्र जो **शर्विलक** त्याच्या साह्यानें त्या बंधनापासून मी सुटलों. (डोळ्यांतून अश्रू टाकून म्ह०)

श्लोक.

भाळीं असेल विधिनें लिहिलेंच कांहीं ॥
ऐसें तरी मजकडे अपराध नाहीं ॥
ज्यानें मला वनगजापरि बद्ध केलें ॥
त्याचें घरामधिल म्यां धन काय नेलें ॥ ३ ॥

दिंड्या.

दैवसिद्धी होणार होत आहे ॥
तिला लंघाया कोण शक्त आहे ॥ ४ ॥

नसे आंगीं सामर्थ्य सूड घ्याया ॥
बळिष्ठाशीं मांडणें वैर वायां ॥ ५ ॥

तर आतां हा मी दुर्दैवी कोणीकडे जाऊं ? कोण माझें यासमयीं रक्षण करील ? ( इकडे तिकडे पाहून ) हें कोणा साधुपुरुषाचें घर आहे याचें दार उघडें दिसतें.

श्लोक.

दिसे नसे अर्गळ जीर्ण वाडा ॥
भेगा बहू दीसति या कवाडा ॥
याचा धणी कष्ट दशेस योग्य ॥
असेल त्याचें ममतुल्य भाग्य ॥ ६ ॥

तर ह्याच घरांत फिरून बसावें. ( असें म्हणून आंत जातो. ) ( पडद्यांतून शब्द होतो. ) झाँ झाँ बाळ्या बाळ्या.

**आर्यक**—( तें ऐकून ) अरे कोणाची गाडी इकडे येत आहे.

श्लोक.

अहा हें कोणाचें [१]प्रवहण असे येत इकडे ॥
तयामध्यें कोणी प्रवर जन दृष्टीस नपडे ॥
सुदैवानें गाडी अवचित दिली [२]शून्य मजला ॥
कृपेचा हा डोळा मजवरि [३]तयाचा समजला ॥ ७ ॥

( तदनंतर गाडी घेऊन **वर्धमानक** चेट येतो. )

**वर्धमा०**—अहो मी गाडींतली बैठक आणली.— अगे **रदनिके**, आर्या **वसंतसेना** हिला कळीव कीं गाडी दाराशीं उभी आहे. येऊन आंत बसावें. आणि **पुष्पकरंडक** जीर्णोद्यानास चलावें.

**आर्यक**—( तें ऐकून म्ह० ) ही गाडी गणिकेची दिसते. आणि बाहेर जाणारी आहे. असो बरेंच झालें. ह्याच गाडींत आपण बसावें म्हणजे सहज काम होईल. ( असें म्हणून गाडीजवळ बसावयास जातो. )

**वर्धमानक**—( कानोसा घेऊन ) पैंजण वाजले, यावरून आर्या **वसंतसेना** गाडींत बसावयास आली असें वाटतें. आ-

---

१ गाडी. २ रिकामी. ३ दैवाचा.

यें, हे बैल माजोरी मारके आहेत. यासाठीं पाठी मागल्या आंगूनच चढून आंत बसावें.

**आर्यक**-(तें ऐकून तोंडावाटे शब्द न काढतां गुपचूप गाडींत बसतो.)

**वर्धमा०**—( मनांत ह्म० ) पैंजणांचा शब्द राहिला आणि गाडी भारावली या वरून वाटतें कीं आतां आर्या **वसंतसेना** गाडींत बसली. तर आतां गाडी हांकावी. इर्यां, इर्यां, बाळ्या बाळ्या. ( असें ह्मणून गाडी हांकीत चालता होतो. )

( इतक्यांत **वीरक** येतो. )

**वीरक**— ( सोबत्यास हाका मारतो. ) अरे **जया**, अरे **जयमाना**, **चंदनका**, अरे राजाचें त्द्दय आणि कारागृह[1] दोन्ही बरोबरच असतात. यासाठीं फार हुशारीनें काम केलें पाहिजे. तर तूं गल्लीच्या पुढल्या तोंडाशीं उभा रहा. तूं मागल्या बाजूस उभा रहा. एकानें दक्षिणेकडे एकानें उत्तरेकडे उभें रहावें. आतां हें जें गांवकुसूं आहे ह्याज वर मी **चंदनकाला** घेऊन चढतों आणि चोहोंकडे अवलोकन करितो. अरे **चंदनका**, अरे इकडे ये. ( गडबडीनें **चंदनक** येतो. )

**चंदनक**— अरे **वीरका**, अरे **वीरजा**, अरे **विशाल्या**, अरे **भीमांगदा**, अरे **दंडकाला**, अरे **दंडशूरा**, सर्व तुम्ही

**आर्या.**

या लौकर विश्वासें त्वरित करा आज राजकामातें ॥
कीं लक्ष्मी राजाची जाऊंद्यावी न अन्य[2] धामातें ॥ ८ ॥

आतां तुह्मी असें करा. 17206

**आर्या.**

उद्यान[3] सभा[4] मार्गहि गल्ल्याबाजार घोष[5] या भागीं ॥
शोधा सत्वर जेथें शंका येइल मनांत त्या जागीं ॥ ९ ॥

( दुरून पाहून ह्म० )

---

१ कारागृह फुटलं ह्मणजें राजाचें त्द्दय फुटल्याप्रमाणें होतें. २ दुसऱ्याच्या घरास. ३ बाग. ४ मोठीं घरें ज्यांत पुष्कळ मजले असतात. ५ गयळवाडे.

## आर्या.

रे काय वीरका तूं दाखविशी वदसि मार्दवानें[1] तो ॥
कोण पहारे बंधन तोडुनि गोपाल* दारका नेतो ॥ १० ॥
(विस्मय करून मनांत म्ह०)

## ओवी.

कोणास आठवा दिनकर[2] ॥ कोणास चवथा सुधाकर[3] ॥
कोणास पांचवा भूमिकुमार[4] ॥ शुक्र सहावा कोणाला ॥ ११ ॥
जन्मस्थ कोणाला बृहस्पती ॥ नवमस्थानीं मंदगती[5] ॥
जिवंत असतां मी चंदन क्षिती॥जो गोपाळ दारका पळवीतसे॥१२॥

**वर्धमानक**— (गाडी हाकीत जातो.) झांझां बाळ्या बाळ्या.

**चंदनक**— (गाडी पाहून) अरे, ही झांकलेली बुरख्याची गाडी राजमार्गांतून चालली आहे. ही कोणाची गाडी, कोणीकडे जाणार याची चौकशी केली पाहिजे. **वीरका**, पुढें जाऊन पहा.

**वीरक**— (पुढें जाऊन.) अरे गाडीवाल्या, उभी कर गाडी पुढें नेऊं नको. कोणाची रे ही गाडी? जाणार कोणीकडे? आणि आंत कोण आहे सांग. लौकर सांग.

**वर्धमानक**—बाबारे, ही गाडी श्रेष्ठ **चारुदत्ताची** आहे. यागाडींत आर्या **वसंतसेना** बसली आहे. ही क्रीडार्थ **पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत चारुदत्ताकडे** जात आहे.

**वीरक**—(**चंदनकाजवळ** जाऊन.) हा गाडीवाला म्हणतो, ही **चारुदत्ताची** गाडी आहे. **वसंतसेना** आंत बसली आहे. आणि **पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत** त्याजकडेस जात आहे.

**चंदनक**—बरें तर जाऊंदे. जारे जा.

**वीरक**—पाहिल्यावांचून जाऊं दे म्हणतोस हें काय?

**चंदनक**—आणखी काय तर. काय पहायाचें आहे?

**वीरक**—कोणाच्या मोठेपणा वर जाऊं द्यावें याला?

**चंदन**०—त्या श्रेष्ठ **चारुदत्ताच्या**.

---

१ मृदुपणानें. * गवळ्याच्या मुलाला. २ सूर्य. ३ चंद्र. ४ मंगळ. ५ शनि. हेग्रह कोणाला अनिष्ट आले म्हणून तो स्वनाशार्थ असें काम करता हेंतात्पर्य.

**वीरक**—कोण **चारुदत्त** आणि कोण **वसंतसेना**? यांच्या मोठेपणा वर पाहिल्यावांचून मी नाहीं जाऊं देणार.

**चंदनक**—अरे तूं **चारुदत्ता**ला जाणत नाहींस, आणि **वसंतसेने**लाही जाणत नाहींस असें वाटतें. जर **चारुदत्ता**ला आणि **वसंतसेने**ला जाणत नाहींस तर आकाशांतील चंद्रिकेसहित चंद्रालाही तूं जाणत नाहींस, यांत संशय नाहीं.

## आर्या.

गुण[१]मणिकरंडका त्या कोण न जाणेल, जो करी यत्न ॥
आ[२]पन्नदुःखमोक्षा, चतुरुदधींतील सार हें रत्न, ॥ १३ ॥

## आर्या.

दोनचि पु[३]ज्य असति या नगरींत मनुष्य रत्नभूत अहा ॥
धार्मिक **वसंतसेना** कीं तो धर्मिष्ठ **चारुदत्त** महा ॥ १४ ॥

**वीरक**—अरे **चंदनका**, तूं समजला नाहींस.

## आर्या.

मज चारुदत्त ठावा, ठावी आहे **वसंतसेना** ही ॥
मी नृपकार्यामध्यें म्हणणार पित्यासही पिता नाहीं ॥ १५ ॥

**आर्यक**—( मनांत म्ह० ) हा माझा पूर्वजन्मींचा वैरी आणि तो माझा पूर्व जन्मींचा बंधु.

## आर्या.

कार्य असे एकचिपरि नाहीं तुल्यस्वभावता यांची ॥
कुंड चिता ह्या मधल्या भिन्ना जशि योग्यता हुताशांची॥१६॥

**चंदनक**—अरे तूं काळजीचा, आणि राजाचा विश्वासू सेनापति आहेस त्या अर्थी तुला तसें केलें पाहिजे खरें. बरें हे मी बैल धरले. तूं पहा आंत.

---

१ गुणरत्नाचा करंडाच. २ दुःखितांचें दुःख दूर करण्याविषयीं जो यत्न करणारा. ३ मान्य.

**वीरक**—तूं ही राजाचा विश्वासू सेनापति आहेस यासाठीं तूंच पहा. मी बैल धरतों.

**चंदनक**—पण म्यां पाहिलें म्हणजे त्वां पाहिलें असें होईल का ?

**वीरक**—अरे त्वां पाहिलें म्हणजे म्यां तर काय पण राजानें पाहिलें असें होईल.

**चंदनक**—अरे गाडीवाना, गाडीची धूर वर उचलून धर.

**वर्धमा०**—बरें महाराज. ( तसें करतों )

**आर्यक**—( मनांत म्ह० ) आतां हे राजदूत मला पाहतील. आतां काय करावें ? मजपाशीं शस्त्र देखील नाहीं. काय हतभाग्य मी ! अथवा शस्त्र कशाला पाहिजे.

## आर्या.

**भीमाला** अनुकारिन आहे मद्बाहु शस्त्र हें मोठें ॥
मरणें झगडोनि बरें सांपडुनीं बंधनीं मरण खोटें ॥ १७ ॥

अथवा साहस करण्याचीही ही वेळ नव्हे. असो आतां काय होईल तें होवो !

**चंदनक**— ( गाडी वर चढून बुरका वर उचलून आंत पाहतो. ) आँ हा कोणरे ?

**आर्यक**— ( दीनपणाने ) आर्या, मी तुला शरण आहें ?

**चंदनक**— शरणागतास अभय असो.

**आर्यक**— ( विनवून म्हणतो. )

## आर्या.

टाकी त्यास जयश्री टाकिति मित्रें हि बंधु वर्ग तसे ॥
होतो अति निंद्य जगीं जो नर शरणागतास टाकितसे ॥ १८ ॥

**चंदनक**— हा कोण ? गोपालदारक ? अरे रे श्येनापासून भयाने पळालेला लावकपक्षी पारध्याच्या हातीं सांपडला असें झालें. एक तर हा अनपराध, शरणागत, **चारुदत्ताच्या** गाडींत बसलेला आणि मला प्राणदान देणारा जो

---

१ भीमाने कीचकास केलें तसें करीन हें तात्पर्य. २ उपहासास्पद.

**शर्विलक** त्याचा हा मित्र, या वरून याचें रक्षण करावें. योग्य. आणि एकतर याला धरणें हें राजकार्य आहे. हें तर अवश्य केलें पाहिजे. एकीकडे आड एकीकडे विहीर अशी गत झाली. आतां येथें कोणता विचार करावा ? अथवा विचार कशाला पाहिजे. काय होणार असेल तें होऊं. म्यां जें याला प्रथम अभय दिलें तेंच खरें.

## आर्या.

भीतास अभय देतों[1] आणि रसिक[2] जो परोपकाराचा ॥
जरि होय नाश त्याचा लोकीं तो गुणचि त्या उदारांचा[3] ॥ १९ ॥

( भीत भीत गाडी खालीं उतरून **वीरकास** म्ह० )

पाहिला मीं आर्य ( असें अर्धें बोलून फिरवितो. ) पाहिली मी आर्या **वसंतसेना.** ती म्हणते. हें चांगलें नाहीं. हें योग्य नाहीं. कांकीं मी स्वच्छंदेंकरून **चारुदत्ता**कडे जात असतां राजमार्गांत मला अटकाव झाला.

**वीरक**— अरे **चंदनका**, येथें मला मोठा संशय उत्पन्न झाला.

**चंदनक**— कशा मुळें तुला संशय उत्पन्न झाला ?

**वीरक**— या मुळें झाला,

## आर्या.

वाटे म्यालास गड्या कीं तूं चळलास बोलतांनाहीं ॥
हा आर्य पाहिला मग बोलसि आर्या **वसंतसेना**ही ॥ २० ॥

येथें माझी खातरी होत नाहीं.

**चंदनक**—तुझी खातरी नाहीं झाली तर नाहीं झाली. त्याला म्यां काय करावें ? अरे आम्ही दक्षणी मनुष्यें. आम्हाला स्पष्ट बोलतां येत नाहीं. आणि इकडची भाषाही पुरती समजत नाहीं. तुझ्या सारखें मला व्याकरणाचें ज्ञान कोठें आहे ? पाहिला काय आणि पाहिली काय. आर्य काय आणि आर्या काय सारखेंच. येथें शब्दविचार आणि लिंग विचार पाहिजे कशाला.

---

१ देणार. २ परोपकारकर्ता. ३ अशा उदार पुरुषाचा.

**वीरक**—असो, त्वां पाहीलें तसें मीही पाहतों. एकदां मला पाहूंदे. राजाज्ञा आहेच. आणि मीही राजाचा विश्वासू चाकर आहें. पहायास कांहीं चिंता नाहीं.

**चंदनक**—तर मग मी काय अविश्वासू चाकर झालों ?

**वीरक**—अरे तसें नव्हे, राजाज्ञेप्रमाणें केलें पाहिजे.

**चंदनक**—( मनांत म्ह० ) हा गोपालदारक **आर्यक** बंदींतून निघून **चारुदत्ताच्या** गाडींत बसून पळून जात आहे असें जर मी सांगेन तर त्या बिचाऱ्या **चारुदत्ताला** राजा तत्काळ शासन करील. तर आतां येथें कोणता उपाय करावा ? ( विचार करून ) असो आतां येथें करनाटकी कावा केला पाहिजे. ( उघडपणे ) अरे **वीरका**, म्यां **चंदनकानें** चौकशी केल्यावर पुन्हा तूं चौकशी करीन म्हणतोस असा तूं कोणरे ?

**वीरक**—तूं तरी असें म्हणणारा कोण रे ?

**चंदनक**—अरे तूं आपणास पूज्यमान मान्यमान म्हणवितोस पण तुझी जात तुला ठाऊक आहे काय ?

**वीरक**—( क्रोधाविष्ट होऊन ) अरे माझी जात कोणती रे ?

**चंदनक**—कोणीं सांगावी ?

**वीरक**—सांग अथवा नको सांगूं. तुझी जात मीं जाणतों पण.

## आर्या.

जाणुनिही जात तुझी बोलुनि मी दाखवीत नांहि बळें ॥
राहो मनांत माझ्या काय अधिक फोडल्या कपित्थफळें ॥२१॥

**वीरक**—सांग सांग.

**चंदनक**—( कांहीं हातानें खूण करतो. )

**वीरक**—अरे हें काय करतोस रे ?

**चंदनक**—अरे श्रवण कर.

## आर्या.

पुरुषांच्या अस्थीचे तव हस्तें संधि चांगले बसती ॥
कातर वापरिसी सदा ऐसा झालास तूंहि सैन्यपती ॥ २२ ॥

**वीरक**—अरे **चंदनका**, तूंही पूज्यमान मान्यमान असतां

आपली जाति जाणत नाहींस ?

**चंदनक**—अरे, चंद्रासारख्या शुद्ध **चंदनकाची** जात कोणती असणार रे ?

**वीरक**—कोणी सांगावी ?

**चंदनक**—सांग सांग.

**वीरक**—( कांहीं खूण दाखवितो )

**चंदनक**—हें काय रे ?

**वीरक**—अरे श्रवण कर.

**आर्या.**

भेरी तव मातोश्री बाप नगारा अशी तुझी जाती ॥
दुर्मुख करटक भाऊ ऐसा झालास तूंहि सैन्यपती ॥ २३ ॥

**चंदनक**—( क्रोधाविष्ट होऊन ) मी **चंदनक** चर्मकार कायरे. बरें तर पहा गाडींत कोण आहे तें.

**वीरक**—अरे गाडीवाल्या, गाडी फिरीव. मला पाहूंदे.

**वर्धमा॰**—( गाडी फिरवितो. ) **वीरक** गाडीवर चढावयास जातो. **चंदनक** किंचित हास्य करून त्याची झोंटी धरून त्याला खालीं पाडतो आणि लाथांनीं तुडवितो. )

**वीरक**—( कोपून उठून ) अरे मी तुझ्या बोलण्यावर विश्वास ठेऊन राजाज्ञे प्रमाणें काम करीत असतां त्वां माझे केंस धरून मला खालीं पाडून लाथा मारल्या, तर तुला ठाऊक असूंदे. तुला राजसभेंत नेऊन तुझे हातपाय जर न तोडवीन तर मी नावाचा **वीरकच** नव्हे.

**चंदनक**—अरे जारे राजसभेंत जा कीं राजवाडयांत जा. तूं कुत्र्यासारखा. तुझ्या भुंकण्याला भितो कोण ?

**वीरक**—बरें काय चिंता आहे. ( असें म्हणून निघून जातो. )

**चंदनक**—( चोहोंकडेपाहून ) गाडीवाल्या, हूं पाहतोस काय. आतां हांक गाडी लौकर. जर कोणी तुला विचारील तर सांग कीं **चंदनक** आणि **वीरक** ह्यांनीं चौकशी करून सोडलेली गाडी जात आहे. आर्ये **वसंतसेने**, ही मी तुला कांहीं

खूण देतों ( असें म्हणून तरवार पुढें करतो. )

**आर्य०**—( तरवार घेऊन हर्षानें मनांत म्हणतो. )

आर्या.

शस्त्र मिळालें मजला दक्षिणभुज फुरफुरे पहा आज ॥
अनुकूळ सर्व झालें माझी दैवेंचि राखिली लाज ॥ २४ ॥

**चंदनक**—**आर्यै** हें ध्यानांत असूंदे.

आर्या.

हा मी **चंदनक** तुला या व्यसनांतूनि मोकळें करितों ॥
माझें स्मरण असूंदे स्नेहरसाचाच लोभ मी धरितों ॥ २५ ॥

**आर्यक**—ध्यानांत कसें न ठेवीन !

आर्या.

हा चंद्रशील **चंदन** दैवानें आज मम सखा केला ॥
याचें स्मरण करिन मी जर सिद्धादेश शेवटा गेला ॥ २६ ॥

**चंदनक.** आर्या.

देवोत अभय तुज **शिव विष्णु ब्रह्मा शशी**[1] किरणमाली[2] ॥
नाशोत शत्रुपक्षा **शुंभनिशुंभांस** ती जशी काली[3] ॥ २७ ॥

गाडीवाल्या हूं लौकर गाडी हांक.

**वर्धमा०**—हा चाललों. ( असें म्हणून गाडी घेऊन निघून जातो. )

**चंदन०**—( पडद्याकडे पाहून ) अरे, मी चालताहोण्या बरोबर माझा प्रिय मित्र **शर्विलक** माझ्या मागोमागच आला. असो. मुख्य सेनापति **वीरक** हा राजाच्या कृपेंतला आहे. त्याशीं म्यां विरोध केला. हें चांगलें केलें नाहीं. आतां तो माझी दुर्दशा करील यांत संशय नाहीं. तर आतां पुत्राला भावाला घेऊन **शर्विलका**बरोबर निघून जावें हें बरें.

( असे बोलून सर्व निघून जातात. )

**प्रवहणविपर्यास नामक,**
**सहावा अंक समाप्त.**

---

१ चंद्र. २ सूर्य. ३ देवी.

# मृच्छकटिक नाटक.

अंक ७.

स्थल.

पुष्पकरंडक जीर्णोद्यान.

पात्रें.

चारुदत्त ............... सावकाराचा मुलगा.
विदूषक मैत्रेयनामा .... त्याचा जिवलग मित्र.
चेट. वर्धमानकनामा. .... चारुदत्ताचा गाडीवान.
आर्यक. ............... गोपाल पुत्र.

# मृच्छकटिक नाटक.

## अंक ७.

( तदनंतर **चारुदत्त** आणि विदूषक येतात. )

**विदूषक**—हे मित्रा, पहा **पुष्पकरंडकजीर्णोद्यानाची** शोभा काय चमत्कारीक आहे ती !

**चारुदत्त**—मित्रा, तूं म्हणतोस तशी आहे खरी. मला तर अशी दिसते.

### आर्या.

वणिजा परि तरुवर हे पुष्पें विक्रेय वस्तुशीं दिसती ॥
या आपणांत घ्याया कर मधुकर राजदूत हे फिरती ॥ १ ॥

**विदूषक**—प्रिय मित्रा, हें शिलातल पाहिलेंना किती सुंदर आहे तें ? ह्याला टांकींचा संस्कार नसून हें स्वतः सिद्ध रमणीय आहे. ह्या शिलातलावर अमळ बसावें.

**चारुदत्त**—( शिलातलावर बसून म्ह० ) मित्रा, **वर्धमानकास** इतका उशीर कां लागला बरें ?

**विदूषक**—मी तर **वर्धमानकाला** निखंदून सांगितलें होतें कीं, **वसंतसेनेला** घेऊन लौकर ये मग त्यानें कां उशीर लावला हें मी काय सांगूं ?

**चारुदत्त**—इतकें सांगितल्यावर त्यानें उशीर लावूंनये. मग कोणतें कारण असेल तें असो.

### श्लोक.

त्याच्या काय पुढें दुजी हळु हळू गाडी असे चालली ॥
यासाठीं पळवावयास अपली संधी नसे साधली ॥
किंवा अक्षचि मोडला म्हणुनि तो घ्यायास गेला घरा ॥
किंवा प्रग्रह तूटतां परतला आणावया दूसरा ॥ २ ॥

---

१ बाजारांत. २ जकात. ३ कणा. ४ दोरे.

अथवा श्लोक.

दाटी फार म्हणोनि मार्ग दुसरा पाहोनिकीं येतसे ॥
किंवा बैल बुजोनियां उधळले ते आटपेनातसे ॥
स्वच्छंदें अथवा हळू हळु चले कीं तो असे भागला ॥
नेणों कारण कोणतें उशिर कां त्या ईतका लागला ॥ ३ ॥

(इतक्यांत ज्या गाडीवर **आर्यक** चोरून बसला होता ती गाडी घेऊन चेट येतो.)

**चेट**—(बैलांस चालवितांना म्ह०) ह्यों ह्यों, बाळ्या बाळ्या.

**आर्यक**—(मनांत म्ह०)

श्लोक.

नरपतिपुरुषांच्या[१] दर्शनीं फार भ्यालों ॥
चरणिं निगडे भारी यामुळें पंगु झालों ॥
न कळत बसुनी मी चाललों साधुयानीं ॥
परभृत जणु नीडीं रक्षिला वायसांनीं ॥ ४ ॥

अहो मी, नगरापासून बराच दूर निघून आलों. तर आतां काय ह्या गाडीवरून उतरून शेजारच्या झाडींत लपून बसूं, किंवा ह्या गाडीच्या धन्याला असाच जाऊन भेटूं? (विचार करून) अथवा झाडींत कशाला जावें! हा स्वजनाचा दयाळू आणि शरणागतांचा पाळक असा **चारुदत्त** जवळच आहे असें ऐकतों. तर त्याला भेटून मग कोणीकडे जाणें तें जावें. हें बरें; कांकीं,

साक्या.

व्यसन समुद्रापासुनि बाहिर कोणी पुरुष निघाला ॥
पाहुनि होतें सुख फारचि त्या साधूच्या ह्रदयाला ॥ ५॥
जरि माझें हें शरीर पावे ऐशा विषम दशेला ॥
तरि त्या साधूच्याच गुणावर धरिलें म्यां शरिराला ॥६॥

**चेट०**—हेंच तें **पुष्पकरंडक जीर्णोद्यान**. यांतच जावयाचें

---

१ राजसेवक. २ बिडी.

( बागेच्या दरवाज्याजवळ जाऊन हाका मारतो. ) अरे आर्या **मैत्रेया** ? आर्या **मैत्रेया** ? गाडी आली दरवाजा उघडा.

**विदू॰**—मित्रा, तुला आनंदाचें वर्तमान सांगतों. **वर्धमानक** हाका मारतो यावरून **वसंतसेना** खचीत आली असें वाटतें.

**चारु॰**—वाहवा फार चांगलें झालें. जा लौकर दरवाजा उघड.

**विदूषक**—( दरवाजा उघडून गाडी आंत येऊं देतो. ) अरे रांडलेका इतका उशीर कांरे लावला ?

**चेट**—आर्या **मैत्रेया**, रागें भरूं नको. गाडींतली बैठक गाडीखान्यांत विसरलों होतों ती आणावया साठीं पुन्हा गाडी घेऊन गेलों आणखी आलों. ह्यामुळें उशीर लागला.

**चारुदत्त**—**वर्धमानका**, गाडी फिरीव. सखे **मैत्रेया**, **वसंतसेनेला** गाडींतून खालीं उतर.

**विदूषक**—कां ? तिचे पाय बिडीनें बांधले आहेत म्हणून तिला स्वतां उतरावयास येत नाहीं वाटतें ?

( उठून जवळ जातो आणि गाडीचा बुरका उचलून आंत पाहतो. ) अरे मित्रा, ही **वसंतसेना** नव्हे. हा **वसंतसेन** आहे.

**चारुदत्त**—मित्रा, अशी थट्टा काय करतोस ? **वसंतसेनेला** पाहण्याविषयीं मी उतावीळ आहें. आतां लांबण लावूंनको. अथवा थांब, तूं कशाला, मीच स्वतां तिला खालीं उतरतों. ( असें म्हणून उठतो. )

**आर्यक**—( **चारुदत्ता**कडे पाहून. ) अहो हाच गाडीचा धनी **चारुदत्त** आहे बरें ! हा केवळ ऐकण्यांतच रमणीय असें नाहीं. हा पाहण्यांत ही रमणीय आहे. माझें रक्षण खचीत करील. आतां चिंता नाहीं.

**चारुदत्त**—( गाडी वर चढून पाहून ह्म॰ ) अरे, हा कोण गाडींत ?

श्लोक.

शुंडासमान भुज ज्यास विशाल वक्ष ॥
खांदे वृषा सदृश आयत ताम्र अक्ष ॥

आली दशा अशि कशी विषमा तया हे ॥
पायांत हें निगडयुग्म किमर्थ वाहे ॥ ७ ॥

कोणरे तूं बाबा ?

**आर्यक**-मी आर्यकनामा गोपालदारक, तुला शरण आलों आहें.

**चारुदत्त**—पालकराजानें गवळवाड्यापासून धरून आणून बंदींत घातला तोच काय तूं ?

**आर्यक**—होय तोच मी.

**चारुदत्त**—कांहीं चिंता नाहीं. स्वस्थ ऐस.

## आर्या.

दैवेंचि गांठपडली आतां मी मन तुझें न मोडीन ॥
सोडीन प्राणांतें परितुज शरणागता न सोडीन ॥ ४ ॥

**आर्यक** ( हर्ष पावून. ) तुझें कल्याण असो.

**चारुदत्त**—अरे वर्धमानका, ह्याच्या पायांतली बेडी काढ.

**चेट**—आज्ञा महाराज. ( तसें करतो. ) बिडी काढली महाराज.

**आर्यक**—लोखंडाची बिडी निघाली, पण स्नेहाची दृढतर बिडी पायांत पडली.

**विदूषक**—ह्याच्या पायांतल्या बिड्या निघाल्या. त्या आतां आमच्या पायांत पडणार कीं काय कोण जाणे ?

**चारुदत्त**—शिव शिव, मित्रा असें भलतेंच काय बोलतोस ?

**आर्यक**—आर्या चारुदत्ता, तुझ्या स्नेहा मुळें मी ह्या तुझ्या गाडींत बसलों, याची क्षमाकर.

**चारुदत्त**—असें म्हणूं नको, मला राग नाहीं. मी क्षमा केली-च आहे. तूं होऊन माझ्याशीं स्नेह धरिला तेणेंकरून मी सुखी झालों.

**आर्यक**—आज्ञा होईल तर जाईन.

---

१ बिडी

**चारुदत्त**—बरें आहे, जावें.

**आर्यक**—मी खालीं उतरतों.

**चारुदत्त**—मित्रा, उतरूं नको. नुकतीच तुझ्या पायांतून बिडी काढली आहे. पाय अवघडले असतील. लौकर चालतां येणार नाहीं, मार्गांत मनुष्यांची दाटी आहे, आणि चोंहोंकडे राजदूत फिरत आहेत ते कदाचित् तुला ओळखतील. गाडींत असलास म्हणजे कोणास शंका येणार नाहीं. यासाठीं गाडींत बसूनच जा.

**आर्यक**—जशी तुझी मर्जी असेल तसें.

**चारुदत्त**—सुखरूप आपल्या बांधवां कडे जा. **वर्धमानका** याला याचे घरीं पोंहचीव.

**आर्यक**—तूंच माझा बांधव आहेस.

**चारुदत्त**—असो, माझें स्मरण असूंदे.

**आर्यक**—आत्म्याला कोण विसरणार आहे ?

**चारुदत्त**—मार्गामध्यें देवता तुझें रक्षण करोत.

**आर्यक**—त्वां माझें रक्षण केलें, हें खरें.

**चारुदत्त**—मीं कशाचें. तुझ्या दैवानें तुला रक्षिलें.

**आर्यक**—त्याला तरी तूंच कारण.

**चारुदत्त**—पालक राजाचा बंदोबस्त फार आहे. त्याचे दूत सर्वत्र फिरताहेत. यासाठीं तूं लौकर निघून जा.

**आर्यक**—तुझें पुन्हा दर्शन असो. ( असें म्हणून निघून जातो. )

**चारुदत्त**—( विदूषकास म्हणतो.

### श्लोक.

मंतू[१] असा नृपतिचा घडला असोनी ॥
येथें न होय बरवें क्षणही बसोनी ॥

---

१ अपराध.

टाकीं सख्या निगडे[2] नेउनिजीर्ण कूपीं[2] ॥
जाईल वृत्त नकळे सहजांत भूपीं ॥ ९ ॥

( डावाडोळा लवलासेंकरून म्ह० ) सखे **मैत्रेया, वसंतसेने-** च्या दर्शनाविषयीं तर मी फार उत्सुक आहें. पण तिचें दर्शन घडतें कीं नाहीं कोणजाणे. पहा-

**आर्या.**

नघडे त्या कांतिचें दर्शन वामाक्षि आजि फुरफुरतें ॥
कारण नसोनि कैसें माझें बा चित्त फार हुरहुरतें ॥ १० ॥

तर चल आतां आपण येथून जाऊं. ( पुढें जाऊं लागतात.) हें काय पुढें आलें ? आज अमंगल भिक्षुदर्शन[3] आपणांस झालें. (विचार करून. ) त्याला यावाटेनें जाऊंद्या आपण त्या पलिकडल्या वाटेनें जाऊं.

( असें झाल्यावर सर्व निघून जातात. )

---

**॥ आर्यकापहरणनाम ॥**

**सातवा अंक.**

**समाप्त.**

---

१ बिडि. २ विहिरींत. ३ जतीचें दर्शन.



# मृच्छकटिक नाटक.

## अंक ८.

स्थळ.

## पुष्पकरंडक जीर्णोद्यान.

पात्रें.

भिक्षु. ............. शाक्य श्रमणक संन्यासी
शकार. ............. राजश्यालक.
विट. ............... त्याचा सोबती.
चेटस्थावरक.. .. .. शकाराचा चाकर.
वसंतसेना.. .. .. .. कलावंतिणीची मुलगी.

# मृच्छकटिक नाटक.

अंक ८.

प्रारंभ.

( तदनंतर ओली छाटी हातीं घेऊन भिक्षु येतो.* )

भिक्षु[1]—हे अज्ञ जन हो,

श्लोक.

धर्मसंग्रहिं सदा तुम्हि भागा[2] ॥
ध्यानें[3] दुंदुभिरवासह जागा ॥
इंद्रियें विषम चोरचि येती ॥
धर्म वित्त चिरसंचित नेती ॥ १ ॥

आणखी

आर्या.

*मारुनि पांचजणांतें[4] स्त्रीचा[5] वध करुनि देह जो रक्षी ॥
मारी चांडाळांतें[6] स्वर्गसुखालागिं तोच नर लक्षी[7] ॥ २ ॥

आणखी

श्लोक.

रे रे शिरोमुंडक मुंड मुंडिलें ॥
परंतु तें चित्त तुवां न मुंडिलें ॥
तो साधु जेणें स्वमनास मुंडिलें ॥
मुडोन मुंडा जरि नाहिं मुंडिलें ॥ ३ ॥

ही भगवी छाटी मीं घेतली आहे. आतां **शालक** संस्थानाच्या उद्यानांत जाऊन ही पुष्करणींत धुवून हळु हळू पुढें जावें. ( असें बोलून बागेंत जाऊन तळ्यांत छाटी धुतो. )

( इतक्यांत पडद्या पलीकडून शब्द होतो. ) कोण आहे तो ! अरे दुष्टा गोंसावड्या, थांब; उभा रहा.

१ हाबौध्धमतानुसारी आहे म्हणून त्या मता प्रमाणें बोलतो. २ यत्न करा. ३ ध्यानरूपदुंदुभीचा शब्द करून जागेरहा. ४ पंचेंद्रियांतें. ५ अविद्येचा. ६ अहंकारातें. ७ पावे.

* पंचेंद्रियें जिंकूनि जो अहंता ॥ मारूनटाकी ममता दुरंता ॥
जिंकून षड्शत्रुशरीर रक्षी ॥ तो स्वर्ग सौख्यास अवश्य लक्षी ॥

**भिक्षु**—( पाहून भितो. ) अरेरे हा राजशाल **संस्थानक** स्वतां आला. मला धरतो कीं काय नकळे. एका भिक्षूनें ह्याचा अपराध केला होता म्हणून कोणताही भिक्षु जिथें सांपडेल तिथें त्याला धरून नाकांत वेसण घालून हिंडवितो. आतां काय करावें. मीतर निराश्रित आहें. कोणाच्या आश्रयास जाऊं ? आतां बुद्धच माझें रक्षण करो.

( इतक्यांत हातांत तरवार घेऊन विटा[1] सहवर्तमान शकार येतो. )

**शकार**—अरे दुष्टा गोसांवड्या थांब उभारहा. मद्यपान समयीं तांबड्या मुळ्याचा बुडखा तोडून खातात त्या प्रमाणे तुझें डोकें तोडून टाकतों. पहा. (असें बोलून त्याला ताडण करतो.)

**विट**—अरे **काणेली**पुत्रा, प्रपंचाला त्रासून ज्यानें भगवीं वस्त्रें घेतलीं त्याला ताडण करणें योग्य नाहीं. यांत काय विशेष आहे ? आपला हा शानदार बाग पहा. यांत काय चमत्कार आहे तो.

## श्लोक.

अशरणा शरणप्रद हे तरू ॥
असुखिता सुख हेतु जसे गुरू[3] ॥
नगर सोडुनि राहति हे वनीं ॥
तरि खरे उपकारक या जनीं ॥ ४ ॥

**भिक्षु**—हे उपासका[4], तुझें स्वागत असो. मजवर कृपाकर.

**शकार**—अरे विटा, पाहा हा गोंसावडा माझी निंदा करतो.

**विट**—तो काय म्हणतो ?

**शकार**-मला उपासक असें म्हणतो. तर मी काय हजाम आहें ?

**विट**—तूं उपासक[5] आहेस अशी तो तुझी स्तुति करतो. ही निंदा नव्हे.

---

१ त्याचा सेवक. २ राजशाल. ३ पितर. ४ बुद्धाचा उपासक या ठिकाणीं मूळग्रंथाचा अर्थ अशा प्रकारचाच आहे. ५ बुद्धधर्म पाळणारा.

शकार—एक रे श्रमणका.
भिक्षु—तूं धन्य आहेस. तूं पुण्य आहेस.
शकार—अरे विटा, पाहिलें हें. तूं धन्य, तूं पुण्य असें हा मला म्हणतो. तर काय मी श्रावक आहें, किंवा कोष्टी आहें ?
विट—अरे काणेलीपुत्रा, तूं धन्य आहेस, तूं पुण्य आहेस अशी तो तुझी स्तुति करतो. ही निंदा नव्हे.
शकार—विटा, बरें पण हा येथेंकशाला आला ?
भिक्षु—आपली छाटीधुण्याकरितां आलों.
शकार—अरे दुष्टा श्रमणका, सर्व उद्यानांमध्यें श्रेष्ठ असें हें पुष्पकरंडक नामक जीर्णोद्यान माझ्या बहिणीच्या नवऱ्यानें मला दिलें आहे. जेथें कोल्हीं कुतरीं येऊन पाणी पितात, मी प्रबलपुरुषवर मनुष्य असूनही जींत स्नान करीत नाहीं, त्या पुष्करणींत जुन्या कुळथाच्या काढ्यांत बुचकळल्या सारखीं ओंगळ दुर्गंधी अशीं हीं भगवीं लुगतरें धुतोस काय ? तर तुला आणखी बडवितों पहा.
विट—अरे काणेलीपुत्रा, मला वाटतें, हा नवा थोड्या दिवसांचा संन्यासी आहे.
शकार—विटा, असा तर्क तूं कशावरून करतोस ?
विट—ह्यांत कठिण काय ? पहा,

श्लोक.

केसांच्या विरहेंकरून टकलीं[2] कांती सुगौरा असे ॥
थोडा काळ म्हणोनि चीवरकृत[3] स्कंधींहि घट्टानसे ॥
वाटे कीं नकषायवस्त्र[4] रचना आझूनही हा शिकें[5] ॥
वस्त्रप्रांत सईल यास्तवचि हा स्कंधीं न ह्याच्या टिके ॥ ५ ॥

भिक्षु—उपासका, मी खराच थोड्या दिवसांचा संन्यासी आहें.
शकार—तूं जन्मल्यापासूनच संन्यासी कां झाला नाहींस.

---

१ भिक्षुजती. २ माथ्यावर. ३ वस्त्रें बांधून बांधून पडलेला घट्टा. ४ भगवीं वस्त्रें आंगावर घेण्याचा प्रकार. ५ शिकला नाहीं.

( असें बोलून त्याला मारितो. )

**भिक्षु**—( मार सोसून ) बुद्धाला नमस्कार असो.

**विट**—अरे ह्या बिचाऱ्या गरिबाला मारून फळ काय बरें? सोड सोड, जाऊंदे त्याला.

**शकार**—अरे, मी कांहीं विचार करतों तों पर्यंत उभा रहा.

**विट**—कोणाबरोबर विचार?

**शकार**—आपल्या ऱ्हदया बरोबर.

**विट**—अरे हा अजून गेला नाहीं!

**शकार**—( आपणाशीं बोलतो. ) हे पुत्रका ऱ्हदया, ह्या संन्याशानें जावें कीं रहावें? किंवा जाऊं नये आणि राहूं नये? हां, मी, ऱ्हदयाबरोबर विचार केला. माझें ऱ्हदय मला असें म्हणतें.

**विट**—काय म्हणतें तुझें ऱ्हदय?

**शकार**—तें म्हणतें, ह्यानें जाऊं नये, राहूं नये, उश्वास टाकूं नये, निश्वास टाकूं नये. येथेंच पडून लौकर मरावें.

**भिक्षु**—बुद्धाला नमस्कार असो. मी शरणागत आहें.

**विट**—जाऊंदे ह्याला.

**शकार**—जावयाचें तर कांहीं संकेतानें जावें.

**विट**—संकेत तो कोणता?

**शकार**—संकेत हाच कीं, ह्यानें पाण्यांत चिखल टाकावा, परंतु पाणी गढूळ होऊं नये. किंवा पाण्याचा ढीग करून त्यावर चिखलाचा गोळा ठेवावा.

**विट**—काय मूर्खपणा हा!

आर्या.

दुश्चरितांचे थारे[1] कीं जंगम शैलपुत्र[2] नरें नखरे[3] ॥
मांसाचे वृक्षचिजे हे मूर्ख महीस[4] भारभूत खरे ॥ ६ ॥

**भिक्षु**—( त्याला शाप देतो. )

---

१ आश्रय. २ चालते पाषाणपुत्र. ३ नराचें नखरे चेष्टा करणारे. ४ पृथ्वीस.

**शकार**—विटा, हा काय ह्मणतो ?

**विट**—हा तुझी स्तुति करतो.

**शकार**—ऐक ऐक, फिरून ऐक.

( शाप देत भिक्षु निघून जातो. )

**विट**—अरे **काणेलीपुत्रा**, ह्या उद्यानाची शोभा पहा.

**श्लोक.**

पहा तरू हे फळपुष्प शोभित ॥
प्रभूतनिस्यंदलतोपवेष्टित[1] ॥
महीपतीचे जन ह्यांस रक्षिती ॥
सदार मर्त्यापरि सौख्य भोगिती ॥ ७ ॥

**शकार**—तूं चांगलें बोललास. आणखी पहा चमत्कार.

**श्लोक.**

तरुतळीं पडलीं कुसुमें अहा ॥
तरुहि पुष्पभरें लवले पहा ॥
तरुशिरावरि वानर लोंबती ॥
फणस हे पिकले जणु दीसती ॥ ८ ॥

**विट**—**काणेलीपुत्रा**, पहा हें सुंदर शिलातल. ह्यावर अंमळ बसावें.

**शकार**—हा मी बसलों. तूं पण बैस. ( असें ह्मणून **विटा**सहवर्तमान खालीं बसतो. ) अरे **विटा**, अजून त्या **वसंतसेने**ची मला आठवण होत्ये. दुर्जनाच्या भाषणा प्रमाणें तिचें रूप माझ्या ऱ्हदयांतून जात नाहीं.

**विट**—( मनांत ह्म० )तिनें ह्याची इतकी निर्भर्त्सना केली तरी हा तिचें चिंतन करीतच आहे ! अथवा.

**आर्या.**

अवमानितां स्त्रियांनीं नीचाचा काम वाढतो स्पष्ट ॥
सत्पुरुषाचा होतो मृदु किंवा सर्व होतसे नष्ट ॥ ९ ॥

---

१ बहुत रस स्रवणाऱ्या लतांनीं आलिंगलेले वृक्ष.

**शकार**—कायरे ? गाडी लौकर घेऊन ये असें **स्थावरक** चेटाला सांगितलें असतां त्यानें इतका उशीर कां लावला बरें ? तो अजून येत नाहीं. मला तर फार भूक लागली आहे. ह्या दोन प्रहरच्या वेळेस माझ्यानें पायांनीं जाववणार नाहीं. पहा ह्या वेळेस कसें झालें आहे तें.

आर्या.

मध्यान्हीं रवि आला झाला दुःप्रेक्ष्यकुपित वानरसा ॥
हत पुत्रा **गांधारी** तैशी झाली पहा प्रतप्त रसा[1] ॥ १० ॥

**विट**—होय खरेंच. आणखी पहा.

श्लोक.

चारा सोडुनि झोंप घेति बसुनी छायेंत हीं गोकुळें[2] ॥
तृष्णेनें[3] बहुपीडिले मृग[4] पिती हे तापलेलीं जळें ॥
संतापास[5] भिऊन कोणि नगरी मार्गीं नदे[6] पावलें ॥
तप्ता भूमिस यान[7] सोडुन गमे कोठें उभें राहिलें ॥ ११ ॥

**शकार**—अरे विटा, आणखी पहा.

श्लोक.

रवि किरणहि माझ्या मस्तकीं लीन[8] झाले ॥
शकुनि[9] विहग पक्षी वृक्षशाखीं लपाले ॥
नरें[10] पुरुष मनुष्यें दीर्घ निश्वास वीती[11] ॥
गृहिं शरणि[12] बसोनी आतपा घालवीती ॥ १२ ॥

कायरे **विटा**, अजून तो **स्थावरक** चेट येत नाहीं. असो, चित्तविनोदार्थ आतां मी अमळ गातों. ( असें म्हणून गाऊं लागतो. ) अरे **विटा** माझें गाणें त्वां ऐकिलें काय ? मी कसें गायलें ?

**विट**—काय सांगावयाचें आहे ? आपण केवळ गंधर्वच आहां.

---

१ पृथ्वी. २ गुराचेकळप. ३ तान्हेनें. ४ हरिण. ५ सूर्य किरणांच्या उष्णतेस. ६ टाकीतनाहीं. ७ गाडी. ८ लंबरूपानें पडले. ९ शकुनि, विहग, पक्षी, ह्या तीन शब्दांचा अर्थ 'पक्षी' हा एकच आहे. १० नर पुरुष मनुष्यें, यांचा अर्थ एकच. ११ टाकिती. १२ आश्रयास.

**शकार**—मी गंधर्व कसा नाहीं होणार बरें ? पहा.

**ओंव्या.**

हिंगू जीरक भद्र मुस्ता ॥ सगुडा शुंठी वचा सुहिता ॥
ती म्यां सेविली गंधयुक्ता ॥ मधुरस्वर मी कसा नव्हें ॥१३॥

अरे मी आणखी गातों. ( असें म्हणून गाऊं लागतो. ) **विटा** म्यां गायलें तें त्वां ऐकिलें काय ? कसें गाणें आहे ?

**विट**—काय बोलावें. आपण गंधर्वच आहां.

**शकार**—कसा मी गंधर्व नसेन. पहा.

**ओंव्या.**

हिंग मिऱ्यांचा लावून सुवास ॥ घृतपाचित करून त्यास ॥
भक्षिलें म्यां कोकिलाचें मांस ॥ मग मधुरस्वर कसा नव्हें ॥ १४ ॥

अरे अद्यापि तो **चेट** येत नाहीं !

**विट**—स्वस्थ ऐस, तो आतां लौकरच येईल. ( इतक्यांत गाडींत बसलेल्या **वसंतसेने** सहवर्तमान **स्थावरक** चेट येतो. )

**चेट**—( आपणाशीं बोलतो ) माझ्या पोटांत धाक शिरला आहे. डोई वर सूर्य आला. मला उशीर लागला ह्मणून माझा धनी राजशाल **संस्थानिक** मजवर कोप करील कीं काय कोण जाणें. तर आतां लौकर गेलें पाहिजे.

बैलांनो, चला लौकर. झीं झाँ दा, दा, बाळ्या, बाळ्या.

**वसंतसेना**—( तो शब्द ऐकून. ) हायहाय, हा **वर्धमानकाचा** शब्द नव्हे. हें कसें झालें ? **आर्य चारुदत्तानें वर्धमानकाला** फार श्रम झाले ह्मणून दुसरा गाडीवान् देऊन दुसरी गाडी पाठविली काय कीं न कळे. ( दुश्चिन्ह झालेंसें करून ) अरे, माझा उजवा डोळा लवतो, माझें त्द्दय कांपतें, दिशा शून्य दिसतात, सारेंच विपरीतसें मी पाहत्यें. हें काय दुश्चिन्ह आहे हें समजत नाहीं.

**शकार**—( चाकांचा शब्द ऐकून ह्म० ) गड्या **विटा**, गाडी आली असें वाटतें.

**विट**—कशावरून तुला समजलें ?

**शकार**—तूं ऐकत नाहींस काय, म्हाताऱ्या डुकरासारखा घर घर शब्द चाकांचा होतो हा?

**विट**—( पाहून ) खरी गोष्ट हा **चेट** आला पहा.

**शकार**—हे पुत्रका, हे **स्थावरका**, हे चेटा, आलास बाबा एकदांचा.

**चेट**—आलों कीं.

**शकार**—गाडी आली?

**चेट**—होय. गाडी ही आली.

**शकार**—बैल ही आले काय?

**चेट**—यांत काय संशय.

**शकार**—तूंही आलास?

**चेट**—( हांसून म्ह० ) महाराज मीही आलों हा पहा.

**शकार**—बरें तर गाडी आंत आण.

**चेट**—कोणत्या वाटेनें आणूं?

**शकार**—ह्याच पडक्या भिंताडा वरून आण.

**चेट**—अहो महाराज ह्या वाटेनें गाडी नेली तर बैल मरतील गाडी मोडेल, आणि मीही मरेन.

**शकार**—अरे मी राजाचा मेव्हणा आहें. मला काय. बैल मेले तर दुसरे विकत घेईन, गाडी मोडली तर दुसरी करवीन, आणि तूं मेलास तर दुसरा गाडीवान मिळवीन.

**चेट**—तुमचें महाराज, सर्व नीटच आहे; पण मी आपल्या प्राणांस मुकेन याची वाट काय?

**शकार**—कांहीं चिंता नाहीं. सर्वांचा नाश झाला तरी होऊंदे. पण मोडक्या भिंतीवरूनच गाडी आण.

**चेट**—बरें महाराज, हा निघालों. चलोरे बैलांनो, मोडेनाकां गाडी मोडलीतर, धन्यासुद्धां कां मोडेना. दुसऱ्या गाड्या पुष्कळ आहेत. गाडी ह्या वाटेनें आंत नेऊन तिची काय दशा होईल ती धन्याला सांगेन. (असें म्हणून त्या वाटेनें गाडीआंत नेतो.) अरे गाडी मोडली नाहीं. महाराज, ही गाडी आणली पहा.

**शकार**—कायरे रांडलेंका, बैल मेले नाहींत आणि तूंही मेला नाहींस रे ?

**चेट**—होय खरेंच महाराज.

**शकार**—मित्रा **विटा** तूं चल आपण गाडीकडे जाऊं. विटा, तूं माझा शिक्षक आणि गुरु आहेस, म्हणून तुला अगोदर मान दिला पाहिजे. यासाठीं तूंच अगोदर गाडीवर चढ.

**विट**—बरें कां होईना. ( असें म्हणून चढायास जातो. )

**शकार**—अथवा थांब. ही गाडी त्वां केली काय म्हणून तूं अगोदर बसतोस ? गाडीचा धनी मी आहें. मीच अगोदर गाडीवर बसेन.

**विट**-आपणाच मला सांगितलें आणि आपणच आतां असें म्हणतां.

**शकार**—अरे जरी मी तसें बोलों तरी महाराज आपण अगोदर बसावें असें तूं मला म्हणावें कीं नाहीं. असें म्हणण्याचा तुझा धर्म आहे.

**विट**—बरें आपण अगोदर बसावें. मग मी बसेन.

**शकार**—हा मीच आतां बसतों पहा. पुत्रा **स्थावरका** चेटा गाडी फिरीव.

**चेट**—( गाडी फिरवून ) चढावें महाराज.

**शकार**—( गाडीवर पाहून चढून भ्याल्यासारखें करून लवकर खालीं उतरतो, आणि **विटा**च्या गळ्यास मिठी घालून म्ह०) अरे **विटा**, मी मेलों. गाडींत कोणी राक्षसी बसली आहे किंवा कोणी चोर बसला आहे खचीत. राक्षसी असली तर[1] आम्हां दोघांला चोरून नेईल, आणि चोर असलातर आपणांस खाऊन टाकील.

**विट**—मित्रा भिऊंनको. या बैलांच्या गाडींत राक्षसी कशाला येऊन बसेल. तें कांहीं नाहीं. दुपारच्या उन्हानें तुझी दृष्टि दिपली आहे. आणि आंगरखा घातलेल्या **स्थावरक** चे-

---

[1] हें उलटें भाषण हास्यरस पोषणार्थ आहे.

टाची सावली आंत पडली आहे ती पाहून तुला भ्रांति उत्पन्न झाली. दुसरें कांहीं नाहीं.

**शकार**—पुत्रका, **स्थावरका**, चेटा, जिवंत आहेसना ?

**चेट**—हो जिवंत आहें, यांत काय संशय.

**शकार**—गड्या **विटा**, गाडींत खचीत कोणी स्त्री बसली आहे. तूं पहा बरें.

**विट**—काय स्त्री बसली आहे ? तर मग चला.

श्लोक.

जाऊं नम्र करून मस्तक तिला देखावयाला तसे ॥
धारा ताडित बैल मान लवुनी[1] मार्गांत जाती जसे ॥
व्हावा गौरव मंडळींत मजला ऐसेंच इच्छीतसें ॥
डोळे उंच करून मी कुलजना देखावया भीतसें ॥ १४ ॥

**वसंतसेना**—( विस्मय पावून मनांत म्ह० ) काय माझ्या नेत्राला आयास देणारा हा राजश्याल प्राप्त झाला ? आतां माझें जीवित राहतें कीं नाहीं कोण जाणे. उखर भूमीवर बीजमुष्टि टाकावी तद्वत् मज मंदभागिनीचें येथें निष्फळ आगमन झालें. आतां येथें काय उपाय करावा ?

**शकार**—हा वृद्ध चेट भ्याला आहे, म्हणून गाडींत कोण आहे तें तूंच पहा.

**विट**—काय चिंता आहे. मी जाऊन पाहतों.

**शकार**—काय येथें कोल्हे रडूं लागले[2], कावळे धांवूं लागले. तर जोंपर्यंत ह्या विटास ते दांतांनीं पाहतील आणि डोळ्यांनीं खातील तोंपर्यंत आपण येथून पळून जावें हें बरें.

**विट**-(गाडींत **वसंतसेनेला** पाहून खिन्न होऊन मनांत म्ह०)कायहो ही हरिणी व्याघ्राला अनुसरली? अरे रे फार वाईट गोष्ट झाली!

आर्या.

शारदचंद्र धवल जो मृदुपुलिनावर सुखें करी केली ॥

---

१ लवबुनी. २ उलटें बोलणें आहे.

त्या हंसातें सोडुनि हंसी काकाकडे कशी आली ॥ १५ ॥
(उघडपणें ह्म० ) **वसंतसेने** हें योग्य नाहीं. हें बरोबर झालें नाहीं.

ओवी.

नेत होता आर्जवून ॥ तेव्हां धरिला मनीं मान ॥
तुवां केला अवमान ॥ पूर्वीं जयाचा ॥ १ ॥

**वसंतसेना**— ( मान हालविते. )

**विट**— **दुसरी ओवी.**

ऐकोनि जननीचा उपदेश ॥ धरोनियां धनाची आस ॥
आलीस तया सेवावयास ॥ वेश्यापणास अनुसरोनी ॥ २ ॥

मी तुला पूर्वीं सांगितलें होतें कीं,

निजतनु सधनार्थ मांडिलें विक्रयाला ॥
ह्मणुनिसमभजावें अप्रियाला प्रियाला ॥

**वसंत**०—नाहीं नाहीं. मी त्यावर अनुरक्त होऊन आलें असें नाहीं. गाडीची अदलाबदल झाल्यामुळें मी चुकून इकडे आलें. तर आतां मी शरणागत आहे. तूं माझें रक्षण कर.

**विट**—भिऊं नको. स्वस्थ ऐस. ( मनांत म्ह० ) असो मी ह्याला ठकवितों. ( **शकारा**जवळ जाऊन म्ह० ) अरे **काणेली**-**पुत्रा**, खरेंचरे या गाडींत राक्षसी बसली आहे.

**शकार**—अरे राक्षसी आहे म्हणतोस तर तिनें तुला कसें चोरलें नाहीं ? अथवा चोर असला तर त्यानें तुला कसें खाल्लें नाहीं ?

**विट**—अशी भलतीच कल्पना कशाला करतोस. चल आपण बागाबागांतून दाट झाडांच्या सावली मधून पायांनीं चालतचालत **उज्जयनी** नगरांत जाऊं. असें केलें ह्मणून चिंता काय ?

**शकार**—असें केल्यानें काय होईल ?

**विट**—असें केल्यानें आपणास व्यायाम होईल, आणि बैलांस विसांवा सांपडेल.

**शकार**—बरें कां होईना. **स्थावरका** चेटा गाडी घेऊनजा. आ-

म्ही पायांनीं चालत येतों. देवाब्राह्मणापुढें पायांनीं चालावें असें आहे. पण नाहींनाहीं थांब. गाडींतच बसून गेलें पाहिजे. मी गाडींत असलों म्हणजे दुरून लोक मला पाहतील ते म्हणतील कीं हा राजाचा मेव्हणा **संस्थानक** थोर मनुष्य चालला आहे.

**विट**—( मनांत म्ह० ) आतां कोणता उपाय करावा. विषाचें औषध करणें कठीण आहे. असो आतां काय होईल तें होवो सांगावें हें बरें ( उघडपणें. ) अरे **काणेलीपुत्रा**, राक्षसी गाडींत आहे असें मी थट्टेनें बोललों. परंतु **वसंतसेना** तुझ्याशीं रमण्यासाठीं आली आहे.

**वसंत**०—( तें ऐकून ) इडापिडा टळो. अमंगळ पळो. काय हें भलतेंच बोलला हा.

**शकार**—( हर्ष पावून ) काय मी सबल पुरुषवरमनुष्य वासुदेव समजून मजकडे आली ?

**विट**—होय, यांत काय संशय.

**शकार**—वाहवा, तर मग ही अपूर्वश्री मला प्राप्त झाली. त्यावेळेस मीं हिला कोप आणिला होता. पण आतां पायांपडून हिला सुप्रसन्न करीन.

**विट**—चांगलें बोललास. तसेंच करावें.

**शकार**—हा मी पायां पडतों पहा. ( असें म्हणून **वसंतसेने** जवळ जाऊन म्ह० ) हे अंबिके देवी, मी विनंती करितों श्रवण कर.

आर्या.

सुंदरि विशालनेत्रे हा मस्तक तवपदींच म्यां नेला ॥
दशनखचंद्रविभूषित हस्तांजलिही तुझ्यापुढें केला ॥ १७ ॥
जो म्यां पूर्वी केला अपराध तुझा धरून कामास ॥
त्याची क्षमा करावी आतां झालों प्रिये तुझा दास ॥ १८ ॥

**वसंतसे**०—( सक्रोध होऊन ) दूर हो मूर्खा, भलतेंच बोलतोस. ( असें म्हणून त्याला पायांनीं लोटते. )

**शकार**—(क्रोधाविष्ट होऊन कायगे दांडगे, मला लाथा मारत्येस.)

**श्लोक.**

जें अंबांनीं[1] प्रीतिनें चुंबिजेलें ॥
देवांलाही जें नसे नम्र झालें ॥
तें पायांनीं ताडिलें उत्तमांग[2] ॥
जैसें रानीं दुःशृगालें[3] मृगांग[4] ॥ २० ॥

अरे **स्थावरका** चेटा, ही तुला कोठें सांपडली?

**चेट**—महाराज तुह्माला सांगतों. असें झालें. गांवच्या ओझ्याच्या गाड्यांनीं जेव्हां रस्त्यांत दाटी झाली तेव्हां **चारुदत्ताच्या** बागेच्या दाराजवळ मी आपली गाडी अंमळ उभीकरून खालीं उतरून तिला चाकोरी दिली. इतक्या वेळांत ही बाई आपली गाडी समजून केव्हां आंत बसली हें मी पाहिलें नाहीं. मग मी तसाच गाडी हांकून निघून आलों. अशी गाडीची अदलाबदल झाल्यामुळें ही इकडे आली असें मलावाटतें.

**शकार**—तर काय गाडीची अदलाबदल झाल्यामुळें ही इकडे आली, माझ्याशीं रमण्याकरितां आली नाहीं असें म्हणतोस? तर अगे गर्भदासी, उतर माझ्या गाडींतून, उतर तूं त्या दरिद्री सावकाराच्या पोराला अनुसरणार आणि माझ्या गाडींत बसून माझे बैल खराब करणार हें पाहिजे कशाला? उतर खालीं उतर.

**वसंत**—आर्या **चारुदत्ताला** अनुसरणार असें जें हा बोलला तें खरेंच. ह्या बोलण्यानें मला संतोष झाला. आतां पुढें काय होणार असेल तें होऊ.

**शकार**—लौकर उतर; नाहींतर पहा.

**श्लोक.**

ह्या माझ्या दशनखचंद्रभूषितांनीं ॥

---

१ मातांनीं. २ मस्तक. ३ दुष्टकोल्ह्यानें. ४ हरिणाचें शरीर.

हस्तांनीं परशतताडनोद्यतांनीं ॥
केशांतें धरुनि तुझ्या वरी तनूतें ॥
मी यानावरुनिहि ओढितो भुईतें ॥ २१ ॥

**विट**—छी हें काय बोलतोस.

### आर्या.

ज्या स्त्री गुणसंपन्ना त्यांचे मुर्धज कधीं न ओढावे ॥
उपवनगता लता ज्या त्यांचे पल्लव कदा न तोडावे ॥ २२ ॥

ह्यासाठीं ऊठ, तूं एकीकडे हो. मी **वसंतसेनेला** खालीं उतरतों. ( जवळ जाऊन. ) **वसंतसेने**, खालीं उतर बरें.

**वसंत०**—( गाडींतून खालीं उतरून एकीकडे जाऊन उभी राहत्ये.) आतां काय गति होईल कोणजाणे.

**शकार**—( मनांत म्ह० ) मागें हिनें माझ्या वचनाचा अवमान केल्या मुळें जो कोपाग्नि मनांत धुमसत होता तो आज हिच्या पादप्रहारानें पेटला आहे तर हिला या वेळेस ठार मारल्या वांचून तो अग्नि शांत होणार नाहीं. या साठीं आतां हिला मारून टाकतों. ( उघडपणें ) अरे विटा.

### श्लोक.

जरी इच्छिशी लांब आणी विशाला ॥
गुलानार बारीक ऐशी दुशाला ॥
जरी पाहिजे मांस ही खावयाला ॥
कुचुकूचु कुच्चूकुचू चावयाला ॥ २३ ॥

**विट**—मग पुढें काय म्हणतोस ?

**शकार**—तर माझें प्रियकर.

**विट**—तुझें प्रिय खचीत करीन. पण तें अकार्य नकरितां करीन.

**शकार**—अरे यांत अकार्याचा लेशही नाहीं. आणि राक्षसीचें· ही भय नाहीं.

**विट**—तर मग सांग कोणतें प्रिय करावयाचें तें.

**शकार**—दुसरें कांहीं नाहीं· ह्या **वसंतसेनेला** मारून टाक.

---

१ उत्तम देहातें. २ गाडीवरून. ३ केश. ४ बागेंत लावलेल्या.

**विट**—( कानांवर हात ठेऊन ) काय बोलतोस हें ?

**साक्या.**

अल्पवयस्का स्त्री जातीही केवळ नगरविभूषा[१] ॥
वेश्या असोनि मर्यादेची जैशी सत्कुल[२] योषा ॥ २४ ॥
नसतां तिळअपराध जरी मी आतां वधीन हीतें ॥
कोण्या उडूपें[३] तरोन जाइन त्या परलोक नदीतें ॥ २५ ॥

**शकार**—मी तुला उडूप देईन. आणखी सांगतों. एकीकडे ह्या बागेंत एकांतीं हिला मारलें तर तुला कोण पहावयास आला आहे ?

**विट**—कोणी मनुष्य पाहणारा नसो पण दुसरे पाहणारे आहेत.

**श्लोक.**

ह्या देवता दशदिशा मजपाहताती ॥
चंद्रार्कही सतत पाहत राहताती ॥
तो धर्मही[४] गगन[५] मारुत[६] अंतरात्मा[७] ॥
आहे तशी सुकृतदुष्कृतसाक्षिणी क्ष्मा[८] ॥ २६ ॥

**शकार**-तर मग हिच्यावर वस्त्राचें झांकण घालून आड करून मार.

**विट**—अहारे मूर्खा, तूं केवळ नष्ट आहेस.

**शकार**—( आपणाशीं बोलतो. ) हा म्हातारडा कोल्हा अधर्म भीरु आहे. असो मी **स्थावरक** चेटाला अनुकूळ करून घेतों. ( उघडपणें. ) अरे **स्थावरका,** चेटा, पुत्रका, तुला सोन्याचीं कडीं देईन.

**चेट**—बरें, तुम्हीं दिलीं तर मी हातांत घालीन.

**शकार**—तुझी बैठक किनखापाची करीन.

**चेट**—तर मी ही तिजवर बसेन.

**शकार**—तुला सर्व चेटांचा नाईक करीन.

**चेट**—मग मी धनीच होईन.

**शकार**—तर मग मी सांगतों तें ऐक.

---

१ नगरासभूषणरूप. २ कुलीनस्त्रीसारखी. ३ नौकेनें. ४ आपला धर्म. ५ आकाश. ६ वायु. ७ हृदयस्थआत्मा. ८ पृथ्वी.

**चेट**—महाराज, अकार्य सोडून सांगाल तें सर्व करीन.

**शकार**—अरे अकार्याचा लेशही नाहीं.

**चेट**—तर मग धन्यांनीं सांगावें काय तें.

**शकार**—दुसरें कांहीं नाहीं. ह्या वसंतसेनेला मारून टाक.

**चेट**—कृपा करावी महाराज. गाडीची अदलाबदल झाल्यामुळें ही बिचारी चुकून गाडींत बसली असतां म्यां दुष्टानें हिकडे आणली. तर हिला मारणें माझ्या हातून होणार नाहीं.

**शकार**—अरे चेटा, असें काय म्हणतोस. तुझ्यावर देखील माझी सत्ता नाहीं काय ?

**चेट**—तुमची सत्ता आहे, पण माझ्या शरीरावर आहे. माझ्या मनावर तुमची सत्ता नाहीं. यासाठीं कृपाकरून हें काम मला सांगूं नका. मला भय वाटतें.

**शकार**—अरे चेटा, तूं माझा सेवक असून भितोस कोणाला ?

**चेट**—महाराज, मी परलोकाला भितों.

**शकार**—परलोक काय आहे रे ?

**चेट**—महाराज, पुण्य पापाचा परिणाम आहे.

**शकार**—पुण्याचा परिणाम कोणता ?

**चेट**—जसे तुम्ही बहुसुवर्णमंडित आहां.

**शकार**—पापाचा परिणाम कोणता ?

**चेट**—जसा मी परपिंडभक्षक झालों आहें. ह्मणून मी अकार्य करणार नाहीं.

**शकार**—अरे तूं माझें ऐकत नाहींसना ? तिला मारीत नाहींस संभाळ तर आतां (असें म्हणून त्याला लाथा बुक्यांनीं मारतो.)

**चेट**—महाराज, तुह्मी मला हाणा किं मारा, पाहिजे तें करा ! मी कांहीं अकार्य करणार नाहीं. जन्मांतरीं काय म्यां पाप केलें कीं, तेणेंकरून गर्भदास झालों. तर आतां अधिक पाप मी विकत घेणार नाहीं, मागल्याच पापाचा परिहार होईल तितकी करीन.

**वसंतसे०**—(विटास म्ह०) मी शरणागत आहें. माझें रक्षण करीव.

**विट**—अरे **काणेलीपुत्रा**, क्षमाकर, त्याला मारूनको. शाबास **स्थावरका**, शाबास. चांगलें बोललास.

श्लोक.

आहे भैष्यचिह्रा दरिद्रैहि जरी याला न कोणी गणी ॥
इच्छी हा परलोकिंचें फळ तसा नाहींच याचाधणी ॥
ऐसे हे नरनाश पावति नकां उन्मार्गवर्ती जनीं ॥
योग्या टाकुन जे अयोग्य करिती घेती न भीती मनीं ॥ २७ ॥

आणखी असें आहे.

श्लोक.

नेणे कोणी दुर्गमा दैवतत्वां ॥
दास्याला हा पात्र, तूं ही प्रभुत्वां ॥
कीं हा तूझ्या श्रीस भोगीत नाहीं ॥
याची आज्ञा पाळिशी तूं न कांहां ॥ २८ ॥

**शकार**—( मनांत म्ह० ) हा वृद्ध कोल्हा पापभीरु, आणि हा गर्भदास परलोक भीरु. हे दोघेही भित्रे. मी तर राजश्याल पुरुषश्रेष्ठ असा मनुष्य आहें. मी कोणाला भिणार नाहीं. मला कोणाचें भय नाहीं. मीच स्वतां हें काम करीन. ( उघडपणें. ) अरे गर्भदासा चेटा, तूं जा येथून. अगे **वसंतसेने**, तूं अडोशाला जाऊन एकीकडे बैस.

**चेट**—आज्ञा महाराज. जातों. ( **वसंतसेने**जवळ जाऊन तिला म्ह० ) आर्यें, माझें सामर्थ्य, माझें पुण्य काय तें इतकेंच. ( असें बोलून निघून जातो. )

**शकार**—( कांचा घालून कमर बांधतो. ) **वसंतसेने**, ये इकडे, माझ्या समोर उभी रहा, मी तुला मारतों.

---

१ दास. २ भिकारी. ३ ह्या चेटाला. ४ उत्तमफळ. ५ शकार. ६ अन्यायानें वागणारे. ७ विहित. ८ अविहित. ९ परलोकभय. १० दुर्ज्ञेय. ११ दैवगति. १२ हा चेट दासपणास पात्र झाला. १३ तूं धनीपणास पात्र झालास.

**विट**—चलहो एकीकडे, मूर्खा, माझ्या समक्ष तूं हिला मारशील काय ? ( असें म्हणून त्याची गचांडी धरतो आणि त्याला ढकलून देतो. )

**शकार**—( भुईवर पडतो ) अरे **विटा**, अरे तूं मला **राजश्यालकाला** मारतोस काय ? ( मूर्च्छा आल्यासारखें करतो. पुन्हा सावध होऊन म्ह० )

## आर्या.

तुज पोशिलें सदा मीं, देउनि घृत समधुशर्करा मास ॥
झालास शत्रु माझा, आज तुला सांगतांच कामास ॥ २९ ॥

( मनांत विचार करून म्हणतो. ) हां ! आतां मला युक्ति सुचली. ह्या वृद्धशृगालानें डोकें हालवून त्या **चेटाला** कांहीं खूण केली आहे. तर याला दुसरे कडे पाठवून **वसंतसेनेला** मारून टाकावें. ( उघडपणें ) असो आतां. अरे **विटा**, जें मी तुला बोललों कीं **वसंतसेनेला** मार म्हणून तें कांहीं खरें नव्हें. पहा बरें मोठ्या पत्रावळी सारख्या विस्तीर्ण कुळांत मी उत्पन्न होऊन असें भलतें काम करीन काय ? हिनें भयपावून मला वश व्हावें म्हणून मी तसें बोललों.

**विट**—

## आर्या.

उत्तम कुल असलें तरि शीलचि कारण महत्व यायास ॥
सुक्षेत्रीं बहु होती कंटकितरु नकरितांहि आयास ॥ ३० ॥

बरें मग आतां काय म्हणतोस ?

**शकार**—**विटा**, ही तुला पाहून लाजत्ये. माझा अंगीकार करीत नाहीं. ह्या साठीं तूं जा. आणि म्यां मारल्या मुळें **स्थावरक** चेट पळून जात आहे. तर त्याला धरून इकडे घेऊन ये.

**विट**—( मनांत ह्म० ) कदाचित् असेंही असेल.

## श्लोक.

समक्ष माझ्या हि **वसंतसेना** ॥
मूर्खास लज्जेस्तव हो भजेना ॥

म्हणून एकांत करीन यांला ॥
एकांत उत्तेजक मन्मथाला ॥ ३१ ॥
( उघडपणें म्हणतो. ) बरें तर मी जातों.

**वसंत०**—( विटाचा पदर धरून म्ह० ) मी बोललेंना, कीं मी शरणागत आहें ? मग मला सोडून चाललास कसा.

**विट**—वसंतसेने, भिऊं नको. स्वस्थ ऐस. अरे **काणेलीपुत्रा**, ही **वसंतसेना**, तुजपाशी माझी ठेव असूंदे. संभाळ बरें. मी आल्यावर माझी मला परत दे.

**शकार**-बरें बरें, ही तुझी ठेव म्हणून मजपाशीं असूंदे. मी संभाळतों.

**विट**—हें खरें ना ?

**शकार**—हो खरेंच. तर का खोटें ?

**विट**—( कांहींसा दूर जाऊन मनांत म्ह० ) अथवा मी गेलों असतां कदाचित् हा घातकी हिचा घात करील. ह्यासाठीं अमळ अडोशास उभें राहून ह्याच्या मनांत काय कर्तव्य आहे तें पाहूं बरें. ( असें म्हणून एकांतीं जाऊन उभा राहतो ).

**शकार**—आतां ठीक झालें. आतां हिला मारावें. अथवा हा वृद्धशृगाल मोठा कपटी ब्राह्मण आहे. तो आडऊड उभा राहून खरेंच कोल्ह्याप्रमाणें कपट करील. तर यालाही ठकविण्यास कांहीं युक्ति करतों. ( फुलें वेंचून त्यांनीं आपणास शोभवून म्ह० ) हे बाले, हे बाले, अगे **वसंतसेने** ये इकडे.

**विट**—हा कामातूर झाला. असें वाटतें. असो आतां, आतां कांहीं चिंता नाहीं. ( असें म्हणून जातो. )

**शकार**—( आर्जव करून पाहतो. )

## ओंव्या.

देत असतां बहु कांचन[1] ॥ बोलतअसतां प्रिय वचन ॥
नम्रकरितां सवेष्टन ॥ आपुला मस्तक तुजपुढें ॥ ३२ ॥
तथापि तूं मजला सुदंती[2] ॥ इच्छीत नाहींस गजगती[3] ॥
सेवा करिती तयांप्रती ॥ कष्टविती काय मनुष्यें ॥ ३३ ॥

१ पागोट्यासुद्धां. २ सुंदरदंत जिचे. ३ हेगजगामिनी.

**वसंत०**—यांत काय संदेह आहे ?

( खालीं तोंड घालून म्ह० )

दिंडी.

अरे नीचा हें काय बोलतोसी ॥
द्रव्य देउन मज लोभवूं पहासी ॥
शुद्ध माझा हा देह अशुद्धासी ॥
प्राप्त होइल तुज कसा दुर्जनासी ॥ ३४ ॥

आर्या.

यत्नानें सेवावा, नर कुलशीलाढ्य जरि नसे दाम[1] ॥
शोभा पण्यस्त्रीला[2], सदृशजन[3] समाश्रयें पुरे काम[4] ॥ ३५ ॥

आणखी तुला सांगतें. आम्रवृक्षाचें सेवन करून पलाशवृक्षाचें सेवन कोण भ्रमरी करील ?

**शकार**—अगे बटकीचे पोरी, भिकारी **चारुदत्त** त्याला आम्रवृक्ष म्हणतेस, आणि मी राजश्यालक वरमनुष्य मला पळस म्हणतेस काय. किं शुक देखील म्हणत नाहींस. तर ह्या रीतीनें तूं मला गालीप्रदान करतेस काय आणि अजून त्या भिकाऱ्या **चारुदत्ताला** वाखाणतेस काय ?

**वसंत०**—तो माझ्या निरंतर ऱ्हदयांतच आहे. मग त्याचें स्मरण त्याचें वर्णन कसें नकरीन ?

**शकार**—अद्यापि तो तुझ्या ऱ्हदयांत आहे ? तर थांब, तुझ्या ऱ्हदयगताला आणि तुला बरोबरच मोक्ष देतों पहा. अगे दरिद्र सार्थवाह मनुष्याची इच्छा करणारे, उभी रहा मजपुढें.

**वसंत०**—अरे बोल बोल फिरून. हीं स्तुत्य अक्षरें मला फार प्रिय आहेत.

**शकार**—तर आतां दासीपुत्र **चारुदत्त** तोच तुझें रक्षण करील.

**वसंत०**—जर तो येथें असता, आणि मला पाहता, तर तो माझें रक्षण करता.

---

१ पैका. २ वेशांगनेला. ३ समानशील पुरुषानें. ४ काम पूर्ण होतो.

**शकार**—अं, काय म्हणत्येस ? तो रक्षण करता ?

श्लोक.

तो कोण वालिसुत शक्र महेंद्र विष्णू ॥
कीं द्रोणपुत्र यमनंदन भीम जिष्णू ॥
कुंभश्रुती दशशिरा अथवा जटायू ॥
कीं कालनेमि मुचकुंद बलीश्रुतीयू ॥ ३६ ॥
अथवा हेही तुझें रक्षण करूं शकणार नाहींत.

श्लोक.

चाणक्यानें जसी सीता मारिली भारतीं युगीं ॥
तसातूतें मारिन मी द्रौपदीनें जटायुसा ॥ ३७ ॥

( असें म्हणून मारावयास उठतो. )

**वसंत०**—( भयभीत होऊन. ) अगे आई तूं कोठें आहेस ! हे प्राणप्रिया **चारुदत्ता**, मनोरथ पूर्ण नहोतां हाजन मारला जातो कीं ? आतां काय करूं. मोठ्यानें ओरडूं ? अथवा तें-ही नीट नाहीं. कांकीं **वसंतसेना** मोठ्यानें ओरडत्ये कां, असें लोक म्हणतील. ही तरी मोठी लाजच आहे. हे आर्या **चारुदत्ता** तुला हा शेवटला प्रणाम असो.

**शकार**—ही गर्भदासी अद्यापि त्याच दुष्टाचें नांव घेत्ये. ( तिची गचांडी धरून ) अगे गर्भदासी, कर, कर, त्या भिकाऱ्याचें स्मरण कर.

**वसंत०**—आर्या **चारुदत्ताला** माझें नमन असो.

**शकार**—मर आतां रांडेचे पोरी, मर. ( असें बोलून तिचा गळा दाबतो आणि तिला मारून लोटून देतो. )

**वसंतसेना**—( मूर्छित पडून निश्चेष्ट होते. )

**शकार**—( हर्षपावून मनांत म्हणतो. )

श्लोक.

ही दोषांची करंडी अविनय वसती बाळगीते खलाशा ॥

---

१ कोणाचीं कांहीं तरी नांवे आहेत. २ कुंभकर्ण. ३ रावण.

माझ्या हातीं भली हे गवसलि हिजला दाखवीतों तमाशा ॥
बाहूचें शौर्य माझ्या लवकरचि हिला दाखवीतोंची आतां ॥
निःश्वासा सोडिते ही जरि तरि मरते भारतीं जेंवि सीता ॥६८॥

( पुनः तिला पायांनीं मारतो. आणि मेली असें समजून एकीकडे होऊन म्ह० )

ओंव्या.

मी इच्छीत असतां तूतें ॥ तूं इच्छीत नाहींस मातें ॥
ह्याच धरूनि रोषातें ॥ गणिके तूजम्यां मारिलें ॥ ३९ ॥
**पुष्पकरंडक** नामक ॥ देखून शून्य उद्यानक ॥
एथें पहावया कौतुक ॥ त्रास दिधला तुजला मी ॥ ४० ॥
**रावण** समान माझा पिता ॥ **द्रौपदी** समान माझी माता ॥
पाहून पुत्र शौर्यातें आतां ॥ संतुष्ट कां न होतील ॥ ४१ ॥

असो काम झालें. आतां तो वृद्ध शृगाल येईल. ह्यासाठीं येथून दूरजावें हें बरें. ( असें बोलून एकीकडे जातो. )

( इतक्यांत **चेटास** घेऊन **विट** येतो. )

**विट**—हा **स्थावरक**चेट मी समजावून माघारा आणिला. आतां **काणेलीपुत्रास**, जाऊन भेटावें. ( इकडे तिकडे फिरून पाहून म्ह० ) अरे हा तर पाय पसरून मार्गांतच पडला आहे. तर यानें स्त्रीवध केला असें वाटतें. हाय हाय, अरे दुष्टा काय ही अनर्थाची गोष्ट केली त्वां ! तुजसारख्या पाप्याचा पतनानें आणि स्त्रीवधदर्शनानें आम्ही फारच पतित झालों. ह्या दुश्चिन्हा वरून त्या **वसंतसेने** विषयीं माझे मनांत जी शंका आली ती खरी. असो ( सर्वप्रकारें देवता कल्याण करोत. ) ( **शकारा** जवळ जाऊन ) अरे **काणेलीपुत्रा**, त्वा सांगितल्या प्रमाणें मीं **स्थावरक** चेटास समजावून आणिलें.

**शकार—विटा** आलास ? तुझें स्वागत असो. पुत्रा **स्थावरका** चेटा, तूं आलास ? तुझें ही स्वागत असो.

---

१ हें असंबद्धभाषण आहे.

**चेट**—आलों महाराज.

**विट**—माझी ठेव तुजपाशीं आहे ती माझी मला दे.

**शकार**—कोणती ठेव ?

**विट**—**वसंतसेना.**

**शकार**—गेली.

**विट**—कोठें ?

**विट**—( तर्क करून ) ती ह्या दिशेनें गेली नाहीं.

**शकार**—तूं कोणत्या दिशेनें गेलास ?

**विट**—पूर्व दिशेनें.

**शकार**—ती दक्षिण दिशेनें गेली.

**विट**—मी दक्षिण दिशेनें गेलों.

**शकार**—ती उत्तर दिशेनें गेली.

**विट**—अरे तूं संदिग्ध भाषण करतोस. माझ्या अंतःकरणाची खातरी होत नाहीं. तर खरें असेल तें सांग.

**शकार**—खरें सांगूं ? मारली.

**विट**—अजून मला खरें वाटत नाहीं. खरें सांग.

**शकार**—तुझ्या डोक्यावर मी पाय ठेवून शपथ करतों, मग तर तुला खरें वाटेलना ? ही मीं मारली.

**विट**—( दुःख पावून. ) खरेंच काय ती त्वां मारली ?

**शकार**—माझें बोलणें तुला खरें वाटत नसेल, तर हें प्रत्यक्ष पहा **राजश्यालसंस्थानकाचें** शूरत्व. ( असें म्हणून दाखवितो. )

**विट**—( पाहून. ) हाय हाय, मी मंदभाग्य हत झालों ( असें बोलून मूर्छित होऊन पडतो. )

**शकार**—अरेरे, माझा मित्र **विट** शांत झाला !

**चेट**—अरे विद्वाना विटा, सावध हो सावध हो. अरे, विचार नकरितां गाडींत आणली तेव्हांच म्यां हिला मारलें, आतां काय ?

**विट**—( सावध होऊन करुणायुक्त बोलतो. ) हायगे **वसंतसेने,** तुझा असा परिणाम व्हावा काय ? हाय हाय !

### ओंव्या.

दाक्षिण्योदकाची तटिनी ॥ गेली काळभूमींत जिरोनी ॥
वाटे रति विलासिनी ॥ गेली निघोनि स्वदेशा ॥ ४२ ॥
हा वस्त्रालंकारशोभने ॥ हा सुशीले सुवदने ॥
हा क्रीडारसभाजने ॥ हा वामनयने रंभोरू ॥ ४३ ॥
हा सौजन्यप्रवाहिनी ॥ हा सुहासपुलिनशोभिनी ॥
हा चतुरे गजगामिनी ॥ आश्रयदायिनि आम्हांतें ॥ ४४ ॥
मन्मथव्यापाराचा बाजार ॥ सौभाग्यपण्यांचा आकार ॥
ऐसें तुझें शुभ शरीर ॥ व्यर्थ नाश पावलें ॥ ४५ ॥

( **शकारास** उद्देशून म्हणतो. )

### आर्या.

यापासुन काय तुला लाभ तुवां घोर कर्म जें केलें ॥
त्वां पापें नगरीचें अद्भुतसौभाग्य कीं लया नेलें ॥ ४६ ॥

( **मनांत म्ह०** ) कदाचित् हा दुष्ट आपलें हें दुष्टकर्म मजवर घालील. तर आतां येथें राहूं नये. (असें बोलून चालूं लागतो).

**शकार**—( जवळ जाऊन त्याला धरतो. ) अरे जातोस कुठे ?

**विट**—दुष्टा मला धरूं नको. तुझी संगत पुरे, मी जातों.

**शकार**—अरे **वसंतसेनेला** आपण स्वतां मारून मला दोष लावून पळून जातोस कोठें ? सांप्रत मी अनाथ आहें असें तुला वाटतें काय ?

**विट**—तूं केवळ नष्ट आहेस.

**शकार**—अरे मित्रा, मी तुला शंभर मोहरा देतों. आणि गळ्यांत घालावयास एक चांगली कंठी देतों, हा दुःशब्दाचा आरोप मजवर नसावा, दुसऱ्या कोणा मनुष्यावर जावा येवढें कर.

**विट**—मूर्खा हा तुलाच असो.

**चेट**—इडा पिडा टळो.

**शकार**—( हांसतो. ) ही ही ही.

**विट**—तुझी अप्रीति झाली तरी होऊ. मी तुझा त्याग केला.

### श्लोक.

अप्रीति होउ जरी होइल हास्य टाकीं ॥
प्रीतीस धिक्कृति तुझ्या मज डाग हा कीं ॥
होवो कदापि मजसंगति ही न तूशीं ॥
मी टाकितों तुज जसें विगुणा[1] धनूशी ॥ ४७ ॥

**शकार**—अरे विटा, रागे भरूं नको. चला आपण तळ्या मध्यें जाऊन क्रीडा करूं.

**विट**—नकोरे बाबा तुझी क्रीडा.

### श्लोक.

अपतित[2] जरि आहें सेवितां तूज लोकीं ॥
पतितचि मज सारे मानिती हें विलोकीं ॥
अनुसरूं तुज कैसा स्त्रीनिहंत्यास[3] बाहे ॥
पुनरपि नगरश्री कोपुनी तूज पाहे ॥ ४८ ॥

( करुणायुक्त होऊन म्ह० ) हे **वसंतसेने**, हरहर.

### आर्या.

दुसऱ्या जन्मामध्यें त्वांह्यावेश्यापणांत न रमावें ॥
हे शुभशीळे सुंदरि विश्रुत विमळाकुळांत जन्मावें ॥ ४९ ॥

**शकार**—( रागावून अरे माझ्या **पुष्पकरंडकनामक जीर्णोद्यानांत वसंतसेनेला** मारून आतां पळून कोठें जातोस ? चल ये माझ्या मेव्हण्याचा अग्रभागीं मी तुजवर फिर्याद करितों. तूं उत्तर दे. ( त्याला धरितो. )

**विट**—ऑं-काय म्हणतोस ? दुष्टा थांब तुला उत्तर दाखवितों ( असें म्हणून तरवार काढतो. )

**शकार**-(भिऊन मागें सरतो. ) कायरे तूं भ्यालास होय? तर जा जा.

**विट**—( मनांत म्ह० ) आतां येथें राहणें योग्य नाहीं. असो जेथें आर्य **शर्विलक चंदनकप्रभृति** आपले सोबती आहेत तेथें जावें हें बरें. ( असें म्हणून निघून जातो. )

---

१ गुणरहित धनुष्यास. २ निष्पाप. ३ घातकी.

**शकार**—जा मर एकदांचा. गेलास पिडा चुकली. अरे पुत्रा, **स्थावरका**, चेटा, मी कसें कार्य केलें ?

**चेट**—महाराज, आपण मोठें अकार्य केलें.

**शकार**—अरे चेटा, काय बोलतोस ? मीं अकार्य केलें ह्मणतोस काय ? असो आतां हें पहा. ( अंगावरचे अलंकार काढून ) हा अलंकार मी तुला देतों हा घे. जसा मी हा अंगावर घालतों तसा तूं अंगावर घालीत जा.

**चेट**—हे अलंकार आपणा सारख्यांसच योग्य. मला गरिबाला कशाला पाहिजेत.

**शकार**—तर मग हे बैल घेऊन तूं जा, आणि माझ्या वाड्याच्या समोरच्या गल्लींत उभा रहा, इतक्यांत मी येतों.

**चेट**—आज्ञा महाराज, ( असें बोलून गाडी घेऊन जातो. )

**शकार**—आपलें रक्षणकरण्याकरतां **विट** निघून गेला. तो नाहींसा झालाच म्हणा. आतां **चेटाला** वाड्याच्या समोरच्या गल्लींत उभें रहावयास सांगितलें आहे. तेथेंच त्याला बिडी घालून अडकावून टाकावें. असें केल्यानें आपली मसलत गुप्त राहील. यासाठीं आतां जावें. अथवा एकदा तिला पहावें. बरें मेली कीं जिवंत आहे ती. जिवंत असली तर पुन्हा ठार करावी. ( तिला पाहून ) काय ही तर खचीत मेली. असो शेल्यानें हिला झांकून ठेवतों. पण नको कांकीं हा शेला नामांकित आहे ह्मणून कोणी श्रेष्ठ पुरुष याला ओळखील. असो वाऱ्यानें गोळा झालेल्या शुष्कपर्णांनीं हिला आच्छादून टाकावें. ( तसें करून विचार करतो. ) असो आतां असें करीन. राजसभेंत जाऊन फिर्याद करतों कीं द्रव्याच्या लोभास्तव सावकाराचा पुत्र जो **चारुदत्त** ह्यानें माझ्या **पुष्पकरंडक**नामक जीर्णोद्यानांत **वसंतसेना** बलात्कारानें नेऊन ठार मारली. याची चौकशी करून त्याला शिक्षा करावी. **चारुदत्ता**च्या नाशाविषयीं ही नवीन कपटयुक्ति

मी करितों. विशुद्धनगरींत पशुहिंसेविषयीं जशी एखादी दारुण युक्ति योजावी तशी ही युक्ति चांगली आहे. असो मी आतां जातों. ( असें म्हणून जावयास निघाला आणि पुढें पाहून भ्याला. ) अहो हें मोठें नवल आहे. ज्यावाटेनें मी जातों त्याच वाटेनें हा दुष्ट गोंसावडा ओलें भगवें वस्त्र हातीं घेऊन येत आहे. ह्याच्या नाकांत वेसण घालून ह्याला मी रस्त्यांत फिरविलें आहे ह्यामुळें ह्याचें माझें वैर पडलें आहे. नजाणो कदाचित हा मला येथें पाहून ह्यानेंच **वसंतसेना** मारली अशी प्रसिद्धि करील. आतां ह्याला चुकवून जावें तरी कसें ? ( पुढें पाहून ) असो ह्या पडक्या भिंतीवरून चढून जावें.

आर्या.

हा मी त्वरित निघालों लंकानगरीस जावयास जसा ॥
पाताळीं भूमितळीं हनुमच्छिखरीं महेंद्र जाय तसा ॥ ५० ॥

( असें म्हणून निघून जातो. )

( तदनंतर पडदा वर सारून **संवाहकभिक्षु** येतो. )

**भिक्षु**—मी आपली छाटी तळ्यांत धुतली. आतां झाडाच्या खांदीवर घालून ती वाळवितों. पण येथें वानरांचा उपद्रव फार आहे. त्यांनीं खालीं पाडली तर धुरळ्यानें भरेल. तर खालींच कोठें तरी पसरून वाळवावी. ( पाहून ) असो हीं वाऱ्यानें गोळा झालेलीं शुष्कपर्णें पडलीं आहेत ह्यांवर पसरावी म्हणजे माती न लागतां ही वाळेल. ( तसें करून नमोबुद्धाय असें म्हणून खालीं बसतो, आणि आपणाशीं म्हणतो. ) उगीच काय बसावें. धर्माक्षरांचा पाठ करावा. ( मारुनि पांच जणांतें इत्यादि पूर्वोक्त म्हणतो. पुन्हा विचार करतो. ) अथवा तोंपर्यंत स्वर्ग मला नको. जोंपर्यंत बुद्धोपासका जी **वसंतसेना** तिचा प्रत्युपकार मजकडून घडला नाहीं. जिणें दहा

१ ही गोष्ट बौद्धधर्मास लागू आहे. २ महेंद्र शिखराबर हनुमान् म्हणायाचें तें उलटें म्हणतो.

मोहरा देऊन मला द्यूतकारांपासून सोडविलें. त्या दिवसापासून तिनें मला विकत घेतलें असें मी समजतों. ( पुढें पाहून म्ह० ) हें काय ! ह्या पानांच्या आंत हालतें काय, सुसकारा कोण टाकतें ? अथवा असें असेल.

ओंव्या.

वायूनें शुष्क केलीं ॥ उष्णानें तप्त झालीं ॥
वीवरोदकानें भिजलीं ॥ म्हणोनि हालती हीं पानें ॥ ५१ ॥
पक्षियाच्या पिलांसी ॥ पंख फुटूं लागतां आंगासी ॥
जैसें स्फुरण पंखांसी ॥ होय तैसें भासतें ॥ ५२ ॥

**वसंतसेना**—( सावध होऊन हात बाहेर दाखविते. )

**भिक्षु**—वाहवा, हा काय चमत्कार ! उत्तम अलंकारांनीं भूषित असा स्त्रीचा हात पर्णांतून बाहेर निघाला. ( हें काय ) तसाच हा दुसरा ही हात निघाला काय ? ( त्यांजकडे निरखून पाहून ) हा हात कोणाचा आहे, मी ओळखतों. अथवा विचार कशास पाहिजे. तोच हा हात ज्यानें मला अभय दिलें. असो पुरतेपणीं पाहतों ( वरचीं पानें एकीकडे सारतो आणि पाहून ओळखून म्हणतो. ) अहो तीच ही बुद्धोपासिका. हिची अशी दशा कां झाली ?

**वसंत०**—( खोलशब्दानें बोलत्ये. ) मला थोडें पाणी.

**भिक्षु**—काय ही पाणी मागत्ये. येथून बावडी तर दूर आहे. आतां येथे काय करावें ? असो ही माझी छाटी अजून बरीच ओली आहे हीच हिच्या आंगावर घालावी. ( तसें करतो. )

**वसंत०**—( सावध होऊन उठून बसत्ये. ) भिक्षु तिला वस्त्राच्या पदरानें वारा घालतो. )

**भिक्षु**—आतां पाणी आणून देऊं काय ?

**वसंत०**—आर्या तूं कोण आहेस ?

**भिक्षु**—बुद्धोपासिकेनें मला ओळखलें नाहीं काय ? दहा मोहरा देऊन विकत घेतला तो हा.

**वसंत॰**— होय मी ओळखलें. पण तुम्ही म्हणतां तें मला स्मरत नाहीं. मी अगदीं मेलें असतें तर बरें होतें.

**भिक्षु**—बुद्धोपासिके, अशी अवस्था कां झाली ?

**वसंत॰**—( दुःखपावून ) वेश्यापणास जें योग्य तें झालें.

**भिक्षु**—हे बुद्धोपासिके ऊठ ऊठ, मला स्पर्श करितां नये, म्हणून ह्या जवळच्या झाडाच्या खांदीला धरून ऊठ. ( असें म्हणून झाडाची खांदी खालीं वांकवितो. तिला धरून **वसंतसेना** उठत्ये.

**वसंत॰**—ह्या समयीं त्वां मला जीवदान दिलें असें मी मानत्यें.

**भिक्षु**—असो. येथून जवळच त्या मठांत माझी धर्मभगिनी राहत्ये, तेथें हळूहळू चल. आणि विसांवा घेऊन स्वस्थचित्त हो, मग आपल्या घरास जा. तर तेथपर्यंत हळूहळू बुद्धोपासिकेनें चलावें. ( असें म्हणून दोघें चालूं लागतात. ) ( पुढें पाहून म्ह॰) एकीकडे व्हा. श्रेष्ठजन हो, एकीकडे व्हा ही तरुणी स्त्री आहे, आणि हा भिक्षु आहे. यांस स्पर्श होईल म्हणून एकीकडे व्हा म्हणतों. हा माझा शुद्ध धर्म आहे. हस्त मुख इंद्रियें यांचें ज्यानें नियमन केलें त्या पुरुषापुढें राजा काय अधिक आहे. त्याच्या हातीं परलोक निश्चल आहे.

( असें झाल्यावर सर्व निघून जातात. )

वसंतसेनामोदननामक,
आठवा अंक समाप्त.

---

# मृच्छकटिक नाटक.

अंक ९.

स्थल.

पात्रें.

शोधनक ..............न्यायाधिकाऱ्यांचा चाकर.
शकार ..............राजश्यालसंस्थानक.
न्यायाधीश ..............न्याय करणारे अधिकारी.
श्रेष्ठी..............नगरींतील शेट्या.
कायस्थ ..............लेखक न्यायसभेंतील.
म्हातारी ..............वसंतसेनेची आई.
चारुदत्त. ..............सावकाराचा मुलगा.
वीरक ..............शिपायांचा नाईक.
विदूषक..............चारुदत्ताचा मित्र.

## प्रारंभ.

( तदनंतर **शोधनक** येतो. )

**शोधनक**—न्यायाधिकारी ह्यांनीं मला आज्ञा केली आहे कीं, अरे **शोधनका**, न्यायसभेंत जाऊन झाडून काढून बसावयास घाल. आम्ही लौकर येतों. तर आतां न्यायसभेची सिद्धता करण्यास गेलें पाहिजे. ( पुढें जाऊन पाहून म्ह० ) ही न्यायसभा. हा मी तेथें आलों. ( झाडून काढून बसावयास घालून म्ह० ) सभा झाडून स्वच्छ केली आणि बसावयास आसनें मांडलीं हें न्यायाधिकाऱ्यांस जाऊन सांगतों. ( इकडे तिकडे फिरून पाहून. ) काय **राजश्याल** संस्थानक दुर्जन मनुष्य इकडेसच येत आहे, तर त्याची दृष्टि चुकवून निघून गेलें पाहिजे. ( असें म्हणून एकीकडे लपून उभा राहतो. )

( इतक्यांत उत्तम पोषाक करून **शकार** येतो )

**शकार**—( आपणाशीं बोलतो. )

### श्लोक.

पा[1]ण्यांत शीत उदकांत जळांत न्हालों ॥
बागेंत मी उपवनांत बसोनि धालों ॥
नारी स्त्रिया युवति यांसह रम्य केली ॥
मित्रांसवें मधुर गाउन गानकेली[2] ॥ १ ॥

### दिंड्या दोन चरणी.

क्षणामध्यें केशांस दिली गांठ ॥
क्षणामध्यें बांधिला जटाजूट ॥ २ ॥
क्षणामध्यें मोकळे केश सारे ॥
राजशालक मी दीसतों कसारे ॥ ३ ॥

( मनांत तर्क करितो. ) विषाच्या किड्याप्रमाणें मी दुसऱ्याच्या नाशाविषयीं जागा करून ठेविली आहे. त्यांत कोणाला

१ यांत पुनरुक्तिव्यर्थ आहे. २ गानक्रीडा.

घालूं. जें मीं दुष्टकर्म केलें त्याचें स्थापन कोणावर करावें बरें ? ( स्मरण करून ) होहो मला स्मरलें त्या दरिद्र **चारुदत्तावर** ह्या कर्माचें स्थापन केलें असतां सजाया जोगें आहे. त्यावरच बालांट घ्यावें म्हणजे झालें. असो न्यायसभेंत प्रथम हीच फिर्याद करावी कीं **चारुदत्तानें** द्रव्यलोभास्तव **वसंतसेना** पाश घालून मारली. ह्यासाठीं न्यायसभेंतच अगोदर जावें. ( इकडेतिकडे फिरून म्ह० ) हीच न्यायसभा. मी आंत जातों. (आंत जाऊन पाहून म्ह०) बसावयास आसनें मांडलीं आहेत. आतां न्यायाधिकारी लौकरच येतील तोंपर्यंत ह्या बागेंत दोनघटका वाट पहात बसावें. ( असें बोलून वाट पहात बसतो. )

**शोधनक**—( दुसरे वाटेनें जाऊन पुढें पाहून म्ह०) हे न्यायाधीश येत आहेत त्यांजकडेस जावें. (असें म्हणून त्यांजकडे जातो.) ( इतक्यांत **श्रेष्ठी, कायस्थ** इत्यादिकांसहवर्तमान **न्यायाधीश** येतो. )

**न्यायाधीश**—अहो **श्रेष्ठी, कायस्थ** हो.

**दोघे**—काय आज्ञा आहे ?

**न्याया०**—अहो ऐकतां, न्यायाचा प्रतिबंध असल्यामुळें लोकांचें मन संभाळणें अधिकाऱ्यास फार कठीण पडतें.

### श्लोक.

दोषातें लपवूनी लोक आपुली कार्यें पुढें मांडिती ॥
जिंकाया परपक्षबुद्धिविभवें न्यायासही सांडिती ॥
साधायास निजार्थ युक्ति रचिती सत्यत्व कोठें नसे ॥
द्रष्ट्याचा गुण तो सुदूरचि वसे दोषोक्ति सोपी असे ॥ ४ ॥

आणखी

### श्लोक.

क्रोधानें निजदोष झांकुनि परा मोहामधें पाडिती ॥
येती न्यायसभेंत साधुहि तरी साधुत्व ते सोडिती ॥

बोलायास सभेंत कल्पित वचें चित्तांत भीती नसे ॥
द्रष्ट्याचा गुण तो सुदूरचि वसे दोषोक्ति सोपी असे ॥ ५ ॥
यासाठीं न्यायाचा द्रष्टा असा असावा.

ओंव्या.

शास्त्रज्ञ आणि निराकुल ॥ कपटोद्धारणीं अतिकुशल ॥
वक्ता आणि क्षमाशील ॥ न्यायद्रष्टा असावा ॥ ६ ॥
मित्रा स्वकीया आणि परा ॥ सम दृष्टीनें पाहणारा ॥
प्रश्न करितांचि उत्तरा ॥ देई ऐसा असावा ॥ ७ ॥
दुर्बलांचा पालनकर्ता ॥ दुर्मदांचा मदहर्ता ॥
धर्मन्यायीं लोभ धर्ता ॥ ऐसा द्रष्टा असावा ॥ ८ ॥
द्विर्भाव येतां पुढारी ॥ परतत्वातें त्द्दयीं धरी ॥
राजाचा कोप दूर सारी ॥ ऐसा अधिकारी असावा ॥ ९ ॥

**श्रेष्ठी, कायस्थ**—आपल्या आंगीं जे गुण आहेत त्यांस जर दोष म्हणावें,तर मग चंद्राच्या प्रकाशालाही अंधकार म्हटलें पाहिजे.

**न्याया०**—असो, **शोधनका**, न्यायसभेची वाट दाखीव.

**शोधनक**—न्यायाधीशांनीं या वाटेनें असें यावें. ( चालत पुढें जाऊन ) ही न्यायसभा. आपण आंत प्रवेश करावा. सर्व न्यायसभेंत प्रवेश करतात. )

**न्याया०**—अरे **शोधनका**, बाहेर जाऊन पहा कीं फिर्यादी कोणकोण आले आहेत.

**शोधनक**—आज्ञा. जाऊन पाहतों. ( असें बोलून बाहेर जातो आणि मोठ्यानें हाक मारून विचारतो ) अहो कोणी फिर्यादी आहेत काय ? न्यायाधीश आज्ञा करतात कीं कोण फिर्यादी असतील त्यांनीं आपलीं नावें सांगावीं.

**शकार**—( हर्षपावून ) अरे **न्यायाधीश** आले काय ? डौलानें इकडे तिकडे फिरून. ) अरे **शोधनका न्यायाधीशाला** कळीव कीं राष्ट्रीय राजश्याल वरपुरुष मनुष्य वासुदेवक फिर्यादी आला आहे.

**शोधनक**—( घाबरून ) हाय हाय आज पहिल्यानेंच राजश्यालक फिर्यादी आला काय ! असो, महाराज अमळ उभे रहा, आंत जाऊन **न्यायाधीशांस** कळवितों. ( **न्यायाधीशा**जवळ जाऊन म्ह०) महाराज, आज राजश्यालक **संस्थानक** फिर्याद घेऊन आला आहे. आज्ञा झाल्यास आंत बोलावतों.

**न्याया०**—काय, पहिल्यानेंच आज **राजश्यालक** फिर्याद घेऊन आला आहे काय ? सूर्योदयसमयींच ग्रहण कोणा तरी महा पुरुषाचा घात सुचवितें. **शोधनका**, आज न्यायाचें काम बरोबर चालणार नाहीं. ह्याकरितां बाहेर जाऊन त्याला सांग कीं आज तुझी फिर्याद पाहण्यास अवकाश नाहीं, यासाठीं तूं आज जा उद्यां ये.

**शोधनक**—आज्ञा. याप्रमाणें जाऊन सांगतों. ( बाहेर जाऊन **शकारास** म्हणतो. ) महाराज, **न्यायाधीश** म्हणतात कीं आज तूं जा. कारण कीं तुझी फिर्याद पहावयास आज अवकाश नाहीं.

**शकार**— ( क्रोधाविष्ट होऊन ) काय माझी फिर्याद **न्यायाधीश** आज पहात नाहीं ? कांहीं चिंता नाहीं. जर तो पहात नाहीं, तर माझा मेव्हणा भगिनीपति **पालक** राजा ह्यास विनंती करून तसेंच बहीण आणि माता ह्यांची भीड घालून ह्या **न्यायाधीशाला** काढून दुसरा न्यायाधीश आणवितों पहा. ( असें म्हणून जावयास निघतो. )

**शोधन०**—महाराज, घटकाभर थांबा. तुमचें बोलणें न्यायाधीशास जाऊन सांगतों. ( **न्यायाधीशा**कडे जाऊन ) तो **राजश्यालक** क्रोधाविष्ट होऊन म्हणतो कीं, माझी फिर्याद न्यायाधीशांनीं आज पाहिली नाहीं तर राजाला सांगून दुसरे न्यायाधीश आणीन.

**न्याया०**—ह्या मूर्खाचेठायीं सर्व संभवतें. हा काय नाहीं करणार? असो **शोधनका**,त्याला सांग कीं,आंत ये तुझी फिर्याद पाहतों.

**शोधन॰**—आज्ञा. जाऊन सांगतों. ( **शकाराकडे** जाऊन म्ह॰ ) तुम्हांला न्यायाधीश बोलावतात. तुमची फिर्याद आजच पाहतों म्हणतात. चला.

**शकार**—( मनांत म्ह॰ ) पहिल्यानें म्हणाले पहात नाहीं. मग म्हणतात पाहतों. ह्यावरून **न्यायाधीश** मला भ्याले आहेत खचीत, तर आतां जें मी सांगेन तें सर्व त्यांस खरें मानणें प्राप्त पडेल. असो आतां आंत जावें. ( असें म्हणून आंत जाऊन न्यायाधीशाजवळ बसतो. )

**न्याया॰**—( मनांत म्ह॰ ) अहो फिर्याद करणाऱ्याचें काय धारिष्ट आणि काय वर्तन हें ! ( उघडपणें ) अहो तुम्ही ह्या ठिकाणीं बसा.

**शकार**—ऑ काय म्हणतां ? अहो ही सर्व भूमि माझी आहे. मला पाहिजे तेथें मी बसेन. ( **श्रेष्ठी** कडे पाहून. ) हा मी बसलों पहा. ( **शोधनकास** म्ह॰ ) नाहीं, मी तेथेंच बसेन. ( मग न्यायाधीशाच्या डोकीवर हात ठेवून ) हा मी येथें बसतों पहा. ( असें बोलून खालीं बसतो. )

**न्याया॰**—आपण फिर्यादी आहां काय ?

**शकार**—होय, यांत काय संशय !

**न्याया॰**—काय फिर्याद आहे बोला.

**शकार**—मी तुमच्या कानांत सांगेन. मी मोठ्या अगडबंब कुळांत उत्पन्न झालों आहें. माझा बाप राजाचा सासरा आहे. आणि राजा माझ्या बापाचा जावई आहे. मी राजाचा मेव्हणा आहें, राजाची बायको ती माझी सक्खी बहीण. समजलां !

**न्याया॰**—हें सर्व आहे खरें. परंतु

## आर्या.

उत्तम कुल असलें तरि शीलचि कारण महत्व यायास ॥
विपिनांत बहुत होती कंटकि तरु न करितांहि आयास ॥१०॥

असो तुमचें कोणतें कार्य तें बोला.

**शकार**—मी असें म्हणतों. जरी मीं अपराध केला तरी माझें कोण काय करणार आहे म्हणा. असो. माझा मेव्हणा भगिनीपति पालकराजा ह्यानें संतुष्ट होऊन मला क्रीडावयास म्हणा रक्षावयास म्हणा, कीं छेदावयास म्हणा, सर्व उद्यानामध्यें श्रेष्ठ जें **पुष्पकरंडक**नामक जीर्णोद्यान तें दिलें आहे. तें उद्यान पहावयास, पुष्ट करावयास, शुष्क करावयास, स्वच्छ करावयास, किंवा छिन्न करावयास मी प्रतिदिवशीं जात असतों. तेथें पडलेलें स्त्रीचें मृतशरीर दैवयोगानें पाहतों किंवा नाहीं पाहत. होहो म्यां काल पाहिलें.

**न्याया०**—ती स्त्री कोणाची कोण हें तुम्हांला कांहीं ठाऊक आहे ?

**शकार**—अहो **न्यायाधीश**, ती ठाऊक कशी नाहीं असणार अहो ती ह्या नगरीचें भूषण आणि सुवर्णालंकरांनीं अलंकृत अशी **वसंतसेना** नावाची गणिका कोणी कुपुत्रानें धनलोभास्तव **पुष्पकरंडक** उद्यान शून्य पाहून तेथें नेऊन बलात्कारानें बाहुपाश घालून मारिली. मी नाहीं हो—( असें अर्धें बोलून तोंड झांकतो. )

**न्याया०**—नगरांतील रखवालदारांची फारच सुस्ती ही. अहो **श्रेष्ठी कायस्थ**, "मी नाहीं हो" हेंच व्यवहाराचें प्रथम पदं*. लिहून ठेवा.

**कायस्थ**—आपण आज्ञा कराल तसें. ( तीं अक्षरें लिहितो. ) महाराज लिहून ठेवलीं.

**शकार**—( मनांत म्ह०) काय हें आश्चर्य ! बोलण्याचे घाईनें मी भलतेंच बोलून आपला नाश करून घेतला, असो, आतां संपादणी केली पाहिजे. ( उघडपणें. ) अहो **न्यायाधीश**, मी बोललों तें तुम्ही समजलां नाहीं. मीच पाहिली असें मी बोललों. उगीच गलबल काय करतां. ( असें बोलून तीं अक्षरें पायानें पुसून टाकतो. )

---

* नौकशीचा मुद्दा.

**न्याया०**—धनलोभास्तव बाहुपाशांनीं मारली हें तुम्हांला कशावरून समजलें.

**शकार**—यांत काय कठीण. अहो अलंकार घालण्याचीं जितकीं स्थानें तितकीं सारीं रिकामीं आहेत. यावरून मी तसा तर्क करितों.

**श्रे०का०**—हो हो तसें असलें तर हा तर्क खरा आहे.

**शका०**—( मनांत म्ह० ) दैवानें मला वांचविलें हें मोठें आश्चर्य.

**श्रे०का०**—अहो **न्यायाधीश**, आतां हा खटला कोणावर जाईल बरें.

**न्याया०**—खटल्याचे दोन प्रकार आहेत.

**श्रे०का०**—कोणते दोन प्रकार ?

**न्याया०**—वाक्यानुसारें निर्णय आणि अर्थानुसारें निर्णय. वाक्यानुसारें निर्णय हा वादी प्रतिवादी ह्यांच्या बोलण्यावरून केला पाहिजे. आणि अर्थानुसारें निर्णय तो न्यायाधीशाच्या बुद्धि कौशल्यावर आहे.

**श्रे०का०**—तर मग हा खटला **वसंतसेने**च्या आईकडे जाईल.

**न्याया०**—होय तिजवरच यांत काय संशय. अरे **शोधनका** तूं **वसंतसेने**च्या आईकडे जा, आणि तिला बोलावणे करून न दुखवितां इकडे घेऊन ये.

**शोधन०**—आज्ञा महाराज, जातों. ( असें बोलून बाहेर जाऊन **वसंतसेने**च्या आईला घेऊन येतो. ) म्हातारि, ये इकडून या वाटेनें.

**म्हातारी**–( आपणाशीं ) माझी मुलगी तर यौवन सुखाचा अनुभव घेण्याकरितां आपल्या मित्राच्या घरीं गेली आहे आणि हा बाबा म्हणतो. " चल तुला न्यायाधीश बोलावतात. यावरून मला भय पडलें. कांहीं सुचत नाहीं. माझें ह्रदय थरथर कांपतें. असो काय असेल तें. बाबारे, मला न्यायसभेची वाट दाखीव.

**शोधन०**—बाई, हिकडून ह्या वाटेनें अशी ये. ( पुढें जाऊन ) हीच न्यायसभा. बाई तूं आंत चल ( दोघें आंत जातात. )

**म्हातारी**—( **न्यायाधीशांच्या** पुढें जाऊन म्ह० ) दादांनो तुम्हांला उदंड आयुष्य असो.

**न्याया०**—म्हातारे, ये. आलीस बरें झालें. बैस.

**म्हातारी**—बरें दादांनों. ( असें म्हणून खालीं बसत्ये. )

**शकार**—( तिरस्कार करून ) आली का बुढ्ढी थेर्डी कुंटीण, आली ? ठीक झालें ?

**न्याया०**—म्हातारे, तूं **वसंतसेनेची** आई होय ?

**म्हातारी**—होय महाराज, मी आईच तिची.

**न्याया०**—बरें, या वेळेस **वसंतसेना** कोठें गेली आहे ?

**म्हतारी०**—ती आपल्या मित्राच्या घरास गेली आहे.

**न्याया०**—तिच्या मित्राचें नांव काय ?

**म्हातारी**—( मनांत म्ह० ) हाय हाय ! ही मोठी लाजेची गोष्ट आहे. ( उघडपणें म्ह० ) महाराज, हे लोकांनीं विचारावें, आपणासारख्यांनीं विचारूं नये.

**न्याया०**—येथें लाज कशास पाहिजे. हा न्याय आहे. तोच तुला प्रश्न करितो.

**श्रे०का०**—न्याय प्रश्न करतो यांत कांहीं दोष नाहीं. सांग त्याचें नांव.

**म्हातारी**—हा न्याय आहे काय ? जर न्याय आहे तर सांगत्यें. ऐकावें आपण. माझ्या मुलीचा मित्र कोण म्हणाल तर, **विनयदत्तशेटीचा** नातू, आणि **सागरदत्तशेटीचा** पुत्र, जो जनप्रसिद्ध **चारुदत्तनामा** सावकार तो. त्याचा वाडा माणिक चौकांत सावकारांच्या आळीस आहे. तेथेंच तो राहतो. त्याजकडे माझी कन्या यौवनसुखाचा अनुभव घेण्याकरितां गेली आहे.

**शकार**—( आवेशानें उठून म्ह० ) ऐकलें का हें भाषण सभा-

सदांनीं १ हीं अक्षरें लिहून ठेवा. आतां **चारुदत्तावर** माझी फिर्याद आहे.

**श्रे० का०**—**चारुदत्त** तिचा मित्र आहे यांत कांहीं दोष नाहीं.

**न्याया०**-असो हा खटला **चारुदत्तावर** जातो यांत संशय नाहीं.

**श्रे० का०**—हो असें वाटतें खरें.

**न्याया०**—अरे **धनदत्ता, वसंतसेना चारुदत्ताचे** घरास गेली हीं अक्षरें लिहून ठेव. ह्या खटल्याचा मुख्य मुद्दा हाच. आतां **चारुदत्ताला** बोलावून आणलें पाहिजे. अथवा व्यवहार बोलावतो, आम्हांकडे काय आहे. अरे **शोधनका**, त्या श्रेष्ठ **चारुदत्ताकडे** जा आणि कांहीं कामाकरितां **न्यायाधीश** आपल्या दर्शनाची इच्छा करीत आहेत तर तेथपर्यंत एक वेळ चलावें, असें सांगून घाई नकरितां दुःख न देतां त्याच्या छंदाप्रमाणें सत्कारपूर्वक त्याला घेऊन ये.

**शोधन०**—आज्ञा महाराज, ( असें म्हणून बाहेर जातो, आणि **चारुदत्तास** घेऊन पुन्हा येतो. ) आर्या, इकडून असा ये.

**चारुदत्त**—( मनांत चिंतन करतो. )

## आर्या.

राजास विदित आहे माझें कुलशील तरिहि आव्हान ॥
आलें यावरुनि गमे कीं आतां मज बरी अवस्था न ॥ ११ ॥

( कांहीं तर्क करुन म्ह० )

## श्लोक.

जो काय म्यां बंधन मुक्त केला ॥ यांनामधें घालुनि दूर नेला ॥
तो जाणला चार मुखें नृपानें ॥ नेती मला यास्तव त्या अघानें ॥१२॥

अथवा विचार कशाला पाहिजे. न्यायसभेंत गेलों म्हणजे काय तें समजेल. अरे **शोधनका**, मला न्यायसभेचा मार्ग दाखीव.

---

१ बोलावणें. २ गाडीमध्यें. ३ अपराधामुळें.

**शोधन०**—आर्या हिकडून असा ये. ( असें म्हणून दोघे पुढें जातात. )

**चारु०**—( शंकित होऊन ) दुसरें काय असणार.

### श्लोक.

रुक्षस्वरें वायसे गर्जताती ॥ हे दूत मातें बहु तेर्जताती ॥
सव्याक्षि बाहू फुर फूरताती ॥ हीं दुर्निमित्तें मृति सांगताती ॥१३॥

**शोधन०**—आर्या चारुदत्ता, चल ये लौकर.

**चारु०**—( स्वच्छंदानें सावकाश चालून पुढें पाहून )

### ओव्या.

मजवरी ठेवूनि डोळा ॥ जिव्हा हालवी लळलळा ॥
जो अंजना परीस काळा ॥ शुभ्रदंत चार जया ॥ १४ ॥
पोट फुगवी वारंवार ॥ कुटिल करी आत्म शरीर ॥
ऐसा भुजंग महा थोर ॥ मार्ग रोधूनि निजलासे ॥ १५ ॥

आणखी दुसरें हें.

### श्लोक.

स्खलनें चरणीं होतें ओली नसे जरी ही मही ॥
स्फुरण नयनीं, पावे बाहू अदक्षिण कंपही ॥
शकुनि करिती दुःशब्दानें ह्रदब्ज विदारणा ॥
कथिति मजकीं आहे मृत्यू नसेचि विचारणा ॥ १६ ॥

असो सर्व प्रकारें देवता कल्याण करोत.

**शोधन०**—आर्या चारुदत्ता, हिकडून ये. हीच न्यायसभा. आंत प्रवेश कर.

**चारुदत्त**—( सभेंत प्रवेश करून चोंहो कडे पाहून म्ह० ) काय हो ह्या न्याय सभेची विलक्षण शोभा ही !

---

१ कावळे. २ रागें भरतात. ३ डावाडोळा आणि डावा बाहु. ४ अपशकुन. ५ मरण सुचविती. ६ काजळापेक्षां. ७ पांढरे दांत. ८ वांकडे. ९ सर्प. १० अडखळणें. ११ डावाबाहु. १२ पक्षी. १३ ह्रदयकमलस्फोट.

## ओंव्या.

चिंतासक्त जयांचें त्हदय ॥ ऐसे मंत्री समुदाय ॥
हेंच ज्यांत विपुल तोय ॥ दूत लाटा उसळती ॥ १७ ॥
वार्ता सांगणारे चार ॥ तेच येथें ग्राहमकर ॥
वधनियुक्त अश्व कुंजर ॥ हिंस्र जलचर तेच येथें १८ ॥
नाना अनुवादक पक्षी फिरती ॥ लेखक हे सर्प भासती ॥
नीतितटांतें ढांसळिती ॥ कुतर्कवादी जलौघ हे ॥ १९ ॥
ऐसें राजकीय न्यायागार ॥ हिंस्रक असती जेथ फार ॥
वादि प्रतिवादी यांस भयंकर ॥ समुद्रापरी दिसतसे ॥ २० ॥

( प्रवेशकरतानां डोकें आपटल्या सारखें करून वितर्क करतो.) अरेरे हें काय झालें ! हें आणखी दुसरें.

## श्लोक अनुष्टुप.

डोळा डावाच लवतो काक विक्राळ बोलतो ॥
सापानें रोधिला पंथा दिसे अशुभ सर्वथा ॥ २१ ॥

असो आतां प्रवेश करावा. ( असें म्हणून सभेंत प्रवेश करून **न्यायाधीशाचे** पुढें जातो. )

**न्याया०**-(त्याजकडे पाहून) हाच काय **चारुदत्त**. हा कसा आहे.

## श्लोक.

डोळे विशाल तर नाक हि उंच याचें ॥
हा पात्र होय न अकारण दूषणाचें ॥
लोकांत गोनरतुरंग मतंगजाची ॥
स्वस्वाकृती सदृश वृत्ति असेच साची ॥ २२ ॥

**चारु०**—अधिकाऱ्यांचें कल्याण असो. अहो नियुक्त पुरुषांनों तुमचें कुशल असो.

**न्याया०**—( आदरानें ) आर्या तुझें स्वागत असो. अरे **शोधनका**, ह्या आर्यास बसावयाला आसन दे.

**शोधन०**—आज्ञा. ( त्याला आसन देऊन म्ह० ) हें आसन ह्यावर आपण बसावें.

**चारु॰**—बरें आहे. ( असें म्हणून आसनावर बसतो. )

**शकार**—( क्रोधाविष्ट होऊन ) आलास कायरे स्त्रीघातक्या आलास ? ( गर्वानें म्ह॰ ) वाहवारे न्याय ! वाहवारे व्यवहार ! काय अधर्म हा ! स्त्रीघातक्या अपराध्यास आसन बसावयाला देतात. असो देऊंद्या. पाहतों आतां !

**न्याया॰**—आर्या **चारुदत्ता**, हिच्या लेंकी बरोबर तुझी मैत्री, प्रीति, स्नेह, ओळख कांहीं आहे काय ?

**चारु॰**—कोणाच्या ?

**न्याया॰**—ह्या म्हातारीच्या. ( असें म्हणून **वसंतसेनेच्या** आईकडे बोट दाखवितो. )

**चारु॰**—(म्हातारीला पाहून उठतो.) आर्यें तुला अभिवंदन करतों.

**म्हातारी**—वत्सा, तुला उदंड आयुष्य असो. ( मनांत म्ह॰ ) हाच तो **चारुदत्त**. ज्याला माझ्या मुलीनें आपलें नवयौवन अर्पिलें.

**न्याया॰**—आर्या, ती गणिका तुझी मित्र आहे काय ?

**चारु॰**—( लाजल्यासारखें करतो. )

**शकार**—लाजेनें किंवा भयानें आपलें दुष्ट कर्म आच्छादित करतोस ? द्रव्यलोभास्तव स्वतां स्त्रीचा वध करून आतां मौन धरतोस काय ? हा **राजश्याल** तसें करणारा नव्हे.

**श्रे॰का॰**—आर्या **चारुदत्ता**, हा न्याय आहे. येथें लज्जा काय कामाची. सांग काय असेल तें.

**चारु॰**—( सलज्ज होऊन ) अहो अधिकाऱ्यांनो, ती गणिका माझी मैत्रीण आहे असें म्यां कसें बोलावें ? अथवा हा यौवनाकडे अपराध, चारित्र्याकडे काय आहे.

**न्याया॰**—येथें ब्राह्मण सभासद आहेत. अधर्म शंका मनांत आणूं नको.

आर्या.

रे हा व्यवहार असे लाज मनांतील सोड तूं निपट ॥

सत्यचि वद धैर्य धरीं येथें नचलेचि अन्यकृत कपट ॥ २३ ॥
लज्जा सोडून दे. हा व्यवहार तुला प्रश्न करतो.

**चारु०**—अहो **न्यायाधीश**, माझा कोणा बरोबर व्यवहार आहे, मजवर फिर्यादी कोण ?

**शकार**—अरे माझ्या बरोबर आहे. मी फिर्यादी.

**चारु०**—तुझ्या बरोबर माझा व्यवहार दुर्घट आहे.

**शकार**—अरे स्त्रीघातक्या, सुवर्णरत्नमय अलंकारांनीं भूषिता जी गणिका **वसंतसेना** तिला धनलोभानें मारून आतां कपटानें साधूचें सोंग घेऊन छपवितोस काय ?

**चारु०**—काय भलतेंच बोलतोस हें ?

**न्याया०**—आर्या **चारुदत्ता**, असूंदे, त्याशीं कशाला बोलतोस ? आम्ही विचारतों तें सांग. ती गणिका तुझी मित्र आहे कीं नाहीं ?

**चारु०**—होय आहे खरी.

**न्याया०**—बरें तर, आतां ती **वसंतसेना** कोठें आहे !

**चारु०**—ती आपल्या घरास गेली.

**श्रे० का०**—ती घरास कशी गेली, केव्हां गेली, तिच्या बरोबर कोण होतें सांग.

**चारु०**—( मनांत म्ह० ) ती लपून छपून गेली म्हणून सांगूं कीं काय सांगूं. ( विचार करीत उगीच बसतो. )

**श्रे० का०**—आर्या सांग सांग लौकर.

**चारु०**—घरास गेली इतकें मी जाणतों. दुसरें माझ्यानें सांगवत नाहीं.

**शकार**—अरे, माझ्या **पुष्पकरंडक**नामक जीर्णोद्यानांत तिला नेऊन धनलोभास्तव बलात्कारानें बाहुपाश घालून जिवें मारून टाकिलें. आणि आतां ती घरास गेली असा बाहणा करतोस काय ?

**चारु०**—आ : असंबद्धभाषण करणाऱ्या. तुझ्या तोंडाकडे पाहून

मला संशय येतो. कांकीं, गुप्तपणें खोटें कर्म करणाऱ्या प्रमाणें तुझे ओंठ काळे दिसतात. आणि हेमंत ऋतूंतल्या कमळाप्रमाणें तुझें तोंड निस्तेज दिसतें.

**न्याया०**—( एकीकडे वळून. )

आर्या.

मेरूचें तुलन[१] जसें जैसें भुजतरण कीं समुद्राचें ॥
कीं धैर्षण[२] वायूचें तैसें दूषण हि **चारुदत्ताचें** ॥ २४ ॥

(उघडपणें) हा श्रेठ **चारुदत्त** असें दुष्ट कर्म कसें करील.

**शकार**—हा न्याय पक्षपातानें होत आहे बरें ?

**न्याया०**—( रागावून ) चल एकीकडेहो मूर्खा. असें बोलवयास तुला शंका वाटत नाहीं काय ?

साक्या.

वेदार्थातें वदतां नीचा कशि तव जीभ न झडली ॥
मध्यान्हीं सूर्यातें बघतां दृष्टि कशी न बिघडली ॥ २५ ॥
दीप्त ज्वलनीं[३] हात घालितां नाहीं कसा जळाला ॥
दोष लावितांहि **चारुदत्ता** देह तुझा न गळाला[४] ॥ २६ ॥

श्रेष्ठ **चारुदत्त** अकार्य कसें करील ?

श्लोक.

ज्याणें करोनि उदधी जलमात्र शेष ॥
दानें जनांसि निरपेक्ष दिलीं विशेष ॥
जो नित्य धर्मरत आणि दयाळू ऐसा ॥
द्रव्यार्थ तो करिल पातक सांग कैसा ॥ २७ ॥

**शकार**—पक्षपातानें न्याय होत आहे बरें.

**म्हातारी**—अरे दुष्टा, ज्यानें ठेव म्हणून ठेवलेला सुवर्णालंकार चोरांनीं नेला, त्या कारणानें त्याचे मोबदला चतुःसमुद्रसारभूत रत्नमाला दिली तो यासमयीं धनलोभास्तव असें अकार्य करील काय ? कोणाचें कर्म असेल तें असो.

---

१ वजन. २ धरणें. ३ पेटलेल्या अग्नींत. ४ कसा पडला नाहीं.

हाय हाय! अगे माझे लाडके मुली! कोठें गेलीस? ये लौकर. (असें म्हणून रडूं लागते.)

**न्याया०**—आर्या **चारुदत्ता**, ती पायांनीं गेली किंवा गाडींत बसून गेली?

**चारु०**—खरें विचाराल तर माझ्या देखत गेली नाहीं. म्हणून पायांनीं किंवा गाडींत गेली हें माझ्यानें सांगवत नाहीं.

(इतक्यांत क्रोधावलेला **वीरक** येतो.)

**वीरक**—(आपणाशीं बोलतो.)

## आर्या.

ताडुनि पदप्रहारें त्यानें माझी विमानना केली॥
त्या संतापामध्यें ही माझी रात्र कशि तरी गेली॥ २८॥

तर आतां मी न्यायसभेंत जातों. (सभेंत जाऊन) मी सर्व अधिकाऱ्यांस प्रणाम करतों.

**न्याया०**—कोण हा, नगर रक्षकांचा नायक **वीरक**? **वीरका** इकडे येणें कां केलें?

**वीरक**—ऐका सांगतों. **आर्यक** बंदिशाळेंतून बंधन तोडून पळाला. त्याला मी सोधीत असतां एक झांकलेली गाडी चालली होती. ही कोणाची कोणीकडे जाते असा विचार पूस करीत असतां तूंच पाहणार कोण मी ही गाडी पाहीन असा तंटा करून **चंदनकानें** मला लाथा मारल्या हा त्यानें माझा अपराध केला. तो तुम्हांस कळविला. यावर काय करावयाचें तें तुम्ही पहा.

**न्याया०**—बरें ती गाडी कोणाची होती हें कांहीं तुला समजलें?

**वीरक**—ह्या **चारुदत्ताची** गाडी. कशावरून म्हणाल तर. तो गाडीवान म्हणाला कीं ही **चारुदत्ताची** गाडी. आंत **वसंतसेना** बसून **पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत** क्रीडावयास जात आहे.

**शकार**—अहो हें पुन्हा ऐकून घ्या. यावरून माझें बोलणें खरें कीं खोटें तुमच्या ध्यानांत आलेंच असेल.

**न्याया०**—( मनांत म्ह० )

### आर्या.

ह्या निर्मल चंद्रातें ग्रासाया येथ राहु हा होय ॥
तट ढांसळतां ओघीं निर्मल ही कलुष होतसे तोय ॥ २९ ॥

**वीरका**, तुझा न्याय मागाहून पाहूं. अगोदर तूं बाहेर दरवाज्यापुढें घोडा सिद्ध आहे त्यावर बसून **पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत** जाऊन पहा कीं कोणी स्त्री तेथें मृत होऊन पडली आहे कीं नाहीं.

**वीरक**—बरें आहे जातों. ( असें म्हणून बाहेर गेला आणि लौकर माघारा आला. ) मी **जीर्णोद्यानांत** जाऊन पाहिलें. तेथें एक स्त्रीचें कलेवर पडलें आहे. पण तें श्वापदांनी खालें आहे.

**न्याया०**--पण तें स्त्रीचेंच कलेवर असें तुला कशावरून समजलें!

**वीरक**--तेथें केश आणि हातपाय तुटून पडले आहेत. त्यावरून म्यां जाणलें.

**न्याया०**--अहो लोकांच्या दुर्वर्तनास धिक्कार असो.

### श्लोक.

जसा जसा पूर्ण विचार होतो ॥ तसा तसा दोष दिसोन येतो ॥
बरी नव्हे ही व्यवहार वृत्ती ॥ पंकस्थ गोशी मति खिन्न होती॥३०॥

**चारुद**०—( आपल्या मनांत म्ह० )

### श्लोक.

होतां विकास पहिल्या समयीं फुलातें ॥
येती जसे मधुप सार लुटावयातें ॥
दैवेंचि होय पुरुषास विपत्ति जेव्हां ॥
पाहूनि छिद्र बहु येति अनर्थ तेव्हां ॥ ३१ ॥

**न्याया०**—आर्या **चारुदत्ता**, आतां खरें सांग. राजश्याल **संस्थानक** म्हणतो ही गोष्ट तुजपासून घडली कीं नाहीं ?

**चारु०**—आतां येथें म्यां काय बोलावें ? राजश्यालक संस्थान-

च्या बोलण्यावरून तुम्हीं मला म्हणतां कीं, ही गोष्ट तुजपासून घडली कीं नाहीं. पण विचार करा.

आर्या.

जो दुष्टात्मा घातक ज्याच्या वाणींत किमपि सत्य नसे ॥
त्या पुरुषाचें वाक्य ग्राह्य नव्हे तें विचारणीय असे ॥ ३२ ॥

आणखी सांगतों.

श्लोक.

पुष्पार्थ म्यां कधिंहि पुष्पयुता लतेला ॥
ओढोनियां कुसुमसंचय नाहिं केला ॥
तो मी कसा धरुनि केश सुदीर्घ[1] काळे ॥
द्रव्यार्थ मारिन बळें रडत्या सुबाळे[2] ॥ ३३ ॥

**शकार**—कायहो अधिकाऱ्यांनों, अद्यापि तुम्ही पक्षपातानें न्याय चालवितां. हा **चारुदत्त** धडधडीत दोषी असतां त्याला तुम्ही आसनावर बसूं देतां हें काय ?

**न्याया०**—अरे **शोधनका**, तसें कां करोनास. ( **शोधनक चारुदत्तास** आसनावरून खालीं उतरायास सांगतो. )

**चारु०**—विचार करा बरें, अधिकाऱ्यांनो, विचार करा. ( असें बोलून आसनावरून उतरून खालीं बसतो. )

**शकार**—( मनांत हर्ष पावून नाचतो. ) वाहवा ? म्यां केलेलें पाप दुसऱ्याच्या डोकीवर कसें पडलें पहा ! तर आतां ज्या आसना वर **चारुदत्त** बसला होता त्या आसना वर मी बसतों. ( तसें करतो. ) अरे **चारुदत्ता**, मज कडे पहा तर खरा. आणि मीच मारली असें बोल. बोलतोस कीं नाहीं ?

**चारु०**—अहो अधिकाऱ्यांनो, विचार करा. ( जो दुष्टात्मा घातक इत्यादि पूर्वोक्त आर्या ह्मणतो. मग श्वासोश्वास टाकून मनांत म्ह० )

---

[1] लांब आणि काळे असे केंस धरून. [2] रोदनकरणारी उत्तम बारखी तीन.

श्लोक.

मित्रा[1] कसे व्यसन हें मजलागिं आलें ॥
जाये[2] तुझें जनन शुद्ध कुळांत झालें ॥
हा रोहसेन[3] नच पाहसि मद्विपत्ती ॥
पाहून हो तव न दुःखित चित्तवृत्ती

(चिंतन करून म्ह० ) **वसंतसेने** कडील वर्तमान जाणावयास म्यां **मैत्रेयाला** तिज कडे पाठविलें आहे. आणि मुलास गाडी करतां म्हणून जे सुवर्णालंकार तिनें दिले होते तेही तिचे तिला परत नेऊन देण्यासाठीं त्याच्या स्वाधीन केले आहेत. तो अजून कां येत नाहीं. इतका उशीर त्याला कां लागला समजत नाहीं !

( इतक्यांत अलंकारांची गांठोडी काखेंस मारून **विदूषक** येतो. )

**विदूषक**—माझा मित्र आर्य **चारुदत्त** ह्यानें मला **वसंतसेने**-कडे पाठविलें आहे. तो मला म्हणाला, अरे मित्रा **मैत्रेया**, माझा पुत्र **रोहसेन** रडूं लागला म्हणून **वसंतसेनेनें** त्याच्या अंगावर अलंकार घालून त्यास त्याच्या आईकडे पाठविलें. ते अलंकार माघारे घेऊंनयेत असा जरी तिचा अभिप्राय आहे, तरी मला तिचे अलंकार कशाला पाहिजेत ? हे तिचे तिला नेऊन परत दे असें बोलून माझ्या हातीं हे अलंकार दिले आहेत. यासाठीं हे अलंकार घेऊन मी **वसंतसेनेकडे** जातों. (असें बोलून इकडे तिकडे फिरून आकाशाकडे कान देऊन म्हणतो. ) कोण हा, **रेभिल** काय. अरे **रेभिला**, तूं कशाकरितां उद्विग्नचित्त दिसतोस सांग. ( उत्तर ऐकलेसें करून ) काय ह्मणतोस ! माझा मित्र **चारुदत्त** न्यायाधिशांनीं

---

१ हे मैत्रेया. आतां माझ्या मागें तूं संभाळ असा अर्थ. २ हे स्त्रिये, तूं कुलीन आहेस. तदनुसारच बर्तशील. ३ हे पुत्रा रोहसेना. तूं दुःख मानूं नको.

बोलावणें पाठवून न्यायसभेस नेला. असें म्हणतोस काय ? तर मग ह्याचें कांहीं मोठेंच कारण असेल ( विचार करून ) असो वसंतसेनेकडे मग जाईन. अगोदर न्यायसभेकडे जाऊन मित्राचा समाचार घेतला पाहिचे. ( पुढें जाऊन पाहून म्हणतो. ) हिच न्याय सभा. इज मध्यें प्रवेश करावा. ( सभेंत प्रवेश करून ) अधिकाऱ्यांनो तुमचें कुशल असो. अहो, माझा मित्र **चारुदत्त** कोठें आहे ?

**न्याया॰**—तो बसला आहे पहा.

**विदू॰**—मित्रा कुशल आहे ना ?

**चारु॰**—झालें तर होईल.

**विदू॰**—क्षेम तरी ?

**चारु॰**—तेंही तसेंच.

**विदूष॰**—अरे मित्रा, तूं अगदीं उद्विग्न झाल्यासारखा दिसतोस याचें कारण काय ? आणि तुला येथें बोलावणें कां केलें ?

**चारु॰**—मित्रा काय सांगू ?

## आर्या.

म्यां स्पष्टनृशंसानें न मनीं परलोकभीति धरित्यानें ॥
मत्यक्षर तीचस्त्री,-बोलावें यापुढील तें त्यानें ॥ ३५ ॥

**विदू॰**—काय काय ?

**चारु॰**—( कानांत ) याया प्रमाणें.

**विदू॰**—कोण असें ह्मणतो ?

**चारु॰**—( खुणेंनें **शकाराकडे** बोट करून ) हे राजश्री कृतांतस्वरूप अनुवादक होऊन बोलतात. माझी अशी दशा होण्याला हेच कारण आहेत.

**विदू॰**—( एकीकडे तोंड करून ) अरे ती आपल्या घरास गेली असें कां तूं बोलत नाहींस ?

**चारु॰**—मी बोललों, पण माझें ऐकतो कोण. दैव फिरलें म्हणजे सर्व फिरतें.

विदू०—( उभा राहून म्ह० ) अहो अधिकाऱ्यांनो, तुम्ही सुज्ञ आहां. म्या बोलून दाखवावे असें नाहीं. अहो ज्या पुरुषानें लोकोपकारार्थ आणि धर्मार्थ पुष्कळ ठिकाणीं पेंठा, बागा, देवालयें, तळीं, विहिरी, इत्यादि धर्मकृत्यें करून ह्या **उज्जयनी** नगरीला शोभा आणली, आणि ज्यानें उदारपणें बहुतांस विपुल धनदानें दिलीं, तो पुरुष सांप्रत दरिद्री असमर्थ झाला म्हणून धनलोभानें असें भलतेंच कर्म करील काय? हें तुम्हांला खरें कसें वाटतें? (क्रोधानें **शकारास** म्ह०) अरे कुलटा पुत्रा, रे राजश्यालका, **संस्थानका**, रे सज्जन दूषका, रे दोषभांडा? आंगा वर सोन्याचे दागिनें घालून मर्कटा सारखा नटून प्रतिष्ठा मिरवितोस काय? बोल बोल माझ्या पुढें फिरून. अरे हा माझा प्रिय सखा **चारुदत्त** किती दयाळू आहे, किती उदार आहे, किती निस्पृह आहे, याची योग्यता तुला माकडाला काय ठाऊक! अरे जो लतेचें पान तुटेल या भयानें पुष्पांकरितां हीं लतेला ओढून वांकवित नाहीं, तो असें उभय लोकविरुद्ध अकार्य कसें करील? अशा पुरुषावर तूं तुफान घेतोस, तर थांब, तुझ्या त्दयासारख्या ह्या कुटिल दंडानें तुझा मस्तक शतखंड करतों.

**शकार**—( क्रोधाविष्ट होऊन ) ऐकाहो तुम्ही **न्यायाधीश** ऐका. **चारुदत्ता** बरोबर माझा वाद किंवा व्यवहार चालला असतां हा दुष्टबटुक मध्यें बोलणार कोण? आणि हा माझा मस्तक शतखंड करतो काय? अरे दासीपुत्रा, दुष्ट बटुका, थांब तुझी खोड मोडतों.

**विदू०**—( हातीं दंडकाष्ठ घेऊन पहिल्याप्रमाणें बोलतो )

**शकार**—( क्रोधानें उठून त्यास ताडन करतो. )

**विदू०**—( उलटून **शकारास** ताडन करतो. )

(दोघे एकमेकांशीं मारामारी करितात अशासंधीस **विदूषकाच्या** काखेंतून अलंकारांची गांठोडी खालीं पडत्ये. )

**शकार**—( ते अलंकार उचलून घेतो आणि पाहून म्ह० ) पहा-
हो हा मुद्दा. हेच त्या बिचाऱ्या गणिकेचे अलंकार. ह्यानें आपल्या सोबत्या पाशीं दिले. ह्याच अलंकारांच्या लोभास्तव ती बिचारी ह्याजकडून मारली गेली.

( सर्व अधिकारी तें पाहून खालीं तोंडें घालून बसतात. )

**चारु०**—( एकीकडे तोंड करून. ) यासमयीं हें कसें झालें ?

## आर्या.

नच यावा परि आला भूषणसमुदाय याच वेळांत ॥
तो दुर्दैवें पडला पाडील मलाहि शोक जाळांत ॥ ३६ ॥

**विदू०**—मित्रा मागें झालेला सर्व खरा वृत्तांत कां सांगत नाहींस ?

**चारु०**—मित्रा, काय सांगून फळ ?

## आर्या.

दुर्बल चक्षु नृपतिचें शक्त नतें तत्त्वदर्शनीं जेथें ॥
वक्तयास दैन्य केवळ किंवा अश्लाघ्य मरण बा तेथें ॥ ३७ ॥

**न्याया०**—अरेरे ही फार वाईट गोष्ट झाली.

## ओंवी.

मंगळाची वक्रगती ॥ क्षीण झाला बृहस्पती ॥
तेथें धूमकेतू पार्श्ववर्ती ॥ तेंवि हा ग्रह उद्भवला ॥ ३८ ॥

**श्रे०का०**—( वसंतसेनेच्या आईला हाक मारून म्ह० ) म्हा-
तारे, तुझें लक्ष्य हिकडे आहे ना ? हे दागिने पहा. हे तुझ्या मुलीचे आहेत कीं नाहींत ओळख.

**म्हातारी**—( दागिन्यां कडे पाहून ) त्यांसारखे दिसतात खरे पण ते नव्हत-

**शकार**—ऑ—थेरडे कुंटिणी. डोळ्यांनीं बोलतेस तशी वाचेनें पाहत नाहींस.

**म्हातारी**—मोठा शहाणा, हो पलीकडे.

**श्रे०का०**—बाई, पुरतें पाहून विचार करुन बोल. तेच हे दागिने होत कीं नव्हत.

**म्हातारी**—महाराज. कारागिरांची कुशलता दृष्टीला भ्रांति देते. त्यांसारखे दिसतात पण ते नव्हत.

**न्याया०**—तर हे दागिनें कोणाचे, तूं ओळखत्येस ?

**म्हातारी**—महाराज मीं सांगितलेंच आहे कीं ते नव्हत. कारागीर लोकांनीं तसे घडले असतील. कोणाचे म्हणून मी सांगूं ?

**न्याया०**—हे **श्रेष्ठी**, हे **कायस्थ**, म्हातारी म्हणत्ये तेंहो खरें आहे; वस्तू सारख्या वस्तू असतात.

श्लोक.

वस्तूच्या दिसतात तुल्य बहुशा वस्त्वंतरीं[1] आकृती ॥
अन्याची कृति पाहुनी करिति ते शिल्पी[2] तशाही कृती ॥
वस्तूकृत्रिम[3] पाहतां मनिं गमे ती हीच कीं दूसरी ॥
शिल्पीची कृतहस्तता[4] करितसे भ्रांती मनाला खरी ॥ ३९ ॥

**श्रे० का०**—हे **चारुदत्ता**, हे दागिनें तुजकरतां केलेले, तुझे आहेत ?

**चारु०**—नाहीं नाहीं.

**श्रे०का०**—तर कोणाचे हे ?

**चारु०**—येथें जी म्हातारी बसली आहे तिच्या कन्येचे.

**श्रे०का०**—तर मग हे तिजपासून वेगळे कसे झाले ?

**चारु०**—कसे वेगळे झाले तें सांगतों ऐकावें असे झाले.

**श्रे०का०**—आर्या **चारुदत्ता**, आतां सत्य असेल तेंच बोल. पहा तुला ठाऊकच आहे कीं,

आर्या.

सत्यानें सुख मिळतें सत्य त्यजिल्यास होतसे पाप ॥
सत्यास असत्याचें[5] झांकण पडतांच होय बहु ताप ॥ ४० ॥

**चारु०**—होय ठाऊक आहे. म्हणूनच सांगतों. हे दागिनें तिच्या आंगावर केव्हां होते आणि केव्हां वियुक्त झाले हें सांगवत नाहीं. पण सध्यां माझ्या घरापासून आले इतकें मी जाणतों.

---

१ अन्य वस्तूवर. २ कारागीर. ३ केलेली. ४ कारागीरी. ५ विरुद्ध भाषण.

**शकार**—प्रथम जीर्णोद्यानांत तिला नेऊन मारतोस, तिच्या आं-गावरचे दागिने काढून घेतोस, आणि आतां कपटानें साधु-पणाचा डौल करून आंगापासून केव्हा वियुक्त झाले हें मा-झ्यानें सांगवत नाहीं अशी छपावणी करतोस काय ? तुला ठाऊक नाहीं तर हे तुझ्या घरीं कसेरे आले सांग.

**न्याया०**—आर्या **चारुदत्ता**, खरें असेल तेंच सांग.

आर्या.

रे कर्कशा[1] कशौं[2] ह्या आतांच विनिश्चयें दयारहित[3] ॥
पडतिल तव सुकुमारीं देहीं अस्मन्मनोरथासहित[4] ॥ ४१ ॥

**चारुदत्त**—होणारा पुढें उपाय नाहीं.

आर्या.

मी शुद्ध कुळीं झालों मजमध्यें पाप लेशही नाहीं ॥
लावाल बळें जरि तें तरि शक्ति तुम्हांपुढें नसे कांहीं ॥ ४२ ॥

( मनांत म्ह० ) आतां **वसंतसेने** विरहित वांचून मला का-य करावयाचें आहे ? हा प्रिये कोठें गेलीस !
( उघडपणें ) अहो आतां फार काय सांगूं ?

आर्या.

ज्यां स्पष्ट नृशंसानें चित्तीं लोकद्वया न धरित्यानें ॥
जी साक्षाद्रति ती स्त्री,-बोलावें पुढिल काय तें त्यानें॥४३॥

**शकार**—मी बोलतों. मारली. अरे तूं आपल्या तोंडानें बोल कीं मी मारली.

**चारुद०**—तें त्वांच बोलावें.

**शकार**—( टाळी वाजवून ) ऐका ऐका. अहो सर्व अधिका-ऱ्यांनो, यानें मारली हें याच्याच बोलण्यावरून सिद्ध झालें. आतां ह्या दरिद्र **चारुदत्ताच्या** शरीरास दंड करावयाचा असेल तो आपण करावा.

---

१ तीक्ष्ण. २ चाबूक. ३ निर्दयपणानें. ४ आमचे मनोरथही पडती-ल म्हणजे तुझ्या कल्याणाविषयीं इच्छा नष्ट होतील.

**न्याया०**—अरे **शोधनका**, राजश्याल बोलतो त्याप्रमाणें केलें पाहिजे. अरे राजदूतांनो, धरा ह्या **चारुदत्ताला** आणि बांधा. ( राजदूत तसें करतात. )

**ह्यातारी**—अहो महाराज, अहो **न्यायाधीश**, प्रसन्न व्हा, कृपा करा. अहो **वसंतसेनेची** ठेव चोरांनीं नेली असतां ती ज्यानें भरून दिली तो पुरुष असें अकार्य करणार नाहीं. माझी मुलगी कोणीही मारली तरी मारलीच. तिचें आयुष्य संपलें म्हणोन, परंतु हा श्रेष्ठ पुरुष दीर्घकाळ वांचावा. आणखी विनंती करतें कीं न्याय हा वादी प्रतिवादी यांचा आहे. तर माझा कांहीं दावा ह्या पुरुषावर नाहीं. यासाठीं आपण याला सोडावें.

**शकार**—अगे गर्भदासी कुंटिणी दूर हो, निघ येथून तुझा याचा काय संबंध आहे. याशीं तुला काय करायाचें आहे ?

**न्याया०**—बाई, हें बोलून कांहीं उपयोग नाहीं. आतां तूं जा. अरे राजदूतांनो ह्याला बाहेर काढा.

**ह्यातारी**—हा बाळा, पुत्रका, हा सत्पुरुषा, हा श्रेष्ठा, **चारुदत्ता** असा तुझा परिणाम व्हावा काय ? हायहाय ! ( असें बोलून रडत रडत निघून जात्ये. )

**शकार**—( मनांत म्हणतो. ) मला जें कर्तव्य होतें तें मी माझ्या सारखें केलें आतां जातों.

( असें बोलून निघून जातो. )

**न्याया०**—आर्या **चारुदत्ता**, हा राजाच्या घरचा व्यवहार आहे. न्याय करणें आम्हां कडे, पुढची गोष्ट राजा कडे आहे. तथापि अरे **शोधनका पालक** राजास आमची विज्ञापना सांग कीं.

## आर्या.

जरि हा द्विज अपराधी तरि मनुवचनावरून न वधावा ॥
हा ह्या राष्ट्रापासुनि सविभवसकुटुंब घालवुनि द्यावा ॥

**शोधन०**— आज्ञे प्रमाणें महाराजांस कळवितों. ( असें बोलून जातो आणि पुन्हा माघारा येऊन डोळ्यांस पाणी आणून सांगतों. ) महाराज, मी आपल्या आज्ञे प्रमाणें मजकुर कळविला, परंतु **पालक** महाराज आज्ञा करतात कीं, द्रव्य लोभास्तव ज्यानें स्त्री मारली तो ब्राह्मण जरी आहे तरी त्याच्या गळ्यांत तीं आभरणें बांधून त्याची धिंड काढून ज्या ठिकाणीं **वसंतसेना** त्यानें मारली त्या ठिकाणीं त्याला मार देऊन दक्षिण श्मशानांत तो सुळावर चढवावा. किंवा त्याचा शिरच्छेद करावा आणि जो कोणी असा अपराध करील त्याला या प्रमाणेंच शासन होईल असें सर्वांस प्रसिद्ध करावें.

**चारु०**— काय हो अविवेक ! **पालक** राजाला कांहींच विचार नाहीं. अथवा त्याकडे काय दोष.

ओंवी.

ऐशिया व्यवहारगर्तीं[1] ॥ मंत्री[2] पाडिती जयांप्रती ॥
सहजचि ते महीपती[3] ॥ अवलंबिती अविचारा ॥ ४४ ॥

आणखी

ओंवी.

ऐसे मंत्री श्वेतकाक[4] ॥ राजशासनाचे दूषक[5] ॥
यांच्या हातें अपातक[6] ॥ असंख्य मारिले जातात ॥ ४५ ॥

( खेदाचा सुसकारा टाकून )

सखे **मैत्रेया,** जा अगोदर माझ्या मातेला माझा प्रणाम सांग, तिला पुत्रशोक नबाधे असें कर, आणि माझ्या स्त्रीला फार फार विचारलें आहे असें सांगून माझा पुत्र **रोहसेन** लहान आहे त्याचें प्रतिपालन कर.

**विदू०**— मूळ तुटल्यावर वृक्षाचें प्रतिपालन कोठून होणार

**चारु०**— मित्रा, असें म्हणूं नको.

---

१ याच्या खांचेंत. २ कारभारी. ३ राजेलोक. ४ पांढरे कावळे. ५ राजाच्या कायद्यास दोष आणणारे. ६ निरपराधजन्य.

आर्या.

पुत्रपित्याची प्रतिमा दीपदिव्याचा असें असे नातें ॥
मजवरि जो स्नेह तुझा दावावा तोच **रोहसेनातें** ॥ ४६ ॥

**विदू०**—हे मित्रा, तूं माझा प्रियकर सखा. तुझें अदर्शन झाल्यावर तुझ्यावांचून मी प्राणधारण कसें करीन?

**चारु०**—मित्रा, तूं काय म्हणशील तें म्हण. परंतु माझ्या बाळा **रोहसेनाला** तरी आणून मला एक वेळ दाखीव.

**विदू०**—बरें आहे इतकें करतों. (असें म्हणून जातो.)

**न्याया०**— अरे **शोधनका**, ह्या अपराध्याला दूर एकीकडे ने.

**शोध०**— आज्ञा. ( म्हणून तसें करतो. )

**न्याया०**— कोण आहेरे तिकडे ! मांगाला आज्ञा द्या कीं, **चारुदत्ताला** घेऊन जा, आणि राजाज्ञेप्रमाणें करा. ) असें म्हणून **चारुदत्ताला** चांडाळांच्या स्वाधीन करून **न्यायाधीश** उठून जातात. )

**शोधन०**— श्रेष्ठ **चारुदत्ता**, ये इकडे माझ्यामागून.

**चारु०**— ( करुणायुक्त होऊन ) मित्रा **मैत्रेया**,

आर्या.

नच यावापरि आला भूषणसमुदाय याच वेळांत ॥
तो दुर्दैवें पडला पाडील मलाहि दुःखजाळांत ॥

( आकाशाकडे पाहून )

श्लोक.

विषसलिलतुलाग्नी ह्यांस आर्धी शरीर ॥
करवति मग द्यावें सोडूनी हा विचार ॥
मज रिपुवचनानें मारिशी ब्राह्मणातें ॥
कुलसह नरकीं तूं पाडिशी आपणातें ॥ ४७ ॥
हा मी आलों बरें.

असें झाल्यावर सर्व निघून जातात. )

**॥ व्यवहार नामक नवम अंक समाप्त ॥**

# मृच्छकटिक नाटक.

## अंक १०.

स्थळ.

दक्षिण श्मशान इत्यादि.

पात्रें.

| | |
|---|---|
| चांडाल.··· ······· | वधकरणारे मांग. |
| चारुदत्त.············ | सावकाराचा मुलगा. |
| विदूषक············· | चारुदत्ताचा मित्र. |
| मुलगा बालक. रोहसेन.·· | चारुदत्ताचा पुत्र. |
| स्थावरक.·· ···· ·· ·· | शकाराचा चाकर. |
| सर्वजण.············ | गांवचे लोक. |
| भिक्षु.·············· | शाक्यश्रमण संन्यासी. |
| वसंतसेना.·· ····· ···· | कलावतिणीची मुलगी. |
| शर्विलक.············ | पूर्वीचा घरफोड्या चोर. |
| चंदनक.········ ······ | शिपायांचा नाईक. |
| धूता.·· ············ | चारुदत्ताची स्त्री. |
| रदनिका.·········· · | चारुदत्ताची दासी. |
| शकार.·············· | राजश्याल संस्थानक. |

# मृच्छकटिक नाटक.

## अंक १०.

### प्रारंभ.

( तदनंतर दोन चांडाल बरोबर असून **चारुदत्त** येतो. )

**दोघे चांडाल**—( लोकांस उद्देशून म्हणतात. )

### आर्या.

काय तुम्हांतें नकळे कारण आम्ही नवीन वधनिपुण ॥
सत्वर शीर्षच्छेदन शूलारोपणहि हे प्रशस्तगुण ॥ १ ॥

दूरव्हा, पौरजन हो दूर व्हा. हा श्रेष्ठ **चारुदत्त**, ह्याच्या गळ्यांत कण्हेर पुष्पांच्या माळा घालून वधस्थाना कडे चालविला आहे. आम्हां वध्य पुरुषांच्या समागमानें हा तेल सरलेल्या दीपा प्रमाणें प्रतिक्षणीं क्षीणायु होत आहे.

**चारुद०**—( विषाद पावून. )

### दिंड्या.

नयनसलिलें भीजलें आंग माझें ॥
मसणमाळांचें असे गळां ओझें ॥ २ ॥
रक्तगंधें माखिलें शरीरातें ॥
बली ऐसें तर्किती काक मातें ॥ ३ ॥

**चांडाल**—दूर व्हा लोकांनो, दूर व्हा. पाहतां काय ?

### ओंव्या.

जो सुजन पक्ष्यांचा निवास ॥
ज्याला कीर्तिपुष्पांचा सुवास ॥
लागलीं उपकार फळें जयास ॥

---

१ हे आम्हांमध्यें चांगले गुण आहेत. २ वधसमयींच्या पुष्पमाळांचें. ३ हा काकबलिच काय असा तर्क कावळे करून भक्षावयास पाहतात.

जो शोभा नगरोद्यानाची ॥ ४ ॥
ऐशा सज्जन महातरू प्रती ॥
घेऊन तीक्ष्ण कुठार हातीं ॥
काल पुरुष खंडितो निश्चिती ॥
काय पाहतां पुरजनहो ॥ ५ ॥
चल **चारुदत्ता**, चल इकडे ये:

**चारु०**—( मनांत म्ह० ) पुरुष भाग्याचे व्यापार अचिंतनीय आहेत. कांकीं, आज मी अशा दशेप्रत प्राप्त झालों. "दैवी विचित्रा गतिः" असें जें म्हणतात तें खोटें नव्हे.

**ओंवी.**

सर्व गात्रावरी पहिले ॥ रक्तचंदनाचे हात थापिले ॥
रक्तचूर्णवरी घातलें ॥ पशू केलें मज पुरुषा ॥ ६ ॥
( पुढें पाहून म्ह० ) काय हो नरांचें तारतम्य हें !
( करुणायुक्त होऊन म्ह० )

**साक्या.**

पाहुन माझी विपत्ति हे जन दुःखसागरीं पडती ॥
मर्त्यत्वाला धिक्कार असो ऐसें बोलुनि रडती ॥ ७ ॥
रक्षाया मजशक्त न होतां करिती मातें प्रणती ॥
पाव सुखें स्वर्गाला ऐसें पौर सर्वही म्हणती ॥ ८ ॥

**चांडाल**—दूर व्हा जनांनो, दूर व्हा. काय पाहता ?

**ओंवी.**

इंद्रधनु आणि गो प्रसूती ॥ नक्षत्रांची अधोगती ॥
सत्पुरुषाची प्राणविपत्ती ॥ पाहूंनयेत हीं चार ॥ ९ ॥

**एक चांडाल**—( दुसऱ्यास म्ह० ) अरे गड्या पहा पहा.

**आर्या.**

केला बद्ध कृतांतें होता दीना जनास जो थारा[२] ॥
रडतें म्हणुनि गगन हें, किंवा पडती अनभ्र[३] या गारा ॥ १० ॥

---

१ गुलाल. २ आश्रय. ३ अभ्रावांचून गारा पडतात काय.

**दुसरा चांडाल**—( पहिल्यास म्ह० ) अरे तसें नव्हे ऐक.

आर्या.

नाहीं रडत गगन हें नाहींत अनभ्र पडत ही गारा ॥
महिला समूहमेघापासुनि नयनांबुच्या पडति धारा ॥ ११ ॥

आणखी पहा चमत्कार.

आर्या.

हा वध्य नेत असतां जन रडती फार, करिति तन्मना ॥
नयनोदकार्द्र रेणू मार्गापासोनि घे न उन्मना ॥ १२ ॥

**चारु०**—( वर पाहून करुणायुक्त होत्साता म्ह० )

श्लोक.

सौधांतरीं बैसुनि रम्यजाती ॥
स्त्रिया गवाक्षांतुनि पाहताती ॥
हा **चारुदत्ता** म्हणती मला ह्या ॥
कीं भाजल्या अंतरिं जेंवि लाह्या ॥ १३ ॥

**चांडाल**—**चारुदत्ता**, ये इकडे. येथें उभा रहा. ( सोबत्यास म्ह० ) हा चव्हाटा आहे. दवंडी पिटण्याचें हेंच ठिकाण. तूं मोठ्यानें अपराध बोल मी दवंडी वाजवितों.

**दुसरा चांडाल**—( मोठ्यानें ओरडून बोलतो. ) ऐका हो लोकांनो ऐका. हा **विनयदत्त शेटीचा** नातू, आणि **सागरदत्त-शेटीचा** पुत्र, ह्याचें नांव श्रेष्ठ **चारुदत्त**. हा अन्याय करणारा आहे. ह्यानें **उज्जनी** नगरांतील नामांकित जी गणिका **वसंतसेना** ती धनलोभास्तव **पुष्पकरंडकनामक** शून्य जीर्णोद्यानांत नेऊन बळात्कारानें बाहुपाशांनीं बद्ध करून जिवें मारली. त्याचा हा मुद्दा सांपडला आहे, आणि हा स्वतां कबूलही झाला आहे. म्हणून **पालक** राजानें याला मारण्या विषयीं आज्ञा केली आहे. जर दुसरा कोणी असें

उभयलोक विरुद्ध अकार्य करील तर त्यालाही **पालकराजा** हेंच शासन देईल.

**चारु०**—( खिन्न होऊन मनांत म्ह० ) हाय हाय काय दैव हें !

## दिंडया.

यज्ञकर्मीं विख्यात गोत्र माझें ॥
असे विप्रांहीं योग्य वदाया जें ॥
मरणसमयीं तें नीच बोलताती ॥
दुष्कृताचा संबंध लाविताती ॥ १५ ॥

( वर पाहून कानांत बोटें घालून करुणायुक्त म्ह० )

हरहर ! प्रिये **वसंतसेने**, तुला मी असें करीन काय !

## श्लोक.

गे विद्रुमोष्ठी[1] शशि[2] शुभ्रदंती ॥
केला[3] गतीनें जित मत्तदंती ॥
पिवोनि त्यां[4] त्वद्वदनामृतातें ॥
पिईन कैसा अयशोविषातें ॥ १६ ॥

**दोघे चांडाल**—दूर व्हा जनांनो दूर व्हा. काय पाहतां ?

## आर्या.

हा गुणरत्ननिधि[5] जना उतराया दुःख सागरीं सेतू ॥
हा नगरीचें भूषण तिजपासुनि काढिती विजयहेतू[6] ॥

आणखी असें आहे.

## आर्या.

सुखसंस्थित[7] पुरुषांची चिंता सर्वांचिया मनांत वसे ॥
दुःखग्रस्त[8] नराचा प्रियकर्ता या जगांत कोणी[9] असे ॥ १८ ॥

**चारु०**—( चोहोंकडे पाहून. )

---

१ पोंवळ्या सारखे आरक्त जिचें ओंठ. २ चंद्रासारखे शुभ्रवर्ण जिचें दांत ३ जिनें आपल्या गतीनें मत्त हत्ती जिंकला. ४ त्या तुझें वदनामृत पिऊन. ५ गुण रत्नाची खाण. ६ कीर्तिकर नगरभूषण. ७ सुखांत राहणारे. ८ दुःखांत पडलेल्या. ९ असा पुरुष विरळ हा भाव.

## श्लोक.

माझे सखे झांकुनियां मुखातें ॥
जातात दूरूनि बघोनि मातें ॥
होती बहू मित्र सुखस्थिताला ॥
न मित्र कोणी विषमस्थिताला ॥ १९ ॥

**चांडाल०**—लोकांची दाटी मोडली, राजमार्ग मोकळा झाला. आतां वध्यचिन्हांनीं चिन्हित हा **चारुदत्त** पुढें चालवावा. अरे **चारुदत्ता** हूं चाल लौकर.

**चारु०**—( निश्वास टाकून म्ह० )

## पूर्वोक्त श्लोक.

मित्रा कसें व्यसन हें मजलागिं आलें ॥
जाये तुझें जनन शुद्ध कुळांत झालें ॥
हा **रोहसेन** नच पाहसि मद्विपत्ती ॥
पाहून हो तव न दुःखित चित्तवृत्ती ॥

( इतक्यांत पडद्यांतून शब्द होतो. ) हा तात ! हा पिता ? हा प्रिय वयस्या !

**चारु०**—तो शब्द ऐकून करुणायुक्त होत्साता म्ह० ) अहो चांडालहो, तुम्ही स्वजातिमहत्तर आहां. तुम्हांपासून यासमयीं कांहीं प्रतिग्रह करण्यास मी इच्छितों.

**चांडाल**—काय आमच्या हातापासून तूं प्रतिग्रह इच्छितोस ?

**चारु०**—शिवशिव, प्रतिग्रह कशाचा. कांहीं मागणें आहे. **पालक** राजा सारखे तुम्ही अविचारी नव्हे. म्हणून तुम्हांला मी प्रार्थना करतों कीं मी परलोकास जाण्याचे पूर्वी मला एकवेळ माझ्या पुत्राचें मुख पाहूंद्या.

**चांडाल**—बरें. तसें कर पाहिजे तर. (पडद्यांत पुन्हां शब्द होतो ! ) हा तात, हा पिता ! हा प्रियवयस्या.

**चारु०**—( तो शब्द ऐकून करुणायुक्त होत्साता म्ह० ) आहो मे-

हेऱ्यांनो, मला एकवेळ माझ्या पुत्राचें मुख पाहूं द्या. ह्या दारींतून माझ्यानें जाववत नाहीं.

**चांडाल**—अहो बहुजनहो, क्षणमात्र एकीकडे होऊन वाट सोडा. ह्या **चारुदत्ताला** आपल्या पुत्राचें मुख पाहूं द्या. (पडद्याकडे तोंडकरून ) अरे आर्या इकडे ये, अरे मुला पुढेंये. आपल्या बापाला भेट दे. ( इतक्यांत मुलास घेऊन **विदूषक** येतो. )

**विदू०**—अरे भद्रमुखा **रोहसेना**, चालरे बाळा लौकर. तो पहा तुझा पिता मारावयास चालविला आहे.

**मुलगा**—हा तात, हा पित्या, कुठें चाललास ?

**विदू०**—हे प्रियवयस्या आतां मी तुला कुठें पाहूं ?

**चारु०**—(पुत्र आणि मित्रांस पाहून म्हणतो.) हा पुत्रा **रोहसेना**, हा मित्रा **मैत्रेया**, (असें बोलून दुःखानें म्ह०) काय कष्ट हे !

## आर्या

चिरकाल हि परलोकीं नाहीं शमणार आमची तान ॥
कीं अत्यल्पची आम्हां मिळणार आतां निवापजलदान[1] ॥२०॥

या समयीं मी पुत्राला काय देऊं ? ( आपणाकडे अवलोकन करून यज्ञोपवीत पाहून म्ह० ) हां येवढें हें माझें सत्तेचें आहे

## श्लोक.

सोन्या मोत्या विणें हेंच ब्राम्हणाचें विभुषण ॥
देवांला पितरांलाही ज्याच्यानें भाग पावतो ॥ २१ ॥

( असें म्हणून यज्ञोपवित काढून पुत्रास देतो. )

**एक चांडाल**—येरे **चारुदत्ता**, ये इकडे लौकर.

**दुसराचांडाल**—अरे ह्या श्रेष्ठ **चारुदत्ताला** उपपदरहित नांवानें हाक मारतोस हें काय ? अरे पहा.

## आर्या

उत्कर्षी अपकर्षी रात्रीं दिवसास ही अकुंठगती ॥

---

१ तर्पणोदक.

देखावया परीक्षा जाते पुरुषाकडे सदानियंती[1] ॥ २२ ॥

आणखी सांगतों तुला.

### आर्या.

मारावयास नेतों तरि सत्कारावयास योग्य असे ॥
राहुमुखीं पडला तरी विधु काय जनास वंदनीय नसे ॥ २३॥

**बालक**—अरे, अरे चांडालांनो माझ्या बाबाला कोणीकडे नेतां सांगा.

**चारु**—वत्सा, मी सांगतों.

### श्लोक.

कंठीं माझ्या घालुनी पुष्पमाळा ॥
आणि स्कंधीं स्थापुनी लोहशूळा ॥
घातस्थानीं बांधुनी नेति मातें ॥
यज्ञामध्यें जेंवि त्या बोकडातें ॥२४ ॥

**चांडाल**—अरे बालका, ऐक.

### आर्या.

आम्हीं चांडाल नव्हों कर्मानें जातिमात्र चांडाळ ॥
जे साधूतें छळिती ते पापी सत्य तेच चांडाल ॥ २६ ॥

**बालक**—तर मग माझ्या बापाला मारतां कां ?

**चांडाल**—लेंकरा, तुला दीर्घ आयुष्य असो. अरे बाळा, राजाची आज्ञा तुझ्या पित्यास मारत्ये. आम्ही मारित नाहीं.

**बालक**—अहो दादांनो, मला मारा, आणि माझ्या बाबाला सोडा.

**चांडाल** ( गहिंवरून ) मुला, कशींरे हीं अक्षरें तुझ्या तोंडांतून आलीं ? लेंकरा, असें बोलणारा तूं चिरकाळ वांच; माझ्या प्राणसख्या.

**चारु०**—( डोळयांत अश्रु आणून पुत्राच्या गळ्याला मिठी मारून म्ह० )

---

1 दैव.

### श्लोक.

हेंच तें स्नेह सर्वस्व राजारंकासही सम ॥
चंदनाहुनिही शीत त्दद्याचें विलेपन ॥ २७ ॥

( कंठीं माझ्या घालून पुष्पमाळा इत्यादि पूर्वोक्त श्लोक पुन्हा म्हणतो. इकडे तिकडे पाहून. मनांत, माझे सखे झांकुनियां मुखातें इत्यादि पूर्वोक्त श्लोक पुन्हा ह्मणतो )

**विदू०**—अरे दादांनो, माझा प्रियमित्र **चारुदत्त** याला सोडा आणि त्याचे जागीं मला मारा.

**चारु०**—शिवशिव. असें बोलूं नको. ( पाहून मनांत. पाहून माझी विपत्ति हे जन इ० पूर्वोक्त म्हणून, उघडपणें; सौधांतरीं बैसुनि रम्यजाती इत्यादि पूर्वोक्त श्लोक पुन्हा म्हणतो. )

**चांडाल**—चला जनांनो एकीकडे व्हा. एकीकडे व्हा.

### आर्या.

काय पहातां दैवें झाला हा साधु नष्टजीवाश[1] ॥
होतो जसा कनक[2] घट कूपीं सोडोनि खंडितां पाश[3] ॥ २८ ॥

**चारु०**—( करुणायुक्त होऊन म्ह० ) ( गे विद्रुमोष्ठी शशिशुभ्रदंती इत्यादि पूर्वोक्त श्लोक पुन्हा म्ह० )

**दुसरा चांडाल**—अरे पुन्हा ओरडून बोल. मी दौंडी वाजवितों.

**पहिला चांडाल**—( पूर्वी प्रमाणें ओरडून बोलतो. )

**चारु०**—( दुःखित होऊन म्ह० )

### श्लोक.

आली दशा विषम[4] काय वदूं मुखानें ॥
नाहीं क्षती[5] मरण येइल यो सुखानें ॥
मार्गात ओरडूनि लावूनि[6] कर्म खोटें ॥
त्वां मारिली[7] म्हणति हें मज दुःख मोठें ॥ २९ ॥

---

१ वांचण्याची आशा ज्याची नष्ट झाली. २ सुवर्ण कुंभ ३ दोर. ४ संकटाची ५ हानि. ६ आरोपून. ७ बसंतसेना मारली.

( इतक्यांत प्रासादांत बद्ध केलेला **स्थावरक** चेट येतो.

**स्थावरक**—( खिडकी वाटे दौंडीचा शब्द ऐकतो आणि दुःखित होऊन बोलतो. ) काय हो हें आश्चर्य ! त्या बिचाऱ्या **चारुदत्ता** कडे तिळमात्र अपराध नसतां त्याला मारतात ! धन्यानें माझ्या पायांत बिडी घालून मला उगीच अडकावून टाकलें आहे. यामुळें उपाय नाहीं. आतां काय करावें ? असो आतां मोठ्यानें ओरडतों म्हणजे लोक ऐकतील तरी. ऐका हो सर्व लोक ऐका. गाडीची अदलाबदल झाल्यामुळें म्यां दुष्टानें **वसंतसेना पुष्पकरंडक** जीर्णोद्यानांत नेली. तेथें माझा धणी राजश्याल **संस्थानक** होता, त्यानें, तूं मला वश होत नाहींस तर मी तुला मारतों, असें म्हणून बलात्कारानें बाहुपाशेंकरून **वसंतसेनेला** ओढून ती ठार मारली. **चारुदत्तानें** मारली नाहीं. हें मला पक्कें ठाऊक आहे.—काय, लोक फार दूर आहेत म्हणून कोणी माझें बोलणें ऐकत नाहीं. आतां कोणता उपाय करावा ? ( अंमळ चिंतन करून. ) ह्या प्रासादावरून खालीं उडी घालूं काय ? हो खरेंच जर म्यां असें केलें तर **चारुदत्त** वांचेल. असो, ह्या प्रासादाच्या मोडक्या खिडकींतून खालीं गल्लींत उडी टाकतों. मी मेलोंतर बलाय गेली. पण हा बहुतांचा पोशिंदा **चारुदत्त** मरूं नये. अशा निमित्तानें मी मेलों तर परलोक मिळवीन. असें बोलून खालीं उडी टाकतो, अहो हें आश्चर्य झालें ! मी मेलों नाहीं. माझ्या पायांतली बिडी मात्र तुटली ! आतां ते चांडाल काय बोलतात तें पाहतों, ( पाहून जवळ जाऊन ) अहो चांडालहो, थांबा मला येऊं द्या. अरे दूरव्हा, एकीकडे व्हा. मला जाऊं द्या.

**चांडाल**—अरे दूरव्हा, एकीकडे व्हा असें कोण म्हणतो ह्या ?

**स्थावर०**—मी **स्थावरक** चेट आहें. ऐका माझें बोलणें, ( असें म्हणून पहिल्याप्रमाणें पाढा वाचतो. )

**चारु०**—पाहून ! काय हें आश्चर्य !

आर्या.

हा कोण अशा समयीं, मी सांपडतांच काळपाशाला ॥
शेत अनावृष्टीनें सुकतांच द्रोणं मेघसा आला ॥ २९ ॥

अहो तुम्हीं सर्वांनीं हें ऐकलेंना ?

आर्या.

मरणास भीत नाहीं झाली मत्कीर्ति दूषिता बाहे ॥
हें दुःख, विशुद्धाला मज मृत्युहि पुत्रजन्मसम आहे ॥ ३० ॥

आणखी आर्या.

जो क्षुद्र अल्पबुद्धी जो वैर मशीं करावया सजला ॥
विषलिप्त शरें तैसें दूषियलें त्याच दूषितें मजला ॥ ३१ ॥

**चांडाल**—अरे **स्थावरका**, हें तूं खरें बोलतोस ?

**स्थावर॰**—होय, खरे बोलतों. हें वर्तमान मी कोणापाशीं बोलेन या भयानेंच माझ्या धण्यानें मला पायांत बिडी घालून तिसऱ्या मजल्यावर कोंडून ठेविलें होतें.

( इतक्यांत **शकार** येतो. )

**शकार**—( हर्षयुक्त होऊन म्ह॰ ) वाहवा. काय मौज.

श्लोक.

आम्लतिक्त मृगमांस आयतें ॥
शाकसूप सह मत्स्य रायतें ॥
भक्ष्य भोज्य नव पेय रक्षिलें ॥
आपुल्या घरिंच सर्व भक्षिलें ॥ ३२ ॥

( कानोसा घेऊन ) आँ- कांशाच्या तुकड्याच्या नादाप्रमाणें खणखणीत असा चांडालांचा शब्द ऐकूं येतो. कोणाची धिंड काढल्या प्रमाणें वध्य पुरुषाच्या दोषांचा उच्चार आणि दौंडीचा ध्वनिही ऐकूं येत आहे. यावरून मी असा तर्क करतों कीं त्या दरिद्र **चारुदत्ताला** वधस्थानाकडे नेत आहेत. बरेंच झालें. ती मौज मी जाऊन पाहीन. शत्रूचा

१ विपुल वृष्टि करणारा मेघ.

विनाश पाहून माझ्या त्दयाला मोठा आनंद होतो म्यां ऐकलें आहे कीं शत्रूला मारतांना जो पाहतो त्याला जन्मांतरीं नेत्ररोग होत नाहीं. मी तर विषांतल्या किड्याप्रमाणें छिद्र पाहून त्या दरिद्र **चारुदत्ताचा** विनाश उत्पन्न केला. आतां आपल्या वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावर चढून खिडकींत बसून आपला प्रताप पाहीन. ( वर जाऊन पाहून तर्क करतो. ) हा भिकारी **चारुदत्त** मारावयास नेत असतां त्याला पहावयास लोकांची इतकी दाटी झाली. मग आम्हा सारख्या श्रेष्ठ मनुष्यास मारावयास नेलें तर त्यावेळेस किती दाटी होईल बरे ! कसाहा नव्या तरण्या बैलासारखा सजवून दक्षिण दिशेकडे नेत आहेत ! अहो माझ्या वाड्याच्या रस्त्यावर दौंडी बंदका पडली ? तिचें कोणीं निवारण केलें काय ? अहो येथें **स्थावरक** चेट होता तोही कोठें दिसत नाहीं. कदाचित् त्यानें पळून जाऊन आमची मसलत फोडली तर नसेलना ? तो रांडलेक कोणीकडे गेला त्याचा शोध केला पाहिजे. त्या धिंडीच्या समाजांत जावें म्हणजे शोध लागेल. ( असें म्हणून माडी खालीं उतरून त्यांच्या जवळ जातो. )

**स्थावरक**—( पाहून ) धनीसाहेब आपण आलां का ? अहो हाच तो आला पहा.

**चांडाल**—( **शकारास** पाहून )

## आर्या.

सोडा मार्ग मुके व्हा द्वारें लावा सराच एकिकडे ॥
अविनयतीक्ष्णशृंगी मत्तबलीवर्द येतसे इकडे ॥ ३३ ॥

**शकार**—अरे अरे वाट सोडा, एकीकडे व्हा. ( जवळ जाऊन **स्थावरकास** पाहून म्ह० ) अरे पुत्रका, **स्थावरका**, चेटा येथें कशाला आलास ? चल आपण जाऊं.

**स्थावर०**—अरे अनार्या निर्दया, त्या **वसंतसेनेचा** प्राण घेऊन ही तूं संतुष्ट झाला नाहींस काय ? आणि सांप्रतकाळीं

सज्जनाचा कल्पतरु जो आर्य **चारुदत्त** त्याला मारविण्याचा प्रयत्न करतोस. तुला पुढचें भय वाटत नाहीं काय ?

**शकार**—नाहीं नाहीं. मी रत्नकुंभासारखा श्रेष्ठ असून स्त्रीला मारीन काय ? अशी गोष्ट घडणार नाहीं. तुम्ही याचें काय खरें मानतां. त्यानेंच मारली.

**सर्वजण**—नाहीं, **चारुदत्तानें** नाहीं मारली. तुम्हींच मारली

**शकार**—कोण सांगतो.

**सर्वजण**—( **स्थावरकाकडे** हातकरून ) हा साधु पुरुष सांगतो.

**शकार**—( मनांत दचकून एकीकडे होतो ) हें असें कसें झालें ! हा **स्थावरक** चेट येथें कसा आला ! याला मीं बळकट बांधून टाकलें नव्हतें काय ? हा गुलाम माझ्या दुष्कर्मांचा साक्षी आहे खरा. यानेंच मसलत फोडली. असो, आतां दुसरी युक्ति योजली पाहिजे. ( चिंतन करून उघडपणें म्ह० ) अहो जनहो, हा खोटें बोलतो. यानें माझ्या घरचे सोनें चोरलें, म्हणून मी याला धरून बांधून खूब मार दिला, त्या द्वेषामुळें हा असें बोलतो. याचें बोलणें काय तुम्ही खरें मानतां ? एकीकडे वळून हातांतील सोन्याचें कडें काढून **चेटाला** देऊन म्ह० ) अरे **स्थावरका**. पुत्रका, **चेटा**, तूं माझा असून असें काय करतोस ? हें कडें घे आणि गोष्ट फिरवून बोल.

**स्थावर०**—( कडें हातीं घेऊन ) पहाहो सारेजण. हा मला सोन्याचा लोभ दाखवून दुसरें बोलावयास सांगतो.

**शकार**—( **चेटाच्या** हातून कडें हिसकावून घेऊन ) अहो हेंच तें सोनें, जें यानें चोरलें. यासाठींच मीं याला बांधून मार दिला तो. ( सक्रोध होऊन ) अहो चांडाल हो मी आपलें सोन्याचें भांडार ह्याच्या स्वाधीन केलें होतें, त्यांतील सोनें यानें चोरलें म्हणून मी याला मार दिला, हें तुम्हांला खरें वाटत नसेल तर प्रत्यक्ष याची पाठ पहा.

**चांडाल—स्थावरकाची** पाठ उघडी करून पाहतात. ) अहो

खरेंच. याच्या पाठीवर मारल्याचें वळ आहेत खरे. यावरून याचें बोलणें खरें मानतां येत नाहीं. राजश्याल सांगतो हेंच खरें. चला.

**स्थावरक**—हाय हाय! असा हा दासपणा निकृष्ट आहेना? का त्याचें खरेंही भाषण कोणाला खरें वाटत नाहीं. असो. दैवा पुढें उपाय कोणाचा? ( करुणायुक्त होऊन **चारुदत्तास** म्ह० ) आर्या **चारुदत्ता**, माझा प्रयत्न काय तो इतकाच. ( असें म्हणून त्याच्या पायांवर डोकी ठेवतो. )

**चारुद**०—( करुणायुक्त होऊन म्ह० )

श्लोक.

रेऊठ साधुजनरक्षक हे दयाळा ॥
झालासि तूं सहज बांधव धर्मशीळा ॥
केला तुवां बहुत यत्न मला सुटाया ॥
दैवास तो न मत यास्तव होय वाया ॥ ३४ ॥

**चांडाल**—अहो ह्या **स्थावरकाला** मार देऊन घालवून द्या.

**शकार**—( **चेटाला** ) चलहो एकीकडे लुच्चा. ( त्याला दूर ढकलून देऊन चांडालांस म्ह० ) अरे चांडालांनो आतां उशीर कां करतां? याला मारा लौकर.

**चांडाल**—तुम्हांला घाई असेल तर तुम्हीं स्वतां मारा याला.

**बालक**—अहो चांडाल तुम्ही मला मारा आणि माझ्या बाबाला सोडा.

**शकार**—अहो, पुत्रासुद्धां याला मारून टाका कसे.

**चारु**०—हा मूर्ख काय नाहीं करणार. याला सर्व कांहीं संभवतें. तर, अरे माझ्या लाडक्या लेंकरा **रोहसेना**, आतां तूं आपल्या आईकडे जा, बरें.

**बाळक**—आतां मला जाऊन काय करावयाचें आहे.

**चारु**०—( दयायुक्त होऊन म्ह० )

साकी.

जा जा वत्सा स्वगृहा सत्वर देखाया निजमाता ॥
मद्दोषें मत्सम दुरवस्था होऊ तुझी न ताता ॥ ३५ ॥

यासाठीं हे मित्रा **मैत्रेया**, ह्या मुलाला घेऊन तूं आतां येथून निघून जा.

**विदूषक**— हे प्रियवयस्या, त्वां असें जाणलें ना ? कीं, मी तुझ्या वांचून प्राण धारण करीन.

**चारु०**— मित्रा, तुझें जीवित तुझ्या स्वाधीन आहे. तर उगीच प्राणत्याग करणे तुला योग्य नाहीं.

**विदू०**— ( आपणाशींच बोलतो. ) ही गोष्ट खरी आहे. तथापि माझ्या प्रियमित्राचे मागेंभी प्राण धरण्यास समर्थ नाहीं. या साठीं हा मुलगा ह्याच्या आईच्या स्वाधीन करून, मग प्राणांचा परित्याग करून मित्राच्या मागोमाग मी त्याला भेटावयास जाईन. ( उघडपणें म्ह० ) मित्रा या बाळाला मी घेऊन जातो. ( असें बोलून **चारुदत्ताच्या** गळ्यास मिठी मारून पायांवर डोकी ठेवतो. ) ( मुलगाही रडत रडत पायांवर पडतो. )

**शकार**—अरे मी तुम्हांला सांगतों कीं पोरासुद्धां **चारुदत्ताला** मारा म्हणून. मग तुम्हीं तसें कां करीत नाहीं.

**चांडाल**—बाबारे, तूं म्हणतोस ; पण आम्हांला राजाज्ञा तशी नाहीं, कीं पुत्रासुद्धां **चारुदत्ताला** मारावें. तस्मात् मुला तूं आतां निघून जा लौकर.

( मुलास घेऊन **विदूषक** निघून जातो. )

**चांडाल**—दौंडी वाजविण्याचें हें तिसरें ठिकाण. येथें टिमकी वाजवा. ( एकजण पहिल्या प्रमाणें मोठ्यानें बोलतो आणि एकजण टिमकी वाजवितो. )

**शकार**—( मनांत म्ह० ) अजून पौरजनांस खरे वाटत नाहीं

---

१ दुर्दशा. २ हे बालका.

( उघडपणें ) अरे भिकाऱ्या **चारुदत्ता**, अजून लोकांस खरें वाटत नाहीं, याजकरितां तूं आपल्या जिभेनें म्हण कीं मीं **वसंतसेना** मारली.

**चारु॰**—( उगीच राहतो, कांहीं बोलत नाहीं. )

**शकार**—अरे चांडाल वृषभांनो, हा भिकारी **चारुदत्त** मीं सांगितल्या प्रमाणें बोलत नाहीं तर तुम्हीं ह्याच्या पाठीवर चाबुकाचे फटकारे मारून ह्याजकडून बोलवा.

**चांडाल**—( चाबूक उगारून म्ह॰ ) बोलरे **चारुदत्ता** बोल. मीं मारली असें म्हण.

**चारुद॰**—( करुणायुक्त होऊन म्ह॰ )

## दिंड्या.

पावलों मी या दुःख सागरातें ॥
खेद त्याचा किमपिही नसे मातें ॥ ३६ ॥
दुःख मोठें हें मला वदूं कैसें ॥
मारिली म्यां प्रियसखी आज ऐसें ॥ ३६ ॥

**शकार**—( पुन्हा तसेंच करतो. )

**चारुद॰**—अहो पुरजनहो, ऐका. ( पूर्वोक्त आर्या म्ह॰ ) म्यां.

## आर्या.

स्पष्ट नृशंसानें चित्तीं लोकद्वया न धरित्यानें ॥
जी साक्षाद्रति ती स्त्री बोलावें पुढिल काय तें त्यानें ॥

**शकार**—मारली, हेंचना ? मारली.

**चारुद॰**—बरें, तसेंच असो.

**एक चां॰**—( दुसऱ्यास म्ह॰ ) अरे ही तुझी वधाची पाळी आहे.

**दुसरा चां॰**—नाहीं नाहीं. तुझीच आहे.

**पहिला चां॰**—बरें तर आपण चिठ्या टाकूं. ( दोघे चिठ्या टाकून तिसऱ्या कडून उचलवितात. )

**दुसरा चां॰**—अरे तुझें नांव आलें. तुझीच पाळी.

**पहिला चां०**—अरे जर माझी पाळी आहे तर मला दोन घटका थांबलें पाहिजे.

**दुसरा चां०**—कशासाठीं ?

**पहिला चां०**—माझा बाप मरूं लागला त्यावेळेस त्यानें मला सांगितलें आहे कीं, अरे पुत्रा **वीरका**, वधकरण्याची पाळी तुज वर आली असतां एकाएकीं वध करीत जाऊं नको.

**दुसरा चां०**—यांचें काय कारण ?

**पहिला चां०**—कारण हेंच कीं, कोणी साधु पुरुष द्रव्य देऊन वध्याला सोडवितो. कदाचित् राजाला पुत्रलाभ झाला तर राजाच त्या पुत्रोत्सवांत सर्व वध्य सोडून देतो. एखादे वेळेस मत्त हस्ती सुटला, तर त्या गडबडींत वध्य मुक्त होतो, किंवा एकादे वेळेस राज्याची उलटा पालट झाली तर सारेच बंदीवान् मुक्त होतात. असें आहे म्हणून कांहीं वेळ वाट पाहिली पाहिजे.

**शकार**—काय म्हणतोस ? राज्याची उलटा पालट ?

**चांडाल०**-अरे हा उगीच तर्क आहे. असें कधीं कोठें झालें असेल.

**शकार**—अरे आतां **चारुदत्ताला** लौकर मारा बरें. ( असें बोलून **स्थावरक** चेटाला घेऊन एकीकडे जातो. )

**चांडाल**--आर्या **चारुदत्ता**, राजाज्ञा तुला मारत्ये. आह्मी चांडाल मारीत नाहीं. आतां तुला कोणाचें स्मरण करावयाचें असलें तर कर.

**चारुद०**—यासमयीं धर्मावांचून कोणाचें स्मरण करूं ?

श्लोक.

माझा असेल जरि धर्म सखा न जावो ॥
दुष्टासही मज अशा समयास पावो ॥
येवोनियां प्रियसखी मजलागिं तारो ॥
माझा कलंक मज पासुनि दूर सारो ॥ ३७ ॥

आहो चांडाल हो, आतां मी कोणीकडे जाऊं सांगा ?

**चांडाल**—( अग्र भागा कडे दाखवून म्ह० ) अरे पहा हें दक्षिण श्मशान दिसत आहें. ज्याला पाहून वध्य पुरुष भयानें प्राण सोडतात. पहा.

## ओवी.

अर्धें कलेवर शूलशिरीं ॥ अर्ध लोंबतसे भूमीवरी ॥
कोल्हे लांडगे एके सरी ॥ ओढिताती खावया ॥ ३८ ॥

**चारुद०**—हाय हाय ! मी मंदभाग्य आतां मेलों खचीत !

( असें म्हणून दुःखानें श्मशानांत प्रवेश करतो. )

**शकार**—मी जाणार होतों पण जात नाहीं. **चारुदत्ताला** कसें मारतात तें पाहतों. ( इकडे तिकडे फिरून पुढें पाहून म्ह० ) काय हा **चारुदत्त** खालीं बसला ?

**चांडाल**—अरे **चारुदत्ता**, भ्यालास काय़रे ?

**चारु०**—( झटकर उठून ) हा मूर्खहो,

पूर्वोक्त आर्या म्हणतो.

मरणास भीत नाहीं झाली मम कीर्ति दूषिता बाहे ॥
हें दुःख, विशुद्धाला मज मृत्युहि पुत्रजन्मसम आहे ॥

**चांडाल**—आर्या **चारुदत्ता**, अरे गगनांगणांत वास करणारे चंद्र सूर्य ही विपत्ति पावतात. मग मरणधर्मे मनुष्य यांचो कथा काय ! लोकां मध्यें जो चढतो तोच पडतो, आणि जो पडतो तोच उठतो असें चाललेंच आहे. असें मनांत आणून आतां त्या गोष्टींचा खेद करूं नको. धैर्य धर. अहो हें दौंडी पिटण्याचें चवथें ठिकाण. बोला मोठ्यानें ( पुन्हा पहिल्याप्रमाणें मोठ्यानें. ओरडून बोलतात. )

**चारु०**—(दुःखानें) हा प्रिये **वसंतसेने**, मी असे करीन कायगे !

( पूर्वोक्त श्लोक पुन्हा म्ह० )

गे विद्रुमोष्ठी शशिशुभ्रदंती ॥
केलागतीनें जितमत्तदंती ॥

पिवोनियां त्वद्वदनामृतातें ॥
पिईन कैसा अयशोविषातें ॥ ३९ ॥

---

( इतक्यांत **वसंतसेना** आणि **भिक्षु** उभयतां गडबडीनें येतात. )

**भिक्षु**—वाहवा ! चालतांना श्रांत झालेली **वसंतसेना** मी संभाळून नेत आहें, हा मजवर ह्या आश्रमानें अनुग्रहच केला हे उपासिके, कोणीकडे तुला मी नेऊं सांग.

**वसंतसेना**—आर्या त्या श्रेष्ठ **चारुदत्ताच्याच** घरीं मला ने. चंद्राच्या दर्शनानें कमलिनीस जसा आनंद होतो तसा त्याच्या दर्शनानें मला होऊं दे.

**भिक्षु**—( मनांत म्ह० ) आतां कोणत्या मार्गानें जावें ? ( चिंतनकरून ) राजमार्गानेंच जावें हें बरें. अगे उपासिके, इकडून ह्या राजमार्गानें समोर चल ( ऐकून म्ह० ) पुढें राजमार्गांत हा मोठा कलकलाट ऐकूं येतो हें काय आहे ?

**वसंत०**—( पुढें पाहून हा पुढें लोकांचा समाज मिळाला आहे हें काय आहे ? आर्या **भिक्षो**, आपणाला इकडून मार्ग मिळेल काय ? हें काय आहे समजत नाहीं. शोध कर बरें. **उज्जयनी** नगरींतील सर्व लोक पृथ्वीच्या एका भागीं मिळाले आहेत, तेणेंकरून नौकेप्रमाणें पृथ्वी एके आंगीं भाराक्रांत झाली अशी दिसते.

**भिक्षु**—थांब मी शोध करतों.

**चांडाल**—अरे हें दौंडी पिटण्याचें शेवटचें ठिकाण. येथें टिमकी वाजवा आणि ओरडून बोला. ( पुन्हा पहिल्या प्रमाणें करतात ) अरे **चारुदत्ता**, आतां तुझें मरण जवळ आलें.

**चारु०**—देवतांची इच्छा. हे भगवती देवते !

**भिक्षु**—(ऐकून घाबरतो.) अगे उपासिके चल लौकर. **चारुदत्तानें** तूं मारलीस म्हणून **चारुदत्ताला** मारावयास नेत आहेत.

**वसंतसे०**—( घाबरी होऊन ) हाय हाय ! काय मज मंदभाग्येच्या निमित्तानें श्रेष्ठ **चारुदत्ताला** मारतात ? चल चल लौकर. त्वरा कर. आर्या मला वाट दिसत नाहीं. तूं दाखीव.

**भिक्षु**—हे बुद्धोपासिके, ये ये, त्वरा कर. आर्य **चारुदत्त** जिवंत आहे तों त्याची भेट घेऊन त्याचें आश्वासन कर. अहो जन हो वाट सोडा, एकीकडे व्हा.

**वसंत०**—अहो दादांनो, एकीकडे व्हा. मला वाट द्या.

**चांडाल**—आर्या **चारुदत्ता**, स्वामीची आज्ञा तुला मारत्ये आम्ही नाहीं. तुझा मरणसमय आला. तुला कोणाचें स्मरण कर्तव्य असल्यास कर.

**चारुदत्त**—फार कशास पाहिजे. ( पूर्वोक्त श्लोक पुन्हा म्हणतो.)

### श्लोक.

माझा असेल जरि धर्म सखा नजावो ॥
दुष्टासही मज अशा समयास पावो ॥
येवोनियां प्रियसखी मजलागिं तारो ॥
माझा कलंक मजपासुनि दूर सारो ॥ ३९ ॥

**चांडाल**—( तरवार मेणांतून उपसून म्ह० ) **आर्या चारुदत्ता**, वर छाती करून ताठ उभा रहा. एका घावानें तुझा शिरच्छेद करून तुला स्वर्गास पाठवितों.

( **चारुदत्त** सांगितल्या प्रमाणें उभा राहतो. )

**चांडाल**—( तरवार उचलून घाव घालणार तों तरवार हातांतून सुटून खालीं पडली. ) अरेरे, हें काय झालें ! धिक्कार असो आमच्या कसबाला.

### आर्या.

आकर्षिला बलानें मुष्टीनें मुष्टिलाहि दृढ धरिला ॥
कां धरणीवर पडला असि जेणें गर्व अशनिचा हरिला ॥ ४० ॥

---

१ ज्यानें वज्राचा गर्व हरिला असा आहे म्ह० खड्ग, तरवार.

ज्या अर्थी ही तरवार माझ्या हांतून खालीं पडली, त्या अर्थी मला असा तर्क होतो कीं **चारुदत्त** मरत नाहीं. असो, हे भगवती सह्याचलवासिनी देवी रेणुके, कृपाकर, कृपाकर, जर ह्या **चारुदत्ताची** सुटका करशील तर त्वां आमच्या चांडाल कुलावर अनुग्रह केल्याप्रमाणें होईल.

**दुसरा चां०**—आज्ञेप्रमाणें आपणास केलें पाहिजे.

**पहिला चां०**—हो खरेंच. असो आतां असें तरवारीनें शिरच्छेद करणें राहूंद्या. शूलारोपण आतां करूं. ( असें म्हणून दोघे चांडाल त्या **चारुदत्ताला** शूलावर चढविण्यास इच्छितात. )

**चारु०**—( पुन्हा पूर्वोक्त श्लोक म्हणतो.

**श्लोक.**

माझा असेल जरि धर्म खरा नजावो॥
दुष्टासही मज अशा समयास पावो ॥
येवोनियां प्रियसखी मजलागिं तारो ॥
माझा कलंक मजपासुनि दूर सारो ॥ ४१ ॥

**वसंत०**—( भिक्षुसहवर्तमान पुढें होऊन पाहून म्ह० ) अहो थांबा थांबा थांबा, इकडे पहा. ही मी मंदभाग्या **वसंतसेना**, जिच्या करतां तुम्ही ह्या पुरुषाला मारणार ती मी जिवंत आहें पहा.

**चांडाल**—( पाहून आश्चर्य करतात. )

**आर्या.**

ही त्वरित कोण आली स्कंधावरि केशपाश वाहूनी ॥
ह्मणते थांबा थांबा आम्हां वारीत ऊर्ध्व बाहूनीं ॥ ४२ ॥

**वसंत०**—आर्या **चारुदत्त**, हें काय आहे ? ( असें ह्मणून त्याच्या उरावर पडते. )

**भिक्षु**—आर्य **चारुदत्त** ह्याचें हें काय होत आहे ? ( असें ह्मणून पायावर पडतो. )

**चांडाल**—( भय पावून ) काय ही **वसंतसेना** ? अरेरे बरें झालें

कीं, आह्मीं हा साधु मारला नाहीं. **वसंतसेने** तूं जिवंत आहेस ?

**भिक्षु**—**चारुदत्त** वांचत आहे ना ?

**चांडाल**—आतां शंभर वर्षें वांचत आहे.

**वसंत**०—( हर्षानें ) मला पुन्हा जीव प्राप्त झाला.

**चांडाल**—हें वर्तमान राजास कळविलें पाहिजे.

राजा यज्ञमंडपांत आहे तिकडेसच जाऊन सांगूं ( असें बोलून जावयास निघतात. )

**शकार**—( **वसंतसेने**ला पाहून त्रासानें ह्म० ) अरे ही गर्भदासी जिवंत कशी झाली. कोणी हिला उठविलें ? आतां माझे पंचप्राण बाहेर पडूं पाहतात. असो आतां येथून पलायन करावें हें बरें. ( असें बोलून मुकाट्यानें पळून जातो. )

**चांडाल**—( अमळ पुढें जाऊन ) अरे आह्मांला राजाची आज्ञा अशी आहे कीं **वसंतसेने**ला ज्यानें विपत्ति दिली त्याला मारावें. तर तो राजश्याल कोठें गेला तो शोधून आणला पाहिजे. असें ह्मणून निघून जातात.

**चारु**०—( विस्मय करून. )

## आर्या.

ही कोण अली काळें गिळिल्या ओढावयास मद्गुला ॥
शेत अनावृष्टीनें सुकतां यावी सुवृष्टि जशि विपुला ॥ ४३ ॥

( तिजकडे पाहून. )

## श्लोक.

हो दूसरी काय **वसंतसेना** ॥
आली वरुनी मज हें कळेना ॥
भ्रांतींत माझें मन हीस पाहे ॥
मेली नसे तीच जिवंत आहे ॥ ४४ ॥

अथवा

## आर्या.

ती काय स्वर्गाहुनि मज जिववायास उतरती झाली ॥

किंवा अनुरूप तिशीं रूपें दुसरीच काय ही आली ॥ ४५ ॥

**वसंत**०—डोळ्यांतून अश्रु गाळीत उठते, आणि **चारुदत्ताच्या** पायां वर पडते ) आर्या **चारुदत्ता**, तीच मी पापिणी आहें. जिच्या मुळें तुला अशी अयोग्य दशा प्राप्त झाली. ( पडद्यांत शब्द होतो. ) आश्चर्य, आश्चर्य, **वसंतसेना** जिवंत आहे, **वसंतसेना** जिवंत आहे.

( सर्व तसेंच म्हणतात. )

**चारुद**०—( तें ऐकून सत्वर उठतो आणि स्पर्शसुखानें डोळे झांकून हर्षानें सगद्गद कंठ होऊन म्ह० ) प्रिये **वसंतसेने** तीच तूं आहेस ?

**वसंत**०—आर्या, तीच मी मंदभाग्या.

**चारुद**०—( निरखून पाहून हर्षानें. ) हो खरेंच. तीच **वसंतसेना** ही ! ( आनंद पावून म्ह० )

## साकी.

अश्रुजळांनीं पयोधरांतें भिजवीत कोणत्द्या ॥
मृत्युमुखीं मी पडतां आली संजीवनीच विद्या ॥ ४६॥

प्रिये **वसंतसेने**, काय सांगू ?

## श्लोक.

त्वदर्थ जो देह निबद्ध झाला ॥
तुवांचि तो हा प्रतिमुक्त केला ॥
अहो प्रभाव प्रियसंगमाचा ॥
गेला कसा ये जिव जंगमाचा ॥ ४७ ॥

आणखी प्रिये पहा आजची शोभा.

## श्लोक.

तें रक्त वस्त्र अणि त्याच सुरक्त माला ॥
ज्या योग्य भासति वधूवरसंगमाला[1] ॥

---

१ विवाहसमयाला.

जे आज वध्य[1]पटहध्वनि वाद्य[2]मान ॥
झाले विवाहपटहध्वनिशीं समान ॥ ४८ ॥

**वसंत॰**—आर्या, तूं अतिदक्ष अतिचतुर असतां अशी गोष्ट कशी झाली ही ?

**चारु॰**—प्रिये, म्यां तूं मारिलीस यामुळें असें झालें.

**साकी.**

जन्मांतरींचा बळिष्ठ वैरी दुर्दैवें उद्भवला ॥
नरकीं पडतां आपण त्यानें मजला धक्का दिधला ॥४९॥

**वसंत॰**—( कानावर हात ठेऊन ) हर हर. असें कसें होईल त्या मेल्या राजश्यालानें मला मारिलें. मेलेंच होतें पण तुमच्या पुण्यानें वांचलें.

**चारु॰**—( भिक्षुला पाहून हा कोण आहे. )

**वसंत॰**—त्या दुष्टानें मला मारलें आणि ह्या सत्पुरुषानें मला वांचविलें.

**चारु॰**—( भिक्षुस म्ह॰ ) कारणावांचून बंधुत्व करणारा असा धर्मात्मा तूं कोण आहेसरे बा ?

**भिक्षु**—मला आपण ओळखिलें नाहीं काय ? मी तो मनुष्य, जो तुमच्या चरणाचें संवाहन करीत होता. जो द्यूतकारांनीं धरला आणि ह्या उपासिकेनें तुमचा आत्मीय समजून अलंकार देऊन सोडविला. सोडविला नाहीं विकतच घेतला कां म्हणांना तो मी तेव्हांपासून द्यूतकर्माचा तिरस्कार करून शाक्य[3] श्रमणक आश्रम घेऊन भिक्षु झालों आहें.

ही आर्या **वसंतसेना** गाडीची अदलाबदल झाल्यामुळें चुकून नकळत भलत्याच गाडींत बसून **पुष्पकरंडक** नामक जीर्णोद्यानांत गेली. तेथें तो दुष्ट राजश्यालसंस्थानक होता. त्यानें तूं मला वश होत नाहींस त्या अर्थीं मी तुला

---

१ वधसमयींचे वाद्यध्वनि. २ वाजणारे. ३ जैनलोकांत एका प्रकारचा चतुर्थाश्रम आहे.

मारतों, असें म्हणून बाहुपाशांनीं बलात्कारानें ओढून मारून टाकली होती, ती म्यां आपल्या डोळ्यांनीं पाहिली. मग मजकडून जितकें व्हावयाजोगें होतें तितकें साहित्य म्यां हिचें केलें.

**चारु०**—दुर्जनाचे ठिकाणीं सर्व संभवतें. त्यानें आपलें दुष्कर्म मजवर घालून मला प्राणसंकटांत पाडलें होतें, परंतु समयास तुम्हीं उभयतांनीं येऊन त्याचें निवारण केलें.

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो. )

आर्यक राजाचा जयजयकार असो.

श्लोक.

दक्षा[1]ध्वरा मथुनियां जय **शंकरा**चा ॥
कीं **क्रौंच** दानव विदारुनि **षण्मुखा**[2]चा ॥
**जंभास**[3] मारुनि जसा जय **वासवा**चा ॥
झाला तसाच अरि मर्दुनि **आर्यका**चा ॥ ५० ॥

( इतक्यांत **शर्विलक** येतो )

**शर्विलक**— दिंडया.

मारुनी त्या दुर्नृपा **पालका**तें ॥
बैसवूनीं तत्पदीं **आर्यका**तें ॥ ५१ ॥
आतां त्याची स्थापिली सर्व सत्ता ॥
सोडवीतों मी पहा **चारुदत्ता** ॥ ५२ ॥

आणखी.

श्लोक.

मारुनि शत्रु बलहीनहि मंत्रहीन ॥
आश्वासुनी सकल पौर अनाथ दीन ॥
म्यां घेतलें सकल ही वसुधाधिपत्य ॥
देवेंद्रराज्यसम दुर्लभ हेंहि सत्य ॥ ५३ ॥

---

१ दक्षयज्ञास. २ कार्तिक स्वामीचा. ३ जंभनामक दैत्यास

होणार तें होईलच, कधीं चुकावयाचें नाहीं. येथें हा जनसमाज मिळाला आहे, यावरून तो **चारुदत्त** जिवंत आहे कीं नाहीं संशय वाटतो. **चारुदत्ता**च्या जीवित रक्षणानें आमच्या **आर्यक** राजाचा मनोरथ सफल होईल काय? ( त्वरित जवळ जाऊन ) अरे दुष्टहो एकीकडे व्हा. ( पाहून हर्ष पावतो. ) आहे अजून **चारुदत्त** जिवंत आहे. **वसंतसेना**ही जिवंत आहे. आमच्या स्वामीचे मनोरथ सत्वरच पूर्ण झाले. वाहवा !

## श्लोक.

दैवें हा व्यसनमहार्णवा मधोनी ॥
काढीला गुणवतिनें करीं धरोनी ॥
त्यातें मी चिर बघतों तिणेंच युक्ता ॥
ज्योत्स्नाढ्या जणु विधुलाचि राहुमुक्ता ॥ ५४ ॥

पण याचा मी महान् अपराध केला आहे, तर आतां याच्या समोर मी कसा जाऊं? अथवा आर्जवानें सर्व वश होतात. त्यांत हा सत्पुरुष आहे चिंता नाहीं. ( उघडपणें जवळ जाऊन हात जोडून पुढें उभा राहतो. ) आर्या **चारुदत्ता.**

**चारु०**—तूं कोण आहेस ?

**शर्विलक**—तो मी.

## आर्या.

ज्यानें केलें त्वद्गृह फोडुनियां न्यासवस्तुचें हरण ॥
तो मी महापराधी विनयें आलों तुलाच कीं शरण ॥ ५५ ॥

**चारु०**—मित्रा, असें म्हणूं नको. कृपाकरून तूंच मित्रा, लाभ मला जोडून दिला. ( असें म्हणून त्याच्या गळ्यास मिठी घालतो. )

**शर्विलक**—आर्या, आणखी कांहीं सांगावयाचें आहे, तें सांगतों.

### आर्या.

जो आर्यवृत्त **आर्यक** गोपांच्या मुख्य जो कुळां मधिला ॥
तेणें दुर्नृप**पालक** यज्ञामध्यें पशू तसा वधिला ॥ ५६ ॥

**चारु॰**—काय म्हणतोस ?

**शर्विल॰**—आणखी सागतों.

### आर्या.

यानावर बसुनि तुझ्या पूर्वी जो पावला तुला शरण ॥
त्यानें यज्ञांत दिलें पशुला तैसेंचि **पालका** मरण ॥ ५७ ॥

**चारु॰**—अरे **शर्विलका**, मागें जो **पालक** राजानें गवळवाड्यांतून धरून आणून पायांत बिडी घालून व्यर्थ कारागृहांत कोंडून टाकला होता, आणि ज्याला त्वांच मुक्त केलें तोच **आर्यक** ना ?

**शर्विलक**—होय, आपण म्हणतां तसेंच.

**चारु॰**—वाहवा, आमचें प्रिय झालें.

**शर्विलक**—तुमचा मित्र **आर्यक** राज्यपदा वर बसतांच त्यानें तुमचा उपकार फेडण्याकरतां **उज्जनी** प्रांतांत **वेणा**नदीच्या काठीं **कुशावती**नगरीचें स्वामित्व तुम्हांला दिलें आहे. ही सुहृद्भावाची पहिली देणगी आहे. हिचा स्वीकार करावा अशी **आर्यक** राजाची इच्छा आहे. ( इकडे तिकडे फिरून म्ह॰ ) कोण आहेरे ? अरे त्या दुष्ट पापी राष्ट्रियाला इकडे धरून आणा. ( पडद्यांत शब्द होतो. ) आज्ञा महाराज.

**शर्विलक**—**आर्यक** राजा विज्ञापना करतो, कीं, हें राज्य म्यां तुमच्या गुणांनीं संपादिलें आहे. याचा उपभोग आपण पाहिजे तसा करावा.

**चारुद॰**—आमच्या गुणांनीं राज्य संपादिलें असें म्हणतो काय ? बरें असो. पण तसें कांहीं नाहीं. ( पडद्यांत शब्द होतो. ) अरेरे राष्ट्रिय शालका, ये लौकर इकडे, आणि आपल्या अन्यायक-

र्माचें फळ भोग. ( इवक्यांत मुसक्या बांधलेला **शकार** पुढें घालून राजसेवक येतात )

**शकार**—( मनांत म्ह० ) कायहो आश्चर्य हें !

श्लोक.

गेलों पळोनि मी दूर उद्दामागर्धभापरी ॥
बांधोनि कुतऱ्यावाणी अणिलें मजला तरी ॥ ५८ ॥

( चोहोंकडे फिरून पाहून म्ह० ) कायहो. मला चोहोंकडून राजकीय प्रतिबंध उपस्थित झाला! आतां मी निराधार कोणास शरण जाऊं. ( विचार करुन म्ह० ) असो शरणागतपरिपालनाविषयीं प्रख्यात पुरुष जवळच आहे. यालाच शरण जावें. ( असें ह्मणून **चारुदत्ता**जवळ जाऊन ) आर्या **चारुदत्ता**, मी शरणागत आहें. माझें रक्षण कर. ( असें बोलून त्याच्या पायांवर डोकी ठेवतो. ) ( पडद्यांतून शब्द होतो. ) आर्या **चारुदत्ता**, सोड सोड, त्याला आह्मी मारतों.

**शकार**— ( **चारुदत्ता** ) हे शरणागतपरिपालका, यासमयीं त्वांच माझें रक्षण करावें.

**चारु०**—( दयायुक्त होऊन ) अरेरे, शरणागतास अभय असो स्वस्थ हो भिऊं नको.

**शर्विलक**—( आवेशानें म्ह० ) हां याला एकीकडे ओढून न्या. ( **चारुदत्तास** म्ह० ) याला सोडावयाचें नाहीं. या दुष्टास कोणतें शासन करावयाचें तें लौकर सांग.

आर्या.

हा बांधुनि ओढावा कीं कुतऱ्यांनींच फाडुनी खावा ॥
शूलावरि घालावा किंवा क्रकचें करून कापावा ॥ ५९ ॥

**चारु०**—मी सांगेन तसें करशीलना ?

**शर्विलक**—यांत काय संदेह. बोल लौकर.

**शकार**—हे पुण्य पुरुषा **चारुदत्ता**, मी शरणागत आहें. मा-

झें संरक्षण कर. तुझ्या थोरपणास योग्य असेल तें तूं कर. मी पुन्हा असें कर्म करणार नाहीं.

( पडद्यांतून लोकांचा शब्द होतो. ) अहो मारा लौकर याला. या पाप्याला कशासाठीं जिवंत ठेवतां ?

**वसंतसे०**—मेल्या तुझा सत्यानास होवो. ( असें म्हणून **चारुदत्ताच्या** गळ्यांतील तांबड्या फुलांची माळ काढून **शकाराच्या** डोकीवर टाकते. )

**शकार**—अगे गर्भदासी; आतां तूं मजवर प्रसन्न हो. पुन्हा मी तुला मारणार नाहीं. माझें रक्षण कर.

**शर्विलक**—अरे ओढा याला पाहतां काय ? आर्या **चारुदत्ता** लौकर आज्ञा कर. ह्या पाप्याला कोणतें शासन करूं.

**चारु०**—पण मी सांगेन तसें करशीलना ?

**शर्विलक**—यांत काय संदेह. सांग लौकर.

**चारु०**—खरेंना पण हें ?

**शर्विलक**—होय खरें खरें.

**चारु०**—असें आहे तर—याला लौकर—

**शर्विलक**—काय ठार मारूं ?

**चारु०**—नाहीं नाहीं. सोडून द्या.

**शार्विलक०**—कशासाठीं ?

**चारु०**—अरे असें आहे.

**आर्या.**

अपराध करुनि शत्रू चरण धरुनि जरि म्हणेल तारावें ॥
शस्त्रानें न वधावें—

**शर्विलक**—शस्त्रानें वधूंनये तर कोल्ह्या कुत्र्यांकडून खावावें ?

**चारुदत्त**—नाहीं नाहीं

आर्या चतुर्थ चरण.

उपकारानेंच त्यास मारावें ॥ ६० ॥

**शर्विलक**—हें मोठेंच आश्चर्य. आर्या **चारुदत्ता**, खरेंच सांग काय करूं तें ?

**चारु०**—खरेंच सांगतों. याला सोडून दे.

**शर्विल०**—तूं सोड म्हणतोस, तर हा सोडला पहा.

**शकार**—वाहवा! काय मौज झाली? मी मेलेला पुन्हां वांचलों.

(असें बोलून राजसेवकांसहवर्तमान निघून जातो.)

(इतक्यांत पडद्या पलीकडे गलबला होतो) (पुन्हां शब्द होतो.) ही **चारुदत्ताची** धर्मपत्नी आर्या **धूता** पायांवर लोळण घेणारा आणि पदर धरून ओढणारा जो आपला पुत्र **रोहसेन** त्यास एकीकडे लोटून, सर्व लोक अश्रुपात टाकीत निवारण करीत असतां निग्रहानें प्रज्वलित अग्नीमध्यें प्रवेश करीत आहे.

**शर्विल०**--(श्रवणकरून पडद्याकडे तोंड करितो.) कोण **चंदनक** काय? **चंदनका**, गलबला कशाचा होत आहे रे?

**चंदनक**—(प्रवेशकरून म्ह०) तूं पाहात नाहींस काय? राजवाड्याच्या दक्षिणेच्या बाजूस लोकांची दाटी फार झाली आहे ती? त्या बाईला मी समजावून सांगितलें कीं, बाई असें साहस करूं नको. तुझा स्वामी आर्य **चारुदत्त** जिवंत आहे, पण दुःखाच्या झपाट्यांत माझें ऐकतो कोण आणि खरें मानतो कोण?

**चारु०**—(ऐकून उद्वेगानें म्ह०) हाहा प्रिये, मी जिवंत आहें. असें असतां तूं हें काय करत्येस?

(वर पाहून दीर्घ सुसकारा टाकून म्हणतो.)

### श्लोक.

कीर्ती तुझी व्यापुनियां महीला ॥
स्वर्गास गेलीच तथापि तूला ॥
हें योग्य कीं स्वर्गसुखा भजावें ॥
परंतु मातें न तुवां त्यजावें ॥ ६१ ॥

### दिंडी.

स्वयश गेलें स्वर्गांत रहायाला ॥
काय जाशी तें स्वतां पाहायाला ॥ ३२ ॥

जरी साध्वीला स्वर्ग असे भोग्य ॥
पतीवांचुनि भोगणें नसे योग्य ॥ ६६ ॥
( असें म्हणून मूर्छित होऊन पडतो. )

**शर्विल०**—अहो काय हा अविचार !

आर्या.

जेथें त्वरा करावी तेथें हा मोह पावला आर्य ॥
हा धिक् प्रयत्नकरितां दिसतें की विफल होतसे कार्य ॥

**वसंतसेना**—आर्या, सावध हो सावध हो. येथें घाबरून काय फळ. तेथें जाऊन त्या बाईला वांचीव लौकर. नाहीं तर अधीरपणानें एखादें भलतेंच होईल.

**चारु०**—( सावध होऊन झटकर उठून म्ह० ) हा प्रिये, कोठें आहेस ? माझ्याशीं एकदा तरी बोल.

**चंदनक**—आर्या, इकडून ये मी दाखवितों. ( सारेजण त्याच्या मागून चालूं लागतात. ) ( इतक्यांत अग्नींत प्रवेश करणारी **धूता** आणि तिचा पदर ओढीत आहे असा मुलगा **रोहसेन**, आणि त्याच्या मागून **मैत्रेय विदूषक** आणि त्याच्या मागून **रदनिका** दासी हीं येतात. )

**धूता**—( डोळ्यांस पाणी आणून. ) वत्सा मला ओढूं नको, सोड, जाऊंदे, माझ्या धर्मकृत्याला विघ्न करूं नको, स्वामींची अमंगल वार्ता ऐकून मला फार भय आणि दुःख झालें आहे. आतां माझ्यानें राहवत नाहीं. ( असें म्हणून उठून मुलाच्या हातांतून पदर ओढून घेऊन अग्नीच्या अभिमुख उभी राहते. )

**रोहसेन**—अगे आई, मला संभाळ. मला टाकून तूं कोणीकडे चाललीस ? तुझ्यावांचून मी जिवंत कसा राहीन. ( असें म्हणून धांवत धांवत जवळ जाऊन पुन्हा आईचा पदर धरितो.)

**विदूषक**—बाई तूं ब्राह्मणी आहेस. ब्राह्मणीची भिन्न चिता करूं नये. केल्यास दोष आहे असें धर्मशास्त्रांत ऋषींचें वचन आहे

**धूता**—दोष घडेल तर घडो. पतीची अमंगल वार्ता ऐकण्यापेक्षां हा दोष बरा.

**शर्विलक**—( पुढें पाहून ) आर्या **चारुदत्ता**, तुझी स्त्री **धूता** अग्नीच्या जवळ जाऊन उभी राहिली आहे. यासाठीं त्वरा कर.

**चारु**—( त्वरेनें चालतो. )

**धूता**—अगे **रदनिके**, ह्या बाळाला तूं संभाळ आतां, मी आपलें इष्ट साधित्यें.

**रदनिका**,—( करुणायुक्त होऊन म्ह० ) बाईसाहेब, मी बाळाला संभाळूं आणि तुम्ही जातां काय ? नाहीं नाहीं मीही तुमच्या मागून येणार.

**धूता**—( **विदूषका**कडे पाहून ) आर्या **मैत्रेया**, तूं तरी माझ्या बाळाचा सांभाळ कर.

**विदूष०**—( आवेशानें ) बाई, जो कोणी स्वेष्टसिद्धीस प्रवृत्त होतो त्यानें ब्राह्मण पुढें करावा असें आहे. म्हणून मी यासमयीं तुमचा पुढारी होतों.

**धूता**—ह्या बाळकाचा संभाळ करणें ह्या दोघांनींही नाकारलें आतां काय करावें. असो ( बालकास आलिंगून ) बाळा, आतां तूंच आपण आपणास संभाळ. आम्हांला तिलोदक द्यावयास तूं पाहिजेस. झाल्या गोष्टीविषयीं मनोरथ करून काय फळ. ( उसासाटाकून ) आतां तुला तुझा पिता कोठून संभाळणार ?

**चारु०**—( तें ऐकून सत्वर जवळ जाऊन म्ह० ) हा मी आहें मीच आपल्या बालकास संभाळीन. ( असें म्हणून बाहूंनीं बालकास उचलून पोटाशीं धरतो.

**धूता**—( **चारुदत्तास** पाहून ) औं—काय आश्चर्य हें माझ्या स्वामीच्या शब्दा सारखा शब्द ऐकूं आला. ( निरखून पाहून हर्षानें म्ह० ) काय सुदैव हें ! अहो हाच माझा स्वामी वाहवा ! दैवानें माझें प्रिय केलें.

**बालक**—( बापा कडे पाहून. अहो हा माझा बाबा मला पोटाशीं धरतो. ( **धूतेला** म्ह० ) अगे आई, तूं दैवाची. आतां माझा पिता मला संभाळील. ( असें म्हणून बापाच्या गळ्यास मिठी घालतो. ) बाबा तूं आलास काय ? आतां माझ्या आईला जाऊं देऊं नको.

**चारु०**—( **धूतेस** म्ह० )

**दिंडी.**

सखे नसतां त्वत्सखा नष्ट झाला ॥
असें साहस कां मांडिलें जिवाला ॥
भानु नाहीं अस्तास अजुन गेला ॥
कशी झांको कमलिनी लोचनाला ॥ ६४ ॥

**धूता**--आर्यपुत्रा, ह्या साठींच तिला अचेतन म्हणतात.

**विदूष०**—(पाहून आनंदानें ) काय आश्चर्य हें! ह्याच डोळ्यांनीं मी आपला प्रिय मित्र पुन्हा पाहतों ! अहो हा या पतिव्रतेचा प्रभाव होय. कांकीं, अग्नींत प्रवेश करण्याच्या निश्चयानेंच ही सती प्रियसमागम पावली. ( **चारुदत्तास**. ) मित्रा, तुझा जयजयकार असो. )

**चारु०**—मित्रा **मैत्रेया**, इकडे ये. ( असें म्हणोन त्याला आलिंगन देतो.

**रदनिका**—कायहो दैवाचे चमत्कारिक खेळ हे ! धन्या मी तुला वंदन करत्यें. ( असें ह्मणून **चारुदत्ताच्या** पायावर डोकी ठेवत्ये. )

**चारुदत्त**—( तिच्या पाठीवर हात ठेवून ) **रदनिके**, ऊठ, ऊठ. ( असें म्हणून तिला उठवितो. )

**धूता**—( **वसंतसेनेला** पाहून ) हें मोठें दैव कीं, माझी भगिनी खुशाल आहे.

**वसंत०**—आतां मी खुशाल झाल्यें. ( असें म्हणून दोघी एकमेकीस आलिंगितात.

**शर्विलक**—तुमच्या सुत्द्वर्गासुद्धां तुह्मांला क्षेमकुशल झालें हें मोठेंच दैव.

**चारु०**—हें सर्व तुमच्या प्रसादानें.

**शर्विलक**—आर्ये **वसंतसेने** नवा राजा तुजवर फार संतुष्ट झाला. तो बंधुभावानें तुजवर कृपा करतो.

**वसंत०**—आर्या, येणेंकरून मी कृतार्थ झाल्यें.

**शर्विल०**—( **वसंतसेने**चा सत्कार करून **चारुदत्तास** ह्म० ) आर्या ह्या भिक्षूचें काय करावयाचें ?

**चारु०**—हेभिक्षो तुला काय प्रिय आहे ?

**भिक्षु**—हें सर्व अनित्य, क्षणभंगुर विनाशी आहे असें पाहून मला दुप्पट वैराग्य झालें आहे. तर ह्याच आश्रमांत सत्काळक्षेप करावा हेंच मला प्रिय आहे.

**चारु०**—सखे **शर्विलका**, ह्या भिक्षूचा वैराग्याविषयीं दृढ निश्चय दिसतो. या सारखा महंत दुसरा कोणी नाहीं. या साठीं पृथ्वीवर जितके भिक्षूंचे मठ आहेत तितक्यांचा अधिपति हा करावा असें मला वाटतें. तुला कसें वाटतें ?

**शर्विल०**—जसें तूं म्हणतोस तसेंच.

**चारु०**—भिक्षो, आपणास कसें वाटतें ?

**भिक्षु**—यांत माझा संतोष आहे.

**शर्विल०**—**स्थावरक**चेटाचें काय करावयाचें ?

**चारु०**—हा दासत्वापासून मुक्त असावा. **शर्विलका**, आणखी तुला सांगतों त्याप्रमाणें करावें.

**शर्विलक**—कोणाविषयीं ?

**चारु०**—ते चांडाल सर्व चांडालांचे नायक असोत. **चंदनक** हा सर्व राष्ट्राच्या पालनाचा अधिकारी असो. आणि आमचा आदिमित्र जो राजश्याल **संस्थानक** तो पहिलें जें काम नगररक्षणाचें करित होता तेंच पुढें करो.

शर्विल०—तूं म्हणतोस त्या प्रमाणेंच सर्व असो. आणखी म्यां तुझें काय प्रिय करावें सांग.

चारु—याहून आणखी प्रिय राहिलें आहे काय ?

श्लोक.

झाली चारित्र्यशुद्धी चरणशरण जो शत्रु तो मुक्त केला ॥
शास्ता पृथ्वीस माझा प्रिय सुह्रद असा आर्यक प्राप्त झाला॥
झाली प्राप्तप्रिया हो पुनरपि मजला सौख्य तें काय सांगूं ॥
झाली मैत्री तुझी ही प्रियकर तुजला आणखी काय मागूं॥६५॥

दैवाची कृति विचित्र आहे पहा.

ओंव्या.

कोणाला करितसे दूषित ॥
कोणाला सुयशें प्रपूरित ॥
कोणाला उच्चपद स्थित ॥
खालीं पाडितें कवणाला ॥ ६६ ॥
कोणाकधीं देतसे सुखातें ॥
कोणाकधीं वाढवी दुःखातें ॥
भयचिंता आणि शोक यातें ॥
कधीं कोणा देतसे ॥ ६७ ॥
कधीं देतें परस्पर प्रीती ॥
कधीं वाढवितें वैरवृत्ती ॥
कधीं दारिद्र्य कधीं संपत्ती ॥
कर्मानुसार देत असे ॥ ६८ ॥
ऐशी दाखवी लोकस्थिती ॥
दैव क्रीडतें स्वतंत्रगती ॥
कूपघटीयंत्राची रीती ॥
तीच येथें जाणावी ॥ ६९ ॥

तथापि हें असो.

---

१ यशाची शुद्धता.

श्लोक.

गाई देवोत दुग्धें विपुल वसुमती धान्य ही देउ चारे ॥
कालीं पर्जन्य वर्षो सकल जनमनो नंदि बाहोत वारे ॥
पृथ्वी रक्षोत दुष्टांसह वधुनि रिपू शूर धार्मिष्ठ राजे ॥
कर्मातें आचरो तो धरुनि नयपथा लोक जें ज्यास साजे॥७०॥

( असें झाल्या वर सर्व निघून जातात. )

दहावा अंक समाप्त.

---

भाषांतरकर्त्याची प्रार्थना.

आर्या.

हें मृच्छकटिक कविनें रचिलें जें संस्कृतामध्यें पहिलें ॥
तेच **परशुरामें** म्यां यथामति प्राकृतामधें लिहिलें ॥ १ ॥

श्लोक.

गीर्वाण ज्ञान नाहीं बहु मज तरि म्यां यास आरंभ केला- ॥
विद्वानांच्या कृपेनें श्रम करुनि बहु ग्रंथ अंतासि नेला ॥
पद्यांची प्रौढ आणी सुरस हि रचना साधली नाहिं यातें ॥
घेवोत प्रीतिनें हा तरि रसिकजन ग्रंथ वाचावयातें ॥ २ ॥

आणखी श्लोक.

सुवर्णपात्रीं सुरसासि गोडी ॥
जी तीहुनी पर्णपुटीं न थोडी ॥
असेल तें दुर्लभ पात्र ज्याला ॥
द्यावा तयानें बहु मान ह्याला ॥ ३ ॥

रौद्रवर्षी दोन आठ सात एक ( १७८२ ) शकीं भला ॥
चैत्रशुक्ल तृतीयेला ग्रंथ संपूर्ण जाहला ॥ ४ ॥

---

